# तळावांतलें चांदणें

लेखक

गंगाधर गाडगीळ

किंमत तीन रुपये

लाखाणी बुक डेपो, मुंबई ४

माझा मित्र

श्री पु भागवत

ह्यास

त्याच्या व्यक्तिमत्त्वाचे एक अग

तळ्यातल्या चादण्यासारखे आहे

## अनुक्रमणिका


| | |
|---|---|
| तलावातलें चादणे | १ |
| हरवलेले दुवे | १५ |
| भागलेला चादोबा | ३१ |
| माणूस, परी आणि कासव | ४९ |
| चेटूक | ६२ |
| सुधा | ७७ |
| खेळण्याची कहाणी | ९३ |
| सरळ रेषा | १०१ |
| आमची सोनी गाय | ११९ |
| गढूळ पाणी | १३५ |
| आधळें दळण | १४६ |
| अखेरचें सांगणें | १५९ |

# १. तलावांतलें चांदणें

समोरच्या शेवग्याची फादीन् फादी फुलून तो पांढरा शुभ्र झाला आहे नाजुक फुलानी डवरला आहे रसरशीत केळ घडाच्या भाराने अमळ लवली आहे कलत्या दिवसाचें उन्ह पायऱ्या चढून वर येत आहे. हवा गारव्याने भारावली आहे गर्भवतीच्या जपून टाकलेल्या पावला-सारखी वाऱ्याची हालचाल होत आहे सगळे कसे निवात आहे.

जाताना तू आपल्या हाताने जी दूर केलीस ती जास्वदीची सडसडीत बाकदार फादी मात्र अजून हलत आहे टोकाला असलेल्या लालभडक फुलासकट हळुवारपणे डुलत आहे त्या फादीकडे पाहात मी रेलून पडलो आहे पाऊल कुरवाळत कोचाच्या हातावर टेकलेल्या पजाकडे पाहात आणि तुझी स्मृति त्या सडसडीत बाकदार फादीसारखीच माझ्या मनात डुलत आहे

नेहमींसारखीच घराबाहेर पडताना तुझी लगबग झाली. झाकपाक करायची, निवडणेटिपणे उरकायचे, सध्याकाळच्या स्वयपाकाची तयारी करून ठेवायची—गृहिणींचीं न सपणारी कामे उरकताना घड्याळाचा काटा किती तरी पुढे धावतो त्यानतर नट्टापट्टा ! घाईत असलें म्हणजे केसाचें वळण मेलें नीट जमतच नाहीं पदर खाद्यावरून जितका ओघ-ळायला हवा तेवढा ओघळत नाहीं. ह्यामुळे उशीर होत होता तेवढ्यात मी कधीं नव्हे तो लवकर घरीं आलो. डोळे विस्फारून आणि काहीं तरी टोचरें बोलून तू माझे स्वागत केलेंस मग मीं तोडदेखले नको म्हटलें

तरी मनातलें उमगून तू चहापाणी केलेस आणि लगबगीनें बाहेर पडलीस. बाहेर पडताना तू मुरडून मागे पाहिलेंस तेव्हा ताडावर कसलासा नापसतीदर्शक शेरा होता, पण डोळ्यात अभिप्राय होता 'कशी दिसते मी ?'

आताच तू गेलीस अजून तुझ्या स्पर्शानें हललेली ती जास्वंदीची फादी डुलत आहे आणि माझें मन अनेक मधुर स्मृतींनी आणि भावनानी त्या फुललेल्या शेवग्यासारखे मोहरून गेले आहे असे का झाले आहे ते सागता येत नाही पण एखादा प्रसग, एखादा क्षण माणसाचे हृदय आर्त करून सोडतो, एवढे मात्र खरे

मला आता तुझ्याशी खूप खूप बोलावेसे वाटते आहे जे बोलायचे नसते असे मला वाटत होते, ते आता मूक राहायला तयार नाहीं जे शब्दातून व्यक्त व्हायला सकोचत होतें ते आता मुग्धतेच्या कोशातून फुलपाखरासारखे बाहेर पडत आहे मनाची ही स्थिति फार वेळ टिकत नाहीं, हें मला माहीत आहे म्हणून जसे आठवेल, जसे सुचेल तसे सगळें तुला ताबडतोब सागून टाकले पाहिजे भावनाच्या ह्या वृष्टीने तुला चिंब भिजवून टाकले पाहिजे ह्याकरिता तू इथे पाहिजे होतीस पण नको. तू असतीस तर आपल्या एकाताचा भग झाला असता. शब्दाच्या फुलपाखराचे पख तुझ्या उपस्थितीच्या स्पर्शानें गळून पडले असते. जें सागायचे आहे ते कदाचित् सागितले गेले नसते म्हणून तू येथे नसतानाच मी हें सगळे काहीं तुला सागून टाकतो ह्या विश्वात काहींच नष्ट होत नाहीं म्हणतात तसे असेल तर हें माझे सागणें देखील शिल्लक राहील कधीं तरी, केव्हा तरी तुझ्या कानावर पडेल. आणि कदाचित् हें तुला आधीं ठाऊकहि असेल

सागता येईल असे वाटत होते खरें, पण आता सुरुवात करायची म्हटलें तर गोंधळायला होते फुलपाखराचे पख एव्हानाच गळून पडायला लागले, आर्ततेची ओढ इतक्यातच लटकी पडायला लागली किती विचित्र गोष्ट आहे ही ! मूर्तापेक्षा अमूर्त हे नेहमींच सुदर असतें आणि तरी अमूर्त मूर्त होण्याकरिता नेहमीं उत्सुक असतें.

मला असे सांगायचे आहे की, तू मला फार फार आवडतेस अगदीं पहिल्याने पाठीवर दोन वेण्या सोडून आपल्या विपुल केशसभाराच्या आणि विपुल यौवनाच्या तोऱ्यात कॉलेजच्या कॉरिडॉरमध्ये चालताना मी तुला पाहिले तेव्हा तू मला आवडलीस तुझ्या केशकलापावर निळी धुंदी होती तुझ्या निळसर डोळ्यात स्वातंत्र्याची मस्ती होती तुझ्या बांध्यात मादक डौल होता आणि तुझ्या चालीत स्वच्छंदीपणाची लचक होती

तू पहिल्याने दृष्टीस पडलीस तेव्हा मी मंत्रमुग्धच झालो अति-चिकित्सा करायची माझी जुनी खोड मी तेव्हा विसरलो तुझ्या एका हातात कोपरापर्यंत भरलेल्या बांगड्या खळकन् वाजल्या आणि माझे चित्त विचलित झाले नखाग्रानी तू गालावरच्या बटा सावरल्यास आणि माझ्या वृत्ती सैरभैर धावल्या आपल्या धीट चमकदार नजरेने तू माझ्या-कडे थटपणाने पाहिलेस आणि उष्णतेचा एक ओघ माझ्या मस्तकाकडे धावला तू मला हवी होतीस, ह्या एकाच उत्कट इच्छेने मी वेडा-वलो होतो

तू दृष्टीआड झालीस आणि मी बेचैन झाला तू पुन्हा दिसलीस आणि मी अधिकच बेचैन झालो ती एकच तीक्ष्ण इच्छा माझ्या मनात सारखी सलत राहिली किती दुखावले त्यामुळे माझे मन! आणि किती सुखावले!

मध्येंच तोल जाऊन पडलेला माझा चिकित्सकपणा, पुन्हा सावरून बसला आणि आपल्या अर्ध्या भिंगाच्या चष्म्यातून तुझ्याकडे पाहू लागला. पण त्या खवचट म्हाताऱ्यालाहि तुझ्यात व्यंग शोधण्याची हिंमत झाली नाहीं उलट चिकित्सकपणाची सौंदर्यदृष्टि झाली आणि ती तुझ्या सौंदर्याचे अनेक विशेष टिपू लागली तू मला इतकी का आवडलीस तें मला अधिक समजू लागले निदान तसे वाटू लागले तू मला आवड-लीस, कारण तुझ्या केसावर निळी धुंदी होती काळ्या केसावर निळी छटा कशी आली? पुन्हापुन्हा निरखले तरी ते उमजत नव्हते आणि त्यामुळेच तुझे आकर्षण शिळे होत नव्हते तुझ्या डोळ्यात मस्ती होती आणि ती देखील स्वातंत्र्याची कॉलेजातल्या छापील पोरींच्या डोळ्यात

असतो तसला तो दुबळा छचोरपणा नव्हता तुझ्या वागणुकीत मोकळेपणा होता, चॉकलेटसारखा चिकट लाघटपणा नव्हता तुझ्या चालण्यात नैसर्गिक स्वच्छंदीपणा होता, घटवलेला नखरेलपणा नव्हता तुझ्या चढेलपणाचा आणि तोऱ्याचा राग यायचा, पण तो आकर्षितहि करायचा तू कुठेहि असलीस तरी तुझे अस्तित्व जाणवायचे स्वत.चे असे तुला व्यक्तिमत्त्व होतें ह्या गोष्टीमुळे तू मला आवडत होतीस पण तुझ्यात आणखी काहीं तरी होते—मला खेचणारे, भुलविणारे आणि म्हणून तू मला हवी होतीस माणसे माणसाना का जोडली जातात ते एका विशिष्ट मर्यादे-पर्यंतच सागता येते त्यापुढे ते समजावे लागते

तू मला आकर्षित केलेस, भुलवलेस, आणि म्हणूनच तू माझा अहं-कार दुखवलास तू मला हवी आहेस हे कबूल करायला मी मुळीच तयार नव्हतो मी तुझ्याशी फटकून राहू लागलो आणि त्याच वेळीं तू माझ्याकडे आकर्षित होऊ लागलीस का बरे? मला ते खरेच अजून समजलेलें नाहीं आणि मला वाटते कीं तुलाहि ते नीटसे समजलें नाही पण कारणाची चिकित्सा करायची मीं तुझे त्यावाचून मुळींच अडत नाहीं मी तुला आवडलो आणि तू ते अगदीं सहज माझ्याजवळ कबूल केलेस

उगीचच तुझी माझी लायब्ररींत भेट व्हायला लागली तुझ्या माझ्या कॉलेजातून बाहेर पडायच्या वेळा जमू लागल्या मला एखादा रग आवडतो असे मीं सहज म्हटले तर त्या रगाचे पातळ तू दुसऱ्या दिवशी नेसून येऊ लागलीस मला आवडणारीं पुस्तकें तू उत्साहानें वाचू लागलीस आणि मला असे कळलें की माझी बाजू घेऊन तू इतरांशीं भाडू लागलीस आपल्या मताने तू हे सगळे अशा सफाईने करायचीस की आपल्या प्रीतीचा सुगावा मला देखील लागू नये बायकांच्या रीतीप्रमाणें तू वागलीस हें साहजिकच होते पण वेडे! इतकी लबाडी करणे आपल्याला जमगार नाहीं हें कसे नाहीं तुझ्या ध्यानात आलें? नतर एकदा तू मला भोळेपणानें विचारलेस, "तुम्ही मला आवडता, हें तुम्हाला कसे कळलें हो?"

ह्यावर मी तेव्हा हसलो पण खरे सांगू ? तुझ्या ह्या साधेपणामुळेंच तू मला प्रिय झाली आहेस आता देखील तू माझ्या लहानसहान फसवणुका करतेस तेव्हा ते चटकन् माझ्या ध्यानात येतें पण तुझा हिरमोड होऊ नये म्हणून मी फसल्याचा देखावा करतो आणि तसा देखावा करीत असताना माझे मन उगीचच्च भरून येते

किती आर्जवाने वागायचीस तेव्हा तू माझ्याशी ! लहानसहान बाबतीत देखील माझे मन ओळखून वागायचा तू किती प्रयत्न करायचीस ! प्रेमापुढे लीन व्हायचे, प्रेम करायचे म्हणजे द्यायचे, देता येईल तितके द्यायचे आणि त्या देण्यातला आनंद अनुभवायचा हे तुला आपसुखच माहीत होते तुझे मन निर्मळ होते, भावना बठलेल्या नव्हत्या, म्हणून तुला तसे करता आले आणि त्याच वेळीं स्वत.ला अधिक विचारी समजणारा मी तुझ्या प्रेमावर स्वत.चा अहंकार पोसत होतों तुझ्यावर प्राप्त झालेल्या अधिकाराचा दुरुपयोग करीत होता तुला वाकवण्यात, दु ख देण्यात आनंद मानत होतो अवेळीं मला भेटायला यायला भाग पाडत होतो तासन् तास तुला ताटकळत ठेवत होतो तुझ्याविषयीं संशय घेत होतो

माझे तुझ्यावर प्रेम नव्हते म्हणून नव्हतो ग मी असे करीत तू तेव्हा मला फार फार हवी होतीस प्रेमाकरिता तेव्हा मी आसुसलेला होतो आणि परिस्थितीने लाभलेल्या आणि स्वत निर्माण केलेल्या दु.खानीं कटुवृत्ति झालेल्या मला, तू माझ्यावर प्रेम करतेस—खरे खरे प्रेम करतेस—हे खरे वाटत नव्हते माझे प्रेम म्हणजे काही नुसते आकर्षण नव्हते माझे सारे जीवन ढवळून काढणारा तो एक खोल अनुभव होता आणि हृदयात साठलेली सारी कटुता, सारा राग ओकून काढून टाकल्याशिवाय ते प्रेम व्यक्त होऊ शकत नव्हते माझे प्रेम मिळविण्याकरिता माझी सारीं दु.खे आणि सारी कटुता नीलकंठानें विष प्राशन केले तशी तुला प्राशन करावी लागली माझ्या प्रेमाची ही विचित्र रीत पाहून तू भाबावलीस, गोंधळलीस आणि खूप रागावलीसहि पण माझ्यावरचे तुझे प्रेम कायमच राहिलें.

आठवतात का ग तुला ते दिवस? आता मला दिसताहेत तसे स्पष्टपणाने नजरेसमोर उभे राहतात? तेव्हाची सगळीं सुखदु खे अजून तुझ्या अगाला येऊन बिलगतात? ठरलेल्या ठिकाणी तू माझीताटकळत वाट पाहात उभी राहायचीस नेहमींच या ना त्या कारणाने मला उशीर व्हायचा किती म्लान झालेला असायचा तेव्हा तुझा चेहरा आणि मी दिसल्यावर कसा उजळायचा! माझ्यावर खूप खूप रागवायचे ठरवलेले असायचेस तू पण मी दिसल्यावर सगळें विसरायला व्हायचे राग कुठच्या कुठे पळायचा आणि हसू यायचे अधीरपणाने बोलणे सुरू व्हायचें मला आवडणारे पातळ आपण नेसला आहों ह तू मला आडवळणानें सागायचीस माझी कशी दिवसभर आठवण होत होती त सागायचीस आपली स्वप्ने सागायचीस निघताना झालेल्या आपल्या घाईचे आणि त्यामुळे इतरानीं केलेल्या थट्टेचे वर्णन करायचीस तू काहीं बोललीस तरी तेव्हा तें मला गोड वाटायचे कुठच्या तरी विषयावर तू बडबडत असायचीस, पण सागत असायचीस काहीं तरी निराळेच सर्वसामान्याच्या आवरणाखालीं काही तरी असामान्य, अद्‌भुत व्यक्त होत असायचे आणि तें अतृप्तपणे कान लावून मी ऐकत असायचा अद्‌भुत आणि असामान्य असे काय होते ते? एका माणसाचा जीव दुसऱ्यावर लागावा, माणसाच्या एकाकी कोंडलेल्या आत्म्याला प्रीतीच्या झरोक्यातून दुसऱ्या एका आत्म्याचे दर्शन व्हावे, दोघाच्या सुखदु खाची सुरावट जमावी, एकाच्या सावलीस दुसऱ्याने विसावावें, ह्याच्यासारखं आणखी अद्‌भुत ते काय आहे?

त्या अद्‌भुताच्या तद्रींत आपण भटकत असायचो पण किती चालतो ते मात्र आपल्याला समजायचें नाहीं आपण थिएटरात जायचो, पण सिनेमा पाहायचो नाहीं, हॉटेलात जायचो, पण खायचो नाही, लोकाना आपण दिसायचों, पण लोक आपल्याला दिसायचे नाहीत तेव्हा समुद्रकिनाऱ्यावर एकत्र बसून आपण जे सूर्यास्त पाहिले ते किती भव्य होते! तेव्हा आकाशातल्या लाल रगाची छटा तुडुंब भरलेल्या सागराच्या हेलावणाऱ्या पृष्ठभागावर जशी उतरत असे तशी आपल्या उत्कट भावनात देखील

प्रतिबिंबित होत असे सूर्य मावळल्यावर आकाश रिकाम्या शिंपल्यासारखें दिसू लागलें की कसें रिकामें रिकामें वाटायचें सगळें कांहीं हरवल्यासारखें वाटायचें झाड डुललें की आपलीं मनेंहि डुलायचीं एखादा मेघ एकाकीपणें आकाशातून तरंगत गेला की आपणहि दूर कुठें तरी निघून जायचो वाळूत उमटलेली पावलें आणि त्यात उमळलेला ओलावा ह्याना केवढा गूढ अर्थ प्राप्त झाला होता तेव्हा ! तू वाळूत रेघोट्या ओढत असताना, मी टक लावून त्यात कुठचा अर्थ शोधत होतों बरें ? आणि तेव्हा तू मला इतकी विलोभनीय वाटायचीस की तुला स्पर्श करायची मला भीति वाटायची !

हें सगळें तुला आठवतें ? वेदना करणारें तेव्हाचें हें सुख तू अजून आपल्या हृदयात साठवून ठेवलें आहेस का ?

आणि तेव्हाचीं तीं भांडणें ? किती स्वार्थी झालो होतो मी तेव्हा ! माझ्या मनःस्थितीशी तुझी मनःस्थिति जरा जुळली नाही, मला हवें असलेलें प्रत्युत्तर तू दिलें नाहींस, माझ्या व्यतिरिक्त दुसरी कुठचीहि गोष्ट तुला महत्त्वाची वाटते असा नुसता जरी मला संशय आला, तरी किती बिनसत असे मी, किती चिडत असे, किती निराश होत असे ! माझ्या शब्दाना कशी विलक्षण धार येत असे तेव्हा शब्दावर शब्द वाढायचा, सगळ्याच गोष्टीचा विपरीत अर्थ लागायचा, मांजराच्या पाउलासारख्या मृदु भावनांतून कठोरतेची नखें बाहेर पडायचीं किती क्रूरपणानें एकमेकाना जखमी करायचो आपण तेव्हा ! इच्छा नसताना आपण भांडणाच्या ओघातून वहात एकमेकापासून दूर दूर जायचो बोलण्याला तू सारखे फाटे फोडायचीस आणि मी, तर्काच्या कुऱ्हाडीनें ते छाटत, मला हव्या त्या दिशेनें तुला घेऊन जायचों शब्दांचा केवढा तरी गुंतावळा निर्माण व्हायचा आणि हट्टीपणानें व कंटाळवाणेपणानें आपण (विशेषतः मी) तो सोडवत बसायचो शेवटी वाटायचें कीं संपलें, झालें संपलें प्रेमाचे सारे धागे आपण तोडून टाकले आपापल्या मार्गांनी निघून जाणेंच काय तें आता शिल्लक राहिलें आहे.

पण प्रेमाचे, आकर्षणाचे चिवट धागे शाबूत असायचे, आणि रागाचा

ताण कमी झाला की आपल्याला ओढून जवळ आणायचे एखादी हालचाल, एखादा दृष्टिक्षेप, एखादा शब्द आणि आपण दोघे पुन्हा एकत्र यायचो. आपल्यालाच दोषी ठरवायची अहमहमिका लागायची प्रेमाच्या पुन्हा आणाभाका व्हायच्या हातात हात मिळायचे तसे पाहिले तर ही प्रेमाची ठराविक रीत आहे पण आपला मार्ग आपल्यालाच नाहीं का शोधून काढावा लागला ? आपले सगळे निराळेच नव्हते का ?

आठवतें का ग ते तुला सगळे ? जुहूच्या वाळवटात, वरळीच्या समुद्र-किनाऱ्यावर, हॅंगिंग गार्डनमधल्या झुपकेदार झाडाच्या छायेंत आपण जीं भांडणे केली, ज्या गुजगोष्टी केल्या, भावनाचीं जी कमानीसारखी आपल्याला जोडणारी इंद्रधनुष्यें उभी केलीं, तीं सगळीं आठवतात का ग तुला ?

आपल्या त्या भांडणानीं तुझ्या नाजुक, निर्मल मनाला जखमा झाल्या त्याचे वण अजूनहि दृष्टीस पडतात आणि खत वाटते खरेंच, फार छळले का ग मीं तुला ? आणि त्या जखमा भरून काढायला पुरेसे प्रेम नाहीं का मीं तुला दिलें ? हा प्रश्न माझ्या मनाला फार व्याकुळ करतो. पण त्याचें खरें उत्तर तुझ्याकडून कधीच मिळायचे नाहीं तू नुसती हसशील मला थोपटल्यासारखे करशील म्हणशील, 'वेडे आहात!'

तुझ्या सहवासाने, तुझ्या प्रेमाने, तुझ्याशी केलेल्या भांडणानी माझ्यात तेव्हा केवढा आश्चर्यकारक आणि सुखदायक फरक होत होता ! माझ्या मनातली कटुता निचरून जात होती माझ्या वृत्तीतला रुक्षपणा वितळत होता माणसाशी मी जोडला जात होतो माझ्या व्यक्तिमत्त्वाला नवे लाल हिरवे धुमारे चोहो बाजूनी फुटत होते मी हसू लागलो पोरकटपणा करू लागलो गभीरपणाचें माझ्या डोक्यावरचें अवजड पागोटे खाली उतरलें. तरुण असून ज्या तारुण्यातल्या आनंदाना मी पारखा झालों होतों ते मला पुन: मिळाले I was happy You made me happy

आणि मग आपले लग्न झाले चार लोकाच्या समक्ष आपले हात मिळाले एक सामाजिक सकेत पार पडला दोन तरुण माणसे लग्न करून सामाजिक परपरेच्या चौकटींत बसलीं ह्याचा सर्वांना स्वाभाविक

आनद झाला आणि झाडावर फूल यावे, तलावात चादणे पडावें, तशी तू माझ्या घरात आलीस

नववधूने प्रवेश करावा तो नव्या स्वत च्या घरातच असे मला फार फार वाटायचे अजूनहि वाटते एकत्र कुटुबातलें काव्य मी समजू शकतो नव्हे, मी ते अनुभवले आहे पण स्वत चे नवे स्वतत्र घर उभारणाऱ्या तरुण माणसाच्या जीवनातलें काव्य त्याहूनहि सुदर असते लग्न हा असा क्षण असतो की तेव्हा जुने आणि नवे ह्यानी एकमेका-पासून दूर होणे इष्ट असते, दोघाच्याहि हिताचे असते म्हणून आपल्या दोघाचें एक निराळे, नवे घर असावे म्हणून मीं खूप खूप प्रयत्न केला पण जागेच्या ठराविक अडचणीमुळे तें शक्य झालें नाहीं नववधूचे जसे स्वागत केले पाहिजे तसे मला करता आलें नाहीं म्हणून किती विषण्ण झालो मी !

पण निराशा झाली, अडचणी असल्या म्हणून जीवन काही खोळबून राहात नाहीं तशाच वेड्यावाकड्या परिस्थितीतून ते आदळत, आपटत, फाटत पुढे वहात जाते आपल्या जीवनाचेंहि तसेच झाले त्या प्रतिकूल परिस्थितींत आपण आपलीं जीवने पूर्णपणे साधण्याच्या मोठ्या प्रयोगाला सुरुवात केली हातात हात घालून जुहूच्या किनाऱ्यावर फिरणे आणि प्रीतीच्या आणाभाका घेणे निराळे आणि दोन माणसानी एकत्र उठणे, बसणे, जेवणे निराळे चादण्या रात्रीं परस्पराना बिलगून नि.स्तब्धपणे बसणे निराळे आणि उकाड्यानें हैराण करणाऱ्या कटाळ-वाण्या दुपारीं एकमेकाचा येणारा राग आवरण निराळे बोलता बोलता लाडिकपणे प्रियकराच्या शर्टचे बटन फिरवणे निराळे, आणि त्याचीं हरव-लेलीं बटणें शोधणे निराळे निराळ्या सवयी, निराळ्या आवडीनिवडी ह्याचा मेळ बसायचा असतो प्रीतीचें स्वप्न व्यवहाराच्या दगडाविटानीं साकार करायचें असतें ह्या कठीण गोष्टी आपल्याला करायच्या आहेत ह्याची जाणीव मला होती आणि त्यामुळे मी फार घाबरून गेलों होतों,

पण तू ते सगळे सोपे केलेंस मला तू बदलायला लावलेंच नाहींस. माझ्या जीवनाची जी आकृति मीं रचली होती तिच्या बरहुकूम तू

आपल्या जीवनाला वळण दिलेस मी महत्त्वाकांक्षी आहे असे पाहून तू आपल्या आकांक्षा पुसून टाकल्यास मी माझ्या जीवनाचा विस्तार बाहेर वाढवू पाहता असे दिसताच तू आपले जीवन चार भितींत मर्यादित केलेस माझा अहंकार दुखवू नये म्हणून तू आपल्याकडे कमीपणा घेतलास स्वतःच्या किती तरी सवयी तू टाकल्यास हे करताना तू कधीं रागावलीस आणि चिडलीसहि पण एकदरीत किती सहज केलेंस तू हें ? फक्त हिंदु स्त्रीच एवढा मोठा त्याग इतक्या सहजपणे करू शकते का ? केलेस तू हे ? तुझ्या सगळ्या बंडखोर भाषेमागें हिंदु स्त्रियांची शेकडों वर्षांची परंपरा शाबूत होती म्हणून तू असे केलेस की केवळ अगतिकतेने केलेंस ? असे केल्याशिवाय आपला संसार चालायचा नाहीं, हें स्त्रीच्या उपजत शहाणपणामुळे तू जाणलेस, की माझ्यावरच्या प्रेमानें तू हे केलेस ? इतके प्रेम करतेस तू माझ्यावर ? इतका आवडतो मी तुला ?

खरे म्हणजे तू असे करायला नको होतेस निदान इतक्या सहजपणे करायला नको होतेस कारण त्यामुळे तू माझ्याकरिता इतके मोठे असे काही केले आहेस हे मी विसरून जातो त्याबद्दल जी कृतज्ञता वाटायला हवी ती मला वाटत नाहीं पण मला कधीं कधी वाटते की, अशी कृतज्ञता मला वाटते की नाहीं, याची तुला फारशी पर्वा वाटत नाहीं. प्रेम करण्यात, माझ्याकरिता कष्ट करण्यात आणि माझी काळजी करण्यातच तुला आनंद वाटतो अशी तू पहिल्यानें नव्हतीस मग अशी कशी बदललीस ? इतकी अल्लड आणि पोरकट वाटतेस तू मग हा मनाचा मोठेपणा कुठून आला तुझ्याजवळ ?

पुन्हा पुन्हा तुला सांगावेंसे वाटत की किती सुखी केले आहेस तू मला ! दुःखी असण्याची मला इतकी संवय झाली होती, की अजूनहि मधूनमधून मला दुःखाचे उमाळे येतात कधी अकारण तर कधीं सकारण पण असे अनेक दिवस जातात कीं तेव्हा दुःखाची जाणीवहि मला होत नाहीं मी फक्त सुखी असतों आपलें गेल्या तीन वर्षांचे सहजीवन किती सुखद स्मृतींनीं भरून गेले आहे त्या स्मृती चाळवल्या

कीं सुखाचा खडा अंगावर पडतो सुखानं भिजून मी ओलाचिंब होतो मला एकदा घरी यायला फार उशीर झाला, तेव्हा मला रस्त्यात पाहिल्यावर तू रडत रडत जिन्यात धावत आलीस आणि मला घट्ट धरलेस—तो प्रसंग मला आठवतो किती कावरीबावरी झाली होतीस तू? तुला श्वास आवरत नव्हता आणि माझा हात सोडायला तू तयार नव्हतीस माझ्याशीं खूप भांडायचें होते तुला पण तू नुसती माझ्याकडे पाहात रडतच बसलीस आणि मग आदल्या दिवशी आपल्याला भांडता आले नाहीं म्हणून दुसऱ्या दिवशीं रागावून बसलीस केवढे गाल फुगले होते तेव्हा तुझे तेव्हा त्या प्रसंगात दु खाचा अंशच जास्त होता पण आता त्याची स्मृति मला सुखाने न्हाऊन टाकते

आठवते तुला? एकदा मी झोपलो असताना तू माझ्या तोंडावरून हात फिरवून काहीं तरी बोलत होतीस माझ्याशी डोळे मिटून मी थोडा वेळ तसेच ते सुख अनुभवले आणि मग मी एक चूक केली नको तेथें मिस्किलपणा केला आणि डोळे उघडून हसलो बाप रे! किती रागावलीस तेव्हा तू? माझ्याशीं न बोलण्याचा, माझ्यावर पुन्हा कधीहि प्रेम न करण्याचा केवढा जबरदस्त निश्चय केलास तू तेव्हा आणि माझा हात झटकून किती निग्रहाने तोंड फिरवून झोपलीस तू! पण हे किती थोडा वेळ! थोड्या वेळात मी झोपलो असे वाटून तू माझ्या कुशीत शिरलीस आणि तेव्हा मात्र डोळे उघडण्याची चूक मी केली नाही

आणि आपल्याला जागा मिळाली, आपले असे निराळे घरकुल आपण उभे केले, तेव्हा आनंदाने कशी वेडी झाली होतीस तू! लहान मुलासारखी तू नाचलीस, हसलीस, सारखी गाणीं गुणगुणत होतीस आणि आपलें घर मांडायचें, सजवायचे, आपल्या घरी लोकांना बोलवायचें, आपल्या घराविषयीं बोलायचें, बेत करायचे—ह्या सगळ्या गोष्टीत तू किती रमली होतीस बाकी कसले तुला भानच राहिलें नव्हतें किती शिकल्या-सवरल्या तरी बायकांना घराची केवढी हौस असते कुठच्या खोल प्रेरणेनें त्या असे वागतात बरे! घर ही किती सुंदर गोष्ट आहे आणि बायकोला ‘घरवाली’ म्हणण्यात काय काव्य आहे, ते मला तेव्हा समजलें आणि

घर मिळाल्याच्या आनदात तू मला ज्या मिठ्या मारल्यास त्यानी माझे अग अजून मोहोरलेलें आहे

तुझ्या एका हौसेची तर मला नेहमींच फार गमत वाटते आपल्याजवळच्या पैशातून तू माझ्याकरिता नेहमी काहीं तरी घेत असतेस. कधी कापड, कधी फाउटन पेन, कधी ॲश-ट्रे माझ्या व्यवहारी मनाला तुझ्या ह्या सवयीचें हसू यायचे वाटायचे, कशाला ही हे नसते उपद्व्याप करते? मला काय स्वत करिता वस्तू घेता येत नाहीत? आपल्या पैशातून आपल्या हौशी पुरवण्याऐवजी माझ्या हौशी कशाला पुरवते ही? बरे, कधी कधीं तुझी कापडाची निवड अशी असायची की त्याचा शर्ट अगात घालून गेले कीं चार दिवस मित्राना हसायला विषय व्हायचा म्हणून मी तुला हसायचो तुझ्यावर चिडायचो नव्हे, अजूनहि हसतो आणि चिडतो मग तू खट्टू होतेस खूप रागावतेस 'तुम्हाला कसली हौस नाही—कसले कौतुक नाही ' म्हणून बडबडतेस पुन्हा म्हणून माझ्याकरिता काहीं न घेण्याचा निश्चय करतेस त्याची रोज मला जाणीव करून देतेस आणि मग पुन्हा एखाद्या दिवशी घरी आल्यावर तुझा चेहरा फार उत्सुक दिसतो. मोठ्या प्रयासाने तू काही तरी सागायची इच्छा आवरताना दिसतेस उत्साहानें काही तरी निराळेच बोलू लागतेस पण हा सगळा देखावा फार वेळ टिकत नाहीं मी जेमतेम कोट काढतों न काढतो तोच तू म्हणतेस, ' टेबलावर पाहा काय गमत ठेवली आहे ' आणि मग त्या 'गमती 'चें कौतुक करण्याकरिता मला माझा आधींच कमी असलेला उत्साह एकत्रित करावा लागतो

तुझे माझ्यावरचे प्रेम तुझा असा गोड पराभव करते आणि मी वेडा तुझ्या ह्या वागण्याला वेडेपणा समजून हसतो

तुझी अशीहि इच्छा असते की मीं मधून मधून तुझ्याकरिता काहीं तरी आणावें फार नाही तर निदान वेणी आणावी पण स्वत.करिता देखील खरेदी करायला कटाळणाऱ्या मला हे कधीच जमत नाहीं— जमेल असे वाटत नाहीं ह्या गोष्टीचे तुला दुःख वाटतें राग येतो पण

तू इतकी मानी आहेस कीं आपली ही इच्छा तू कधी बोलून दाखवत नाहींस गप्प राहतेस वाट पाहतेस हे एक मुकयाचें व्रतच तू घेतलें आहेस तुझ्या मनातले हे सगळे सगळे मला माहीत आहे

पण नको! असे म्हटले तर तू फार रागावतेस हें मला माहीत आहे. तुझ्या मनातलें मला सगळे समजतें, ही गोष्ट तुला फार अपमानास्पद वाटते आपलें मन इतके पारदर्शक असावें हे तुला कमीपणाचें वाटते पण खरें सागू? तू अशी सरळ साधी आहेस म्हणूनच मला फार फार आवडतेस

तू इतके प्रेम करतेस माझ्याकरिता त्याग करतेस तरी पैशाच्या बाबतींत तू काटेकोर आहेस तू मला दिलेले पैसे भाडखोरपणाने वसूल करण्यात तुला मोठी मौज वाटते मी भटकायला जायला लागलो म्हणजे सिगरेट ओढण्याकरिता मला एक आणा देताना तुला आपलें सारें औदार्य एकवटावें लागते आपण सबंध महिन्यात किती आणे मला दिले ह्याचा पाढा वाचायची संधि तू तेव्हा मुळींच दवडत नाहींस आणि इतर पुरुषाप्रमाणे माझ्या खिशात चिल्लर नसते आणि वॉशिंग कंपनीत कपडे टाकताना ती आपल्याला मिळत नाहीं ह्याचें तुला फारच वाईट वाटते असे चार आणे तुला मिळाले तर तुला बोहारणीशीं उत्तम सौदा केल्यावर जसा आनद होतो तसा आनद होईल तुझ्या दृष्टीनें हा ससारातला आवश्यक संकेत आहे आणि इतराच्या जीवनात जें घडते ते आपल्या जीवनांत घडलेच पाहिजे ही बायकी हौस तुझ्या अगात भरपूर प्रमाणात आहे म्हणूनच तू ह्या लहान कारणावरून माझ्यावर रुसत असतेस आणि तुझे तें रुसणे मला इतके आवडते की मी खिशात पैसे न विसरायची मुद्दाम खबरदारी घेत असतों अशी तू रुसलीस की तुझा गालगुच्चा घ्यायला किती मजा वाटते

तुझे गणित मोठे गमतीदार आहे डबा फुकट मिळतो म्हणून तू महाग चहा आणतेस सुदर बाटल्या आपल्याजवळ जमाव्या म्हणून नको तीं औषधे विकत घेतेस आणि मला घेण्याची शिफारस करतेस माझे कपडे फाटत नाहींत आणि बोहाऱ्याला देता येत नाहींत म्हणून रागा-

वतेस घड्याळ नेहमी हाताला लावून फिरतेस, पण त्याला किल्ली द्यायला नेहमीं विसरतेस माझ वेडे कोकरू हा असा उलटा हिशेब करीत असतें

अशा किती आठवणी मागू? मोहोळातून मध ठिपकावा, तसे ह्या सगळ्या आठवणींतून तुझे प्रेम आणि सुख ठिबकत आहे तुझ्या प्रेमाने तू मला मिंधा करून ठेवले आहेस इतका कणखर वृत्तीचा मी, पण तुझे न ऐकण्यात काही गुन्हा आहे असे मलाहि अलीकडे वाटायला लागले आहे

आणि आता एक नवीनच पाश तू माझ्याभोवतीं टाकणार आहेस एका नव्या बंधनाने मला स्वत शी जखडून टाकणार आहेस तुझी अंग-यष्टि आता भरली आहे स्वच्छंदी चालीत एक जबाबदारीची जाणीव उतरली आहे तुझी नजर आता स्थिर झाली आहे तुझी वृत्ति आता हळवी आणि गंभीर झाली आहे कसली तरी तुला भीति वाटते आणि तू मला बिलगतेस कसला तरी तुला आनंद होतो आणि तेव्हाहि तू मला बिलगतेस एका नव्या अधिकारानें तू माझ्याशी बोलतेस एका नव्या आशेनें पाहतेस एका नव्या जाणिवेने माझी काळजी घेतेस माझे केस कुस्करतेस माझे तोंड आपल्या कुशीत लपवतेस उगीचच मनाला हुरहुर लावून घेतेस आणि लावतेस

आता तू माझ्या मुलाची आई होणार आहेस

समोरच्या शेवग्याची फादीन् फादी फुलून तो पांढरा शुभ्र झाला आहे. नाजुक फुलांनी डवरला आहे रसरशीत केळ घडाच्या भारानें अमळ लवली आहे कलत्या दिवसाचें उन्ह पायऱ्या चढून वर आले आहे हवेंत गारवा ओथंबला आहे गर्भवतीच्या जपून टाकलेल्या पावलासारखी वाऱ्याची हालचाल होत आहे सगळे कसे निवांत आहे

फक्त तुझी स्मृति तेवढी जास्वंदीच्या त्या सडसडीत बाकदार फांदी सारखी माझ्या मनात डुलत आहे



## २. हरवलेले दुवे

दुलदुलीत बिछाना खिडकीतून घुसलेला उजेडाचा उग्र भपकारा बुब्बुळाला तडा जावा, तसे डोळ्यावर आलेले केस यांत्रिक क्रियेच्या गणितातील बाकी राहिलेल्या शून्यासारख्या दिसणाऱ्या रेडिओच्या मुबक खुर्च्या कॅलेंडरवरच्या छटेल बाईच्या मुजल्यासारखा दिसणारा लाल लाल गाल ॲश ट्रेमध्ये मरून पडलेली सिगरेटची मुर्डी थोटके कंबर लचकवणारे पंजाबी ढंगाचे गाणे ऑफिसमधल्या फिसफिसणाऱ्या पोरी टाइपरायटरवर टेकलेली रंगवलेल्या नखाचीं बोटे साहेबाची वळवळणारी सही शब्दकोड्याच्या बक्षिसाच्या रकमातील गरगरा फिरणारी शून्यें हॉटेलच्या टेबलावर राहिलेल्या चहाच्या कपाच्या खुणाचीं वर्तुळे

किशोर अंग मोडीत उठला त्याने पायात गुतलेले पांघरूण सोडवले. पण आळसाची गुतावळ अंगभर होती झोपेची झापड डोळ्याना डिकासारखी चिकटली होती किशोरने एक मवाळ शिवी हासडली आणि मानेला एक जहाल झटका देऊन केस मागे सारले. फणीने निपटले हाताने झुलपे कुरवाळली

किशोर, आपल्याला काहीं करायचे आहे अशा उत्साहाने कधीच जागा होत नसे काहीं तरी हरवले आहे अशा जाणिवेने तो जागा होई ऑफिसचे काम रेटायचे आहे ह्या कल्पनेने त्याला गळल्यासारखे होई. आणि ऑफिस संपलें म्हणजे नंतरचा वेळ शीत पेयातील वर धावणाऱ्या

बुडबुडयाच्या रेषेप्रमाणे जावा असे त्याला वाटे दर क्षणाला वेगळे आणि तुटके असे जीवित तो जगत असे त्या जीवितात काहीं सूत्र ओवायचे त्याला जमत नसे त्याची जरुरीहि त्याला भासत नसे

त्याच्या दिवसभराच्या जीवनात चहाचे जे अनेक स्वल्पविराम असत त्यातला पहिला त्याने दिला क्षणाक्षणाला गरम घुटक्याची विस्मृति आणि मग पुन्हा नवीन घुटका !

घाईघाईने त्याने पेपर उलगडला जाड मथळे आगगाडीसारखे त्याच्या डोक्यातून धडाडत गेले युद्धातले विजय नकाशातले धावणारे बाण शाततेच्या आघाड्या आणि चढाया गडगडणाऱ्या आणि कडाडणाऱ्या बाजारभावाचीं कोष्टके पुढाऱ्याच्या भव्य घोषणा रोज चालू असलेले अतिभव्य चित्रपट मुत्सद्द्याची गुप्त खलबते नटीच्या प्रेमप्रकरणाची उघडीं गुपिते अणूच्या रहस्याचा शोध आजची स्फोटक रहस्यकथा क्रिकेटच्या धावाचे डोगर

जीवन ! विशाल जीवन ! धाप लागेतो धावणारे जीवन ! जाड मथळ्यातून आणि आकडेवारीतून व्यक्त होऊ पाहणारे जीवन ! वृत्त-पत्राच्याभडक, ढोबळ, तुटक्या आणि तुटपुज्या भाषेत जगू पाहणारे जग ! चहाच्या कपाच्या खुणाच्या वर्तुळाची हॉटेलच्या टेबलावर गर्दी व्हावी, तशी ह्या जगात घटनाची झुबड उडाली होती त्या घटना परस्परापासून तुटलेल्या होत्या आणि तरी एकमेकात गुतलेल्या होत्या त्याचा ठळक-पणा हेंच त्याच्या मूल्यमापनाचें एकमेव साधन होते ‘आज’ ‘काल’वर काट मारीत होता आणि बाकी राहात होतीं शून्यें

शून्यें ! शब्दकोड्याच्या बक्षिसाच्या रकमेतील मोठमोठालीं शून्ये ! गरगरा फिरणारीं ! भोवऱ्याप्रमाणे माणसाना शोषून घेणारीं ! दारिद्र्यातून वैभवात भिरकावून देणारीं ! हजारोच्या स्वप्नात तरळणारीं ! त्याच्या जीवनातल्या पोकळ्या आपल्या पोकळपणाने भरून काढणारीं !

विटक्या आशेनें किशोरनें त्याच्याकडे पाहिले म्हाताऱ्याच्या काम-वासनेप्रमाणें त्याची अभिलाषा चाळवली मत्सराची मळमळ जरा जाणवली. स्वप्नाच्या पोस्टरवर नवीं चित्रें चिकटवली गेली तेच विषय,

तोच भडकपणा, माडणींत जरा फेरफार उत्साहाचें थोटुक शिलगलें बुद्धीनें चार कोलांटया उड्या मारल्या

वर्तमानपत्र वाचताना थोडा देशाभिमान सुचला होता थोडे कुतूहल जागे झालें होते आपली 'रेडिमेड' मतें जरा तपासून पाहावीं असे वाटले होतें बराचसा गोंधळ उडाला होता पण ते सारे पुसटले गेले आणि पेन्सिल घेऊन तो चौकटींत अक्षरे भरू लागला

तेवढ्यात सहजगत्या रेडिओची खुटी फिरवली गेली यांत्रिक किमया सुरू झाली यत्रात बुचकळल्यामुळे खरखरीत, अमानुष झालेल्या स्वर-लहरी लचकन् नाचू लागल्या, गिरक्या घेऊ लागल्या, मनातले विचाराचे खडे वेचून काढू लागल्या अनुभूतीचा मार्ग कागदी फुलानी सजवू लागल्या

किशोरनें हाताने ठेका धरला तो तोडाने गुणगुणू लागला तो त्या नादप्रवाहाबरोबर वहात चालला त्याला वाटले, आपण सुखी आहोंत असे वाटत असतानाच सुखाची स्मृति झाली स्मृतीची विस्मृति झाली त्याला रेडिओचा कटाळा आला त्याने तो बद केला तेवढयात तो पुन्हा कोणीं सुरू केला

किशोर उठून बाहेर गॅलरींत गेला अजून दाढी आणि अघोळ करा-यला थोडा वेळ होता वॉशिंग कपनींतून कपडे आणायची काहीं निकड नव्हती आणि वेळ रिकामा राहात होता रिकामा! त्याला अस्वस्थपणा वाटू लागला विजेचे दिवे कोणी एकदम मालवावे तसे झालें शेजारचा मुकुद आपल्या दारात आला, तशी किशोरनें त्याला हाक मारली

"काय रे, लेका!" मुकुदा खेळीमेळीनें म्हणाला

"आज एवढी घाई?"

"घाई रोजचीच आहे ऑफिसटाइम लवकर असतो आमचा तुझी मजा आहे. उशिरा काय जातोस, दाढ्या काय मारतोस!" मुकुदानें हेवा व्यक्त केला

"Damn it! सालें ऑफिसचें रॉटन काम! आपण मुळींच पर्वा करीत नाहीं. दडपून द्यायच." किशोर उसन्या ऐटीनें म्हणाला.

" साहेब ताणीत नाहीं वाटत तुझा ? "

" साहेबाला मारतों बगलेंत आपण तर आता इंडिपेंडंट बिझिनेस करणार ! त्यात खरी मजा !" किशोरनें आपल्या दुबळ्या स्वप्नाला इंग्रजीचें टॉनिक दिलें.

" गेली तीन वर्षें ऐकतोंय् मी हें. "

" पाहशील लवकरच " सिनेमा नटाची 'पोज' किशोरने अगदी सहजपणे घेतली.

" काल एका पोरींबरोबर पाहिलं होतं तुला " मुकुंदाने आवाज बारीक केला

किशोरनें सफाईनें त्याला डोळा मारला

" तें 'दुल्हन' पाहिलंस का रे ?" मुकुंदानें विचारलें

" पाहिलं की ! त्यात ती शामा त्या नंदनला अशी मस्त बिलगते " किशोर त्या आठवणीने खुलला

" एकट्यानेच पाहिलेंस की बरोबर होतें कोणी ? "

" असल्या गोष्टी काय सांगायच्या असतात ? " किशोरनें अक्कड-बाजपणा केला

संभाव्यपणाचें क्षेत्र संपत आलें होतें. आणि मुकुंदाची देखील ऑफिसात जाण्याची वेळ झाली. त्यामुळे मुकुंदा घाईघाईनें घरात गेला. आणि किशोर दाढी करायच्या विचारानें परतला.

आपल्या साहेबाविषयीं त्याला वाटणारी बाशी चीड पुन्हा टवटवली. सिनेमातला नायक खलनायकाला जशी ताडकन् लाथ मारतो, तशी आपण साहेबाला मारावी असे त्याला वाटलें आणि मग बेदरकार साहसीपणाने तो धंदा करणार होता, हजारों रुपयांच्या नोटा खिशात कोंबणार होता तो कायदेकानूंची पर्वा करणार नव्हता.

त्याची अलीकडे एका मोठ्या कावेबाज मुरब्बी माणसाशीं ओळख झाली होती अगदीं किशोरला हवा तसा मनुष्य होता तो त्याला सगळ्या गोष्टींची माहिती होती आणि सगळ्या गोष्टींकडे त्याला कांहींशा तुच्छतेनें पाहता येत असे. सध्या तो कांहीं करीत नसला तरी त्याला

सगळ्या गोष्टी करता येत असत नीति आणि कायदा ह्याना तो जुमानणारा नव्हता आणि तरी तो विश्वासू होता त्याला फक्त भाडवलाची नड होती आणि तें पुरविण्याचें किशोरने अगावर घेतले होतें किशोर-जवळ पैसे नव्हते पण तो आईकडून पैसे मिळवणार होता तिला एक दागिना विकायला सागणार होता तिला थापा मारून गोड गोड बोलून त्याने बनवले होते आणि आज तो तिच्याकडून तो दागिना घेणार होता

स्वत च्या ह्या चतुराईवर तो खूष होता आणि आपल्याला धद्यात यश मिळणार असे त्याला वाटत होतें

परस्परविरोधी वृत्तीचे चमत्कारिक मिश्रण किशोरमध्ये झाले होते साहेबाच्या अधिकारातून मुक्त व्हावे असे त्याला वाटत होते आणि त्याकरिता तो दुसऱ्या एका माणसाच्या सपूर्णपणे कह्यात जाणार होता नीति, कायदा वगैरे गोष्टीना महत्त्व देणे त्याला मूर्खपणाचें वाटत होतें पण एका परक्या माणसावर तो पूर्णपणे विश्वास टाकायला तयार होता खुद्द स्वत च्या आईला त्याने थापा मारून बनवलें होते पण तो धूर्त मनुष्य आपल्याला बनवीत असेल हें त्याला सुचू शकत नव्हते बहुतेक माणसाप्रमाणे त्याच्या सत्य परिस्थितीविषयी अनेक कल्पना होत्या आणि अनेक मूल्यें होती आणि त्याची सगति लावण्याची आवश्यकता त्याला भासली नव्हती.

त्याने दाढी केली अघोळ केली मग तो आपल्या केसाची मशागत करू लागला त्याने आपल्या केसात लाटा निर्माण केल्या, फुगवटे काढले आणि थोडे केस कपाळावर लोंबते ठेवले जणु ते आपोआपच तसे रुळत होते आपल्या केसाची आणि चेहऱ्याची किशोर फार काळजी घेत असे. जुन्या वळणाची हिदु स्त्री आपल्या पदराची घेत असे, त्याहून अधिक! आणि त्यामुळे त्याचें पुष्कळसे काम भागत असे इतराना पुष्कळशा शहाणपणाने आणि परिश्रमानें जें साधत नसे, तें त्याचा गोंडस चेहरा करीत असे. त्याच्या आर्जवी हास्यामुळें त्याचे बरेचसे अपराध माफ केले जात असत. आणि मुली देखील त्याला लगट करू देत असत ती त्यामुळेंच!

जेवण करून तो घाईने बाहेर पडला रस्त्यावरच्या गर्दीत मिसळला लोकातला एक झाला माणसाची झिमड ! त्यातले सगळेच वेगाने पुढे सरकू पाहात होते आणि कोणालाच पुढे होणे जमत नव्हते सारेच जण मोठ्याने आवाज करीत होते त्यामुळे प्रत्येकाला आवाज चढवावा लागत होता आणि अखेर सगळयाचेच आवाज, मोटारीच्या कर्कश कर्ण्याच्या आवाजात लुप्त होत होते मग पुन्हा सभाषणाचे तुटके धागे उचलले जात होते त्या गर्दीतले सगळे एकटे होते परस्पराना परके होते आणि तरी अपरिहार्यपणें ते एकाच गर्दीचे घटक होते त्याची अगे अगाना चिकटत होतीं रागालोभाच्या त्याच अविचारी वावटळींना ते बळी पडले असते सर्वांना समजतील असे ढोबळ, तुटपुजे विचारच फक्त त्यानीं केले असते आणि त्याच्या हातून कृति घडली असती ती देखील त्याच स्वरूपाची !

किशोरच्या समोरून एक फाकडू पोशाख केलेला तरुण चालला होता त्याच्या डोळयावरचा काळा चष्मा केवढा तरी मोठा आणि उपरा वाटत होता आणि त्याच्या चेहऱ्यावरचा भाव देखील तसाच दिसत होता चालता चालता तो एका फळवाल्याला म्हणाला, “ अरे पावण्या ! म्युनिसिपालिटीची गाडी आली बघ ! ”

फळवाल्यानें घाबरून त्या दिशेला पाहिलें आणि तेवढ्या वेळात त्या तरुणानें सफाईनें त्याच्या टोपलींतलीं दोन फळे काढून घेतली आपल्या उपऱ्या ऐटींत तो पुढे चालू लागला किशोरने हे त्याचे कृत्य पाहिले आणि किशोरनें पाहिले ते त्याच्याहि ध्यानात आलें त्यानें किशोरकडे कौतुकाच्या अपेक्षेने पाहून हास्य केलें किशोरनें त्याच्याकडे पाहून कौतुक दर्शविणारें हास्य केलें त्या दोघाना जोडणारा चमत्कारिक धागा निर्माण व्हावा हेंच त्याना चमत्कारिक वाटलें आपल्या परकेपणाच्या कवचाला तडा गेल्याचें त्याना सहन झालें नाहीं गर्दीच्या लोंढ्यात ते परस्परापासून दूर झाले आणि एकमेकाना विसरूनहि गेले

गर्दीचा लोंढा पुढे चाललाच होता. एवढ्यात कुठे तरी गडबड झाली. “ पकडो ! मारो सालेकु ! ” असा ओरडा झाला साऱ्याच्या चेहऱ्यावर

उत्कंठेचे पॉलिश चढले  कळसूत्री बाहुल्याप्रमाणे सगळे धावत सुटले  दात विचकून कच्च्या मासाचे लचके तोडणाऱ्या रानटी पूर्वजाचे रक्त त्याच्या अगात होते तें उसळून आले  आपल्या भक्ष्याच्या भोवती सगळे जमा झाले  कोणी त्या माणसाला धरलें  कोणीं त्याला थपडा मारल्या कोणीं त्याचे केस ओढले  कोणीं लाबूनच त्याला शिव्याशाप दिले किशोरसारखे बरेचसे उत्सुकतेनें आणि पोचट दुष्टपणाने त्या मारहाणीकडे पाहात राहिले—चवड्यावर उभे राहून, माना उचावून  कचकड्याच्या बाहुल्याच्या तोडावर जसा सतत आश्चर्यचकित झाल्याचा भाव असतो, तसा सगळ्याच्या चेहऱ्यावर दिसत होता  एक गुजराथी सुरक्षित अतरावरून, डावा हात जोरजोराने हलवून ओरडत होता, "मारो ! मारो !" उत्साहानें तो कापत होता  एका हिडिस भावनेचा मुखवटा त्याच्या तोडावर चढला होता  तो विदूषकासारखा दिसत होता  आणि त्याचा हात यात्रिकपणें हलत होता  मध्येच तो उत्साहाच्या भरात पडला  सगळे हसू लागले  तोहि हसला  आणि पुन्हा हात हलवून हसत हसत ओरडू लागला, "मारो ! मारो !"

त्याच्या त्या उत्साहाची सगळ्याना गमत वाटली  किशोरनें अभावितपणे टाळ्या वाजवल्या  आणि मग सगळेच गळ्या वाजवू लागले  जणु त्या तिथे जमलेल्या लोकाच्या मनोवृत्तीचे तो माणूस म्हणजे प्रतीक होता—अर्थपूर्ण व्यगचित्र होता

अनेक माणसाचा आणि विचित्र, असबद्ध भावनाचा तेथे एक ढिगारा जमा झाला होता  वारा आल्यावर पाचोळा उडावा, त्याप्रमाणें त्या प्रसगातलें स्वारस्य नष्ट झाल्यावर तीं सगळीं माणसे भरारा चालू लागली. निरनिराळ्या दिशाना निघून गेली  किशोर म्हणजे त्यातलें एक पान ! तो देखील आपल्या मागाने चालू लागला  त्याला उर्मटपणा करावा असे वाटत होतें, कोणाच्या तरी थोबाडातून रक्त काढावेंसे वाटत होते  पब्लिकविषयीं कसला तरी गूढ आदर वाटत होता  नुसतीच गमत वाटत होती. आणि उलटसुलट भावनाच्या प्रवाहाबरोबर तो वहात चालला होता.

असा वहात वहात तो ऑफिसात आला आणि एकदम त्याच्या मनात घबराट निर्माण झाली आदल्या दिवशीं आपण काय चुका केल्या तें तो आठवू लागला आणि मग आपले काल सगळेच चुकले असा त्याचा गह झाला त्याला पळून जावेंसे वाटू लागले त्याला वाटलें की उशिरा जावे आणि हजेरीबुकावर सही करता आली नाहीं म्हणून तसेच परतावें जबाबदारी अगावर आली तेव्हा त्याच्या मनाच्या अगदी पोरकट प्रतिक्रिया झाल्या

अखेर तो थोडासा उशिराच पोहोचला वेळेवर पोहोंचणें त्याला शक्य होते पण त्या चमत्कारिक हटवादीपणामुळे आणि भीतीमुळे तो उशिरा पोहोंचला आणि मग त्याच्या मनाने अगदी उलटी कोलाटी मारली गयावया करून, लाचारीनें त्यानें हजेरीबुकात सही करण्याची परवानगी मिळवली आणि तो आपल्या जागेवर जाऊन बसला

टकलेखकाची खटखट अखड—तुटकी जणु आवाजाच्या सुबक बेचव गोळ्या सगळ्याच्या तोंडात पडत होत्या आणि सगळे त्या गिळत होते टेलिफोनच्या घटेचा दुहेरी इशारा—त्याने जोडलेली माणसे आणि तुटकीं संभाषणें! साहेबाच्या घटेचे छोटे इलेक्ट्रिक शॉक! वजन करायच्या यत्रातून कार्डे बाहेर पडावीं, त्याप्रमाणे माणसे आत बाहेर टाकणारा झुलता दरवाजा!

लाबलचक टेबल खुर्च्यांच्या रागेत माडून ठेवलेले कारकून! कामाच्या सूत्रात गोवलेले मणी! ऑफिसची वेळ सपली की ओघळणारे आणि दुसऱ्या दिवशी सकाळीं पुन्हा गोवले जाणारे! त्यानी परिश्रम करून भरलेल्या फाइलींच्या चळती! त्यातली स्वतत्र, मुद्दाम बेढब आणि बेचव केलेली भाषा! अक्षराच्या आणि आकड्याच्या खुणा! सह्याचे टप्पे! सूचनाच्या उतरडी! जबाबदारीच्या चौकटी! कामाच्या विभागणीचीं डोळेझापणीं! बढतीचीं कारस्थानें! साहेबाच्या खोलीतल्या पुण्यप्रद यात्रा! कॉन्फिडेन्शिअलचा गुप्त मत्र! बोनसचीं सुखस्वप्नें! ‘इफिशियन्सी’चा ध्येयवाद!

एक अद्भुत, विचित्र आणि विकृत विश्व!—त्यात अमानुषपणें

चावरणारीं माणसे ! त्यातलाच एक किशोर !

किशोर आपल्या जाग्यावर बसला आणि त्यानें कागद पुढें ओढले त्यानें ते पुन्हा पुन्हा चाळले आणि जसजसा तो काम केल्याशिवाय अधिक वेळ बसून राहिला, तसतसा कामाचा बोजा त्याला अधिकाधिक मोठा वाटू लागला भीतीनें तो अगदी झपाटला गेला त्यानें घाईनें कागद ओढले आणि भीतीपासून दडण्याकरिता तो काहीं तरी लिहू लागला. थोडा वेळ त्यानें लिहिले आणि तो अडखळला कुठचा तरी रेफरन्स हवा होता, असे काहीं अक्षराना चिकटून राहिलेला एक आकडा मख्खपणें सागत होता मूढपणे त्या अक्षराना चिकटलेल्या आकड्या-कडे तो पाहात राहिला ऑफिसच्या विश्वात वावरायचें म्हणजे फायलींच्या चौक्यावर जे अनेक परवलीचे शब्द उच्चारायचे असतात, त्यातला तो एक होता

किशोरनें मूढपणे त्या खुणेकडे पाहिले मग कटाळ्यानें त्यानें टेबला-वरच्या फाइली चाळल्या तो 'रेफरन्स' त्याला कुठे मिळेना इलेक्ट्रिक-च्या ताराच्या गुत्यासारखा गुतावळा त्याच्या डोक्यात निर्माण झाला त्याला काहीं समजेनासे झालें विचाराचीं अनेक 'शॉर्ट सर्किट्स' त्याच्या डोक्यात निर्माण झाली अखेर टेबलावरच्या उसकलेल्या फाइली त्यानें मागे सरकवल्या आणि तो मुर्दाडपणे स्वस्थ बसून राहिला

नेहमीं जें त्याला वाटायचें, तें आता उत्कटतेने वाटलें ती उत्कटता देखील शिळी, बोथटलेली ! त्याला वाटलें कीं, ह्या ऑफिसात काम करणें आपल्याला शक्य होणार नाहीं कुठल्याच ऑफिसात काम करणें आपल्याला झेपणार नाहीं त्यानें जे सिनेमा पाहिले होते त्यातल्या तकाकणाऱ्या, नाटकी, सुखासीन, थरारून सोडणाऱ्या विश्वात त्याला जगायचें होतें अनपेक्षितपणे मारलेला ठोसा, लाथ मारून फोडलेले दरवाजे, श्वासोच्छ्वासाबरोबर वर-खालीं होणारीं पाढरींशुभ्र वक्षःस्थळे, 'I love you' असे म्हणून घेतलेली चुबनें, सहजपणे खिशात येणारे पैसे, नाटकीपणामुळे आकर्षक वाटणारे तुटपुजें दुःख, नुसती मान वाकडी केल्यावर येणारा मृत्यु ! असल्या गोष्टींच्या विश्वात त्याला जगायचें होतें.

पण त्या जगात त्याला प्रवेश मिळू शकत नव्हता आणि ह्या जगात त्याला जबरदस्तीनें आणून सोडलें होतें त्याच्या लहानपणापासून असे मुळीं ठरवूनच टाकण्यात आले होते त्याच्या आईबापानीं आणि समाजानें असा मुळीं कटच केला होता असे का त्याला ह्या जगात कोडले होतें? त्याला कोणी ह्या जगातून सोडविणार नव्हतें का? असाच तो जगणार आणि मरणार होता?—हरवलेल्या मुलासारखे त्याला दीनवाणें वाटू लागलें.

आणि मग एकदम त्याचा संताप उसळून आला ह्या जगाला लाथ मारून तो आता बाहेर पडणार होता काय वाटेल तें झालें तरी तो बिझिनेस करणार होता स्वतत्र होणार होता नोटाची पुडकीं खिशात कोंबणार होता तो कल्पना रगवू लागला स्वत च्या रागावण्यावर खूष देखील झाला

आणि मग थोड्या वेळानें त्याच्या लक्षात आलें की आपले मन रिकामे आहे त्यात राग नाहीं, स्वप्नें नाहींत—काहींच नाहीं आपण पलीकडे चाललेलें दोन माणसाचें सभाषण ऐकत आहोत हातानें फाइलीला बाधलेल्या दोऱ्याशीं चाळा करीत आहोत आणि ह्या दोन्ही गोष्टी करण्यात आपल्याला गमत वाटत आहे अशातला मुळीच भाग नाहीं

तेवढ्यात पलीकडचा एक कारकून आला आणि म्हणाला, "तुमच्याकडे ती ××× ची केस गेले आठ दिवस पडली आहे. ती माझ्याकडे forward करा म्हणजे मी काय ती action घेतों ए एम् नें immediate म्हणून slip लावलेली आहे त्याला Responsibility सगळी तुमची आहे हें ध्यानात ठेवा मी काय! ए एम् ला matter बद्दल report करीन."

त्या ऑफिसच्या स्वतत्र भाषेत तो बोलत होता. जें व्यक्त करायचें तें ठरून गेलें होतें. कसे व्यक्त करायचें तेंहि ठरून गेलें होतें आणि अखेर कृति काय करायची तेंहि ठरून गेलें होतें राग, लोभ, द्वेष ह्याचा इथें काहींच सबध नव्हता तें सगळें अप्रस्तुत होतें तुच्छ होतें.

किशोरनें परकेपणानें, आश्चर्यानें आणि भीतीनें त्याच्याकडे पाहिलें.

त्या माणसाची भाषा आणि वागणूक त्याला समजूच शकत नव्हती मूढपणे त्याने काहीं तरी उद्गार काढला मग ते काम पुरें करण्याची केविलवाणी धडपड तो करू लागला पण तेवढयात त्या माणसानें जाऊन तें matter report केले आणि ए एम् ने किशोरला बोलावले काम करताना त्यानें मान वर केली, आणि तोललेमापलेले, रुक्ष शब्द तो बोलू लागला

किशोरला वाटलें, आपण ताडताड बोलत सुटावें आपल्या भाषेत आणि ताडकन् निघून जावें ताडताड, ताडकन्—एवढे शब्दच त्याच्या मनात अर्थशून्यपणे फिरत राहिले आणि त्यानें आपले नेहमींचें लाघवी म्हणजेच शेळपट हास्य केलें ते आपोआपच तोडावर आलें त्या हास्यामुळे ए एम् च्या बोलण्यातली धार कमी झाली त्यानें हात करून सागितले, “जा आता कोणाची तरी मदत घेऊन काम पुरें करून टाका ”

किशोर बाहेर आला आणि रिकाम्या मनाने आपल्या खुर्चीत बसून राहिला तेवढ्यात पलीकडच्या टेबलावर बसणारी ती मुलगी आली. किशोरचा गोडस, लाघवी चेहरा तिला आवडला होता त्याच्या वागणुकींतल्या बालिशपणाने तिला भुरळ घातली होती असे का झालें होतें ते तिला माहीत नव्हते स्त्रीस्वभावानुसार तिनें ते माहीत करून घेण्याचा प्रयत्नच केला नाहीं ती त्याच्यावर प्रेम करू लागली त्याचे सगळे दोष आणि मर्यादा तिला पूर्णपणे माहीत होत्या पण त्याची तिला पर्वा वाटत नव्हती त्याने आपल्याशी सारखे बडबडावें, आपल्याकडे पाहून सारखे सारखे हसावे असे तिला वाटत होतें. त्याने आपल्या शरीराला स्पर्श करावा, आपलीं चुबनें घ्यावी, आपल्याशी रतावें असे तिला वाटत होतें आणि तसे व्हावें म्हणून ती धडपडत होती ह्या तुटक्या, गुतागुतीच्या व अर्थहीन भासणाऱ्या जीवनात आपलें स्त्रीत्व एवढीच गोष्ट तिला महत्त्वाची वाटत होती त्या गोष्टीचा तिला आधार वाटत होता. तें स्त्रीत्व तिला सागत होतें की ह्या पुरुषाला आपलासा कर—आणि ती तसे करीत होती

त्या मुलीनें अगदीं सहजपणें त्याच्या टेबलावरच्या फाइलीची चाळवा चाळव केली आणि त्या व्यवस्थितपणे जुळवल्या गेल्या अगदीं सहजगत्या तिनें किशोरनें काय लिहिलें होते ते पाहिलें आणि त्याला हवा होता तो कागद अनचितपणे मिळाला तिने समोर बसून थोडेसे लिहिलें आणि बरेच काम झाल्यासारखे वाटले आपोआप किशोर काम करू लागला काम सपू लागले आणि हे सगळे होत असताना ती सारखी बोलत होती किशोरला बोलायला लावीत होती

थोड्या वेळानें ती सहजगत्या आली होती, तशीच सहजगत्या निघून गेली. आणि मग तिनें काय केलें ते किशोरच्या लक्षात आलें आपण तिच्याबरोबर सिनेमाला जायचें कबूल केले हेहि त्याच्या ध्यानात आले त्याला तिचा राग आला तिनें आपल्याला फसवलें आणि आपला अपमान केला असे वाटू लागले काय करावें तें त्याला सुचेना !

आणि मग त्याला वाटू लागले की आपणच धूर्तपणानें तिच्याकडून काम करून घेतलें त्यानें डोळा मिचकावून तसे एका कारकून मित्राला सागितलें आणि मग तें त्याला जास्तच पटलें चहाच्या वेळीं ती त्याच्याबरोबर चहा घ्यायला बाहेर जावें म्हणून घुटमळत होती पण तो तिच्याकडे दुर्लक्ष करून बाहेर पडला ' माझ्याकडे चहा काढायचा बेत होता काय ? पण मी इतका भोळसट नाहीं आहें म्हणाव ! ' तो स्वतःशींच म्हणाला. त्याच्या स्वाभिमानाला गेलेले तडे पुन्हा साधले

तेवढ्यात त्याचा एक कारकून मित्र म्हणाला, " अरे, परवा घेतलास तो रुपया परत दे कीं लेका "

" चल ! चल !—पैसे कसले परत मागतोस ? असे घेतलेले पैसे परत द्यायचे असतात कीं काय ? " किशोर हसत हसत म्हणाला

" अरे चोरा ! अस्स काय ? बराय् ! पाहून घेईन " त्याचा मित्र म्हणाला आणि त्या दोघाची फारकत झाली म्हणजे चहा द्यावा लागेल म्हणून प्रत्येकाने दुसऱ्याला टाळले

आपण आपल्या मित्राला एक रुपयाला गडवले ह्याचा किशोरला आनद झाला. आपल्या चलाखीचें आणि निर्लज्जपणाचें कौतुक वाटलें.

पण त्या माणसाविषयीं असलेली त्याच्या मनातली मित्रत्वाची भावना मात्र कमी झालेली नाहीं उलट त्या दोघाना जोडणाऱ्या दुव्यात एक भर पडली

त्या दोघाची मैत्री अशी विचित्र होती ते दोघे एकमेकाशीं खोटे बोलत, एकमेकाची निंदा व द्वेष करीत आणि एकमेकाना गडवीतहि! परस्पराविषयी त्याना आदर नव्हता उलट प्रत्येकाला दुसऱ्याविषयी अविश्वास वाटत असे आणि तरी त्याना रोज भेटून गप्पा झोडल्या शिवाय चैन पडत नसे आपली सुखदुःखे ते एकमेकाना सागत आणि कधीं कधीं औदार्याची प्रचड उकळी येऊन एक दुसऱ्याला सिनेमा दाखवीत असे

किशोरला झालेला आनद ओसरला आणि मग त्याला रिकामे रिकामे वाटू लागलें रस्त्यातून जाणाऱ्या एका मुलीच्या वक्ष स्थळावर त्याची नजर ठरली, तिथून घसरून ती तिच्या नितंबावर सावरली आणि मग तिच्या पावलात घोटाळून दुसरीकडे वळली एखाद्या काचेच्या बरणीत अडकलेल्या माशीप्रमाणे त्याचे मन रिकामेपणात गिरक्या मारून थकलें

त्यानें सिगरेट विकत घेतली आणि तिच्या जळत्या टोकानें रिकाम्या वेळावर एक काळी रेघ ओढली जाऊ लागली तो हॉटेलकडे वळला आणि तेवढ्यात त्याला तो धूर्त मनुष्य भेटला. किशोरला अतिशय आनद झाला त्याने त्या माणसाचा हात घट्ट दाबला आणि दोघे हॉटेलात गेले सिगरेटचे झुरके—चहाचे घुटके—सभाषणाचे तुकडे—हास्याचे खटके!

किशोरला हॉटेलमधलें वातावरण नेहमीं आवडत असे माणसाची येजा, ज्याची त्याची वेगळी चव, वेटरची घाऊक अदबी, गल्ल्यात पडणाऱ्या चवल्यापावल्या!

सगळें लहरी, स्वच्छदी वातावरण!—ऐट! मौज! जबाबदारीचा अभाव!

सिगरेट ओढीत रेडिओतून ऐकू येणारे गाण्याचे नाचरे सूर ऐकता

ऐकता किशोर एकदम भावनाविवश झाला आणि चहाच्या कपाच्या खुणेच्या वर्तुळात, टेबलावर पडलेली सिगरेटची राख मिसळींत तो गभीरपणें बोलू लागला इतक्या गभीरपणे तो ती राख मिसळीत होता आणि घाईनें, तुटके तुटके, मनात येईल ते तो भरकटत होता आपला ऑफिसात होणारा अपमान, आपला साहेबावरचा राग, आपली पैसे मिळवायची महत्त्वाकाक्षा, आपला धूर्तपणा, आपल्यावर खूष होणाऱ्या पोरी ह्या सर्व विषयावर तो त्या माणसाशी सारखा बोल्त राहिला जणु त्याला बोलायचें थाबायची भीति वाटत होती

आणि त्या माणसाला किशोरच्या मनातले सगळेकसे समजत होतें. किशोरचे म्हणणें कसे पूणपणे पटत होते साहेबाचा दुष्टपणा त्याला कसा पटत होता किशोरच्या मागे पोरी येत असाव्या ह्याची त्याने डोळा मिचकावून कबुली दिली मग मिष्ठास आवाजात त्यानें आपला बेत किशोरला सागितला अखेर तो म्हणाला, " हें पहा, risk घ्यायची तयारी पाहिजे वाटेल ते केल पाहिजे. तरच जमेल हे काम ! "

किशोर म्हणाला, " अलबत ! काय वाटेल ते करायची तयारी पाहिजे. कोणाची कशाला म्हणून पर्वा करायची ? सगळे rotten लोक आहेत. सरकार rotten आहे सगळे rotten आहे ह्या rotten लोकाना बनवलेंच पाहिजे. आपण पण rotten बनलें पाहिजे "

किशोर असे बोलत राहिला त्यातून त्याला चमत्कारिक समाधान लाभत होतें आपण काय बोलतोंय् तेंच त्याला नीटसे समजत नव्हते. पण तो गभीरपणें चहाच्या कपाच्या खुणाच्या वर्तुळात अतिशय गभीरपणे सिगरेटची राख मिसळत होता

त्यानें तो आईचा दागिनाच त्या माणसाच्या स्वाधीन केला तो माणूस लगबगीनें निघून गेला. आणि मग एकदम किशोरला त्याचा सशय येऊ लागला तो घाबरून गेला आपलें चुकलें असे त्याला वाटू लागलें आणि म्हणून आपलें कसे चुकलें नाहीं तें कोणाला तरी पटवून द्यायला तो फार उत्सुक झाला.

ऑफिसची वेळ झाली पुन्हा कामाचा घोडा छातीवर आला त्या विचित्र आणि विकृत विश्वात तो पुन्हा अडकला त्यातून सुटण्याकरिता धडपडू लागला कुरुकुरु आवाज करीत पेन चालू लागलें तो कामात गुतू लागला

अखेर एकदाचे घड्याळानें आपलें लठ्ठ बोट साडेपाचवर ठेवले किशोर मोकळा झाला काचेच्या बरणीत सापडलेल्या माशीप्रमाणे त्याच्या मनाने गिरक्या घेतल्या त्याला घरी जाण्याची आणि आईला भेटण्याची भीति वाटू लागली माणसाच्या गर्दीत आपण हरवून जावें अशी त्याला इच्छा झाली कुठल्या तरी स्त्रीच्या सहवासाच्या चिकट मधात माशीसारखे पख चिकटून पडावें आणि तरी अधाशीपणानें तो मध खात राहावें अशी त्याला वासना झाली सिनेमाच्या विश्वात त्याला बुडून जायचें होतें

त्याच्यावर प्रेम करणारी ती मुलगी त्याच्या शेजारून चालू लागली तिने त्याला विचारले, "तो Missing Link सिनेमा पाहिला का?"

तो म्हणाला, "नाहीं"

तिने अप्रत्यक्षपणे सुचवलें की दोघानी तो सिनेमा पाहावा

तो बनेलपणानें म्हणाला, "पाहू या कीं!—तुम्ही दाखवत असलात तर"

ती तात्रडतोब कबूल झाली तीं दोघे थिएटरात शिरली

नळींतून वीज धावली अक्षरे उमटली आणि पुसली गेली दिव्याच्या माळेने उघडझाप केली गुळगुळीत फरशी, मऊ गालिचे, गुळगुळीत कोच, तुळतुळीत काउटर, नारिगी पेयातून वर धावणारे बुडबुडे!

सगीताचें थुईथुई नाचणारे कारजें, चोरपावलानीं आलेला काळोख, पडद्यावरची यक्षभूमि! केसाचा सुगध, लुसलुशीत स्पर्श! अंधपतन

सगळे खरे होतें सगळे खोटे होतें किशोर धाडसी उमदा नायक होता किशोर उदात्त भावनेच्या आवेगानें गुदमरला होता किशोर एका मुलीच्या प्रेमात होता. तो तिच्याशीं लग्न करणार होता किशोर फार

धूर्त होता ती मुलगी rotten होती पण तिच्या केसांचा सुगंध मादक होता ना !

ग्लासावर ग्लास झोकले जात होते आणि त्याच्या खुणाच्या वर्तुळाची गिचमिड वाढत होती—वाढत होती—वाढत होती.



# ३. भागलेला चांदोबा

उन्हाने पोळलेल्या प्रदेशातून गाडी चालली होती डब्याडब्यातून माणसे दाटीदाटीनें बसली होतीं अपुऱ्या जागेत आबलेली अगे तिरकीं करीत होतीं, आणि पुन्हा सारखीं करीत होतीं डुलकी आल्यामुळें कोणाचा झोक दुसऱ्याच्या अगावर जात होता कोणी ढोपरावर ठेवलेल्या मुडाशाने घामेजलेला चेहरा पुशीत होता घटाघटा पाणी पिताना एकाच्या घशातला गोळा सारखा तडफडल्यासारखा वर-खालीं होत होता पुरुषाचे चेहरे कोळपले होते, घामानें चिकट झाले होते. बायकाचे मलूल झाले होते केस भुरभुरे झाले होते

खिडक्यातून उन्हाची तिरीप येत होती गरम वाऱ्याचे लोळ धुळी-सकट आत घुसत होते स्टेशनवरचे कावळे मोसबीच्या ओल्या चोथ्या-करिता भाडत होते, बैलाच्या तोंडातून गळणारा फेस खात होते

त्या गर्दीत अनेकाप्रमाणे तीदेखील बसली होती—अवघडलेल्या अगानें तान्हें मूल तिच्या पदराखाली होते त्याचे पायच फक्त दिसत होते. मधूनच तें किरकिरायचें, अग ताठ करून पाय झाडायचें. मग ती त्याला थोपटायची, जोजवायची ताठलेलें अग सैल सोडून तें गुगींत पडायचें जवळच तिला चिकटून तिच्या दोन आवळयाजावळया मुली बसल्या होत्या—काळ्याबेद्रया, झिडझिडलेल्या दोन बोटाची चिंचोळी कपाळपट्टी, शेंड्याजवळ जरा उचललेलें नकटे नाक, रुद जिवणी, हनुवटी जवळजवळ नाहींच, असे रूप होतें दोघींचें. एक जरा

मोठी होती दुसरी अमळ लहान होती एकीचा वर्ण थोडा उजळ, तर दुसरीचा काहींसा सावळा एकीच्या अगावर दोन मुठी मास होते, दुसरीच्या नव्हतें सावळी जरा तरतरीत होती या दुसरीचा बावळट-पणा तिच्या पिचपिच्या डोळ्यातून ताबडतोब दिसायचा 'जरा सरून बसा'यला लोकानी चारदा सागितल्यामुळे दोघींनाहि बसायला जागाच राहिली नव्हती बाकाच्या कडेला टेकून दोघीहि उभ्याच होत्या पण आपल्याला होणाऱ्या त्रासाची त्याना पर्वा नव्हती आपण गाडीत बसून प्रवास करीत आहोत ह्याचे दोघीनाहि अप्रूप वाटत होते डोळ्यात लुकलुकणाऱ्या कुतूहलानें त्या दोघीजणी सगळीकडे भिरीभिरी पाहात होत्या एकमेकीच्या कानात काहीं तरी कुजबुजत होत्या

समोरच त्या मुलीचे वडील बसल्याबसल्या झोपले होते त्यानीं एक पाय बाकावर घेतला होता आणि डोके मागे झुकवून टेकले होते. त्याच्या निबर चेहऱ्यावर घाम लकाकत होता झोपेत त्याचें तोंड अर्धवट उघडे पडलें होते त्यामुळे त्याचा आधींच भाडखोर दिसणारा चेहरा अधिकच भाडखोर वाटत होता त्याच्या शेजारचा मनुष्य अग चोरून व अधिकच अवघडून बसला होता

मामेसासूनें नाशकाहून धाडलेला पाणी प्यायचा ताब्या अर्धवट कलडून पायगतीं उभा होता सासरी जाताना माहेरून घेतलेली ट्रक नीटनेटकी बाकाखालीं सरकवलेली होती सासरची सासूबाईनीं दिलेली ट्रक कडी मोडल्यामुळे सुभाने बाधलेली होती व म्हणून ती बाकाखाली सरकली नव्हती पाय ठेवायच्या जागेतच तिला अडचण करून ठेवले होतें वळकटी वर चढवली होती आणि तिच्यात बाजूने खुपसलेले दुपटे खालीं लोंबत होते.

ह्या संसाराची अधिष्ठात्री देवता कोपऱ्यात खिडकीजवळ बसली होती. पचविशीच्या आतलेंच तिचें वय होते, आणि दिसायची तर अगदींच पोरसवदा. हाडापेरातला, शरीरयष्टींतला कोवळेपणा अजून तसाच होता. मन अजून तसेच निर्मळ आणि साधे होतें. आणि हें सगळे आता असेंच राहायचे होतें. तिच्या जीवनाची कळी कोणा निष्काळजी

वाटसरूनें उमलायच्या आधींच खुडली होती आणि आता ती कधीच फुलणार नव्हती तारुण्याचा उन्माद, प्रौढतेचें पूर्णत्व आणि प्रगल्भता ह्या अवस्था तिच्या जीवनात कधी येणारच नव्हत्या अनुभवाची सपन्नता तिच्या जीवनाला कधीच प्राप्त होणार नव्हती कष्टाचे आणि दगदगीचें दारिद्र्यच तिच्या वाट्याला यायचे होते. अशीच जरा टवटवीत राहून ती सुकून जाणार होती

[ हिंदु स्त्रीच्या पातिव्रत्याचा हा बहुमोल वारसा होता ]

अपुऱ्या वाढीची, खुजी अशी ती होती तीन मुलाच्या आईला साजेलसे विटक्या रगाचे पातळ ती नेसली होती आणि तिनें अगभर पदर घेतला होता नवऱ्यासमोर म्हणून ती खादे पाडून बसली होती माडीवर घेतलेल्या मुलाच्या सोयीकरिता म्हणून ती पाठीतून वाकली होती असे तासन्तास वाकडे राहायची त्या पाठीला आता सवय झाली होती नव्हे, ती आता सोयीस्करपणें वाकडीच झाली होती त्यामुळे ती अगदी दीनवाणी दिसत होती तिच्या तारुण्याच्या खुणा पदराआडून जरासुद्धा दिसत नव्हत्या तिचा चेहरा शरीरासारखाच कृश होता तिचे गाल अगदीं निपटलेले होते शरीरात रक्त नसल्यामुळे येणारा फटफटीतपणा तिच्या चेहऱ्यावर आला होता तिचे केस निर्जीव, विगलित झालेले होते आणि मुलाने मुठीत धरून उसकल्यामुळे त्याचा एक फराटा गालावर ओढला गेला होता

पाय अपुरा जमिनीवर टेकून तिनें त्या तान्ह्या मुलाला सावरलें होतें, आणि मधूनमधून ते तिच्या अगातला उरलासुरला जीवनरस शोषीत होते

अरुद कपाळपट्टीच्या त्या नकट्या मुली बाकाला रेलून उभ्या होत्या लुकलुकत्या डोळ्यानीं इकडेतिकडे पाहात होत्या मधूनच हाताच्या आडून एकमेकींच्या कानात कुलकुलत होत्या तेवढ्यात धाकटीचें लक्ष एका माणसाच्या मुडाशाच्या सुटलेल्या टोकाकडे गेलें तें टोक कानशिलावर लोंबत होते सगळे तोंड वासून तिनें म्हटलें, "अय्या!" आणि मग तोंडावर हात ठेवला

मोटी तिचा खादा हलवीत म्हणाली, "काय ग?"

धाकटीनें खुणेने सागितले, 'तिकडे बघ!' पण मोठीच्या कुठे पाहायचे ते ध्यानात आले नाहीं तेव्हा 'सागू का?'चा एक लाब मुरका मारून धाकटीने हाताआडून मोठीच्या कानात काय ते सागितले मग मोठीनें त्या सुटलेल्या टोकाकडे पाहिले आणि मला मोठा 'अय्या' करून आपल्या तोडावर हात ठेवला हाताआडून ती धाकटीच्या कानात काहीं तरी कुलकुलली आबट चिच खाल्ल्यासारखे तोड करून त्या दोघी हसल्या—डोक्याला डोकें लावून, हाताचा आडोसा करून

तेवढ्यात त्याच्या आईच्या रिकाम्या मनानें त्याचे हें हसणे टिपले. आपल्या लहानखोऱ्या हाताने मोठ्या मुलीचा खादा हलवीत ती म्हणाली, "काय ग?"

मोठीने धाकटीला विचारलें, "सागू का ग?"

धाकटी म्हणाली, "अ हं" आणि 'खु खु' करून हसली

मग मोठीहि अर्थात् तशीच हसली आणि आईचा खाद्यावरचा हात काढून टाकीत म्हणाली, "अ हं"

त्या दोघी आपल्या आईला धाकट्या आणि काहींशा अडाणी बहिणीप्रमाणे वागवीत असे वागण्यापासून मिळणारे दुष्ट सुख त्याच्या आयुष्यात फार महत्त्वाचें होते

त्याच्या आईला वाईट वाटले आपण अडाणी, आपल्याला कोणी गुपितात घेत नाही म्हणून तिला वाईट वाटलें मुलीचे खादे हलवून तिने विनवण्या केल्या, "साग ना ग, साग ना ग"

मुली आपसात खुसुखुसु हसल्या

मग चिडकेपणाने आपला कोता आवाज चढवून आई म्हणाली, "हें ग काय? मला का सागत नाही तुम्ही?"

पण तेवढ्यात मुलीच्या वडिलानीं मानेची चाळवाचाळव केली त्रासिकपणाने नाकापुढून हात हलवला त्यामुळे ती भीतीनें दबली. डाळयात जीव आणून मुलीच्या वडिलाकडे पाहू लागली मुली पण दबकल्या आणि वडील जेव्हा पुन्हा झोपी गेले तेव्हा सगळ्यानीं एक-

मेकाकडे पाहून सुटकेचें हास्य केले

आणि मग त्या दुष्ट मुली, 'ओ, ओ! कशी जिरली' अशा अर्थानें आईपुढे बोटे नाचवीत आपसात हसल्या

ती बिचारी वरमली आणि मग एकदम रागावून तिने जवळच्या मुलीला चिमटा काढला मोठ्याने भोकाड पसरावें की नाही, ह्यावर मुलीनें विचार केला त्यामुळे वडील जागे होऊन आईवर वसकन् ओरडले असते, पण कदाचित् तिच्याहि एकादी कानफटात मिळाली असती! आणि त्या भीतीनेच ती रडली नाहीं मात्र आपल्यावर फार मोठा अन्याय झाल्यासारखा तिने चेहरा केला, आणि करगळी हलवून आईशीं कट्ट केले धाकटीने पण तसेच केले

आई गाल फुगवून काहीं तरी पुटपुटली आणि झटक्याने मान वळवून खिडकीबाहेर बघू लागली

बाळपण सपते न सपते, तोच तिचे लग्न झाले होते लग्न झाल्यावर तिला बरोबरीच्या नात्याने कधीच कोणी वागवले नव्हते नवरा तिला कधीं लहान पोराप्रमाणे तर कधीं नोकराप्रमाणे वागवीत असे तसा तो वाईट नव्हता (तसे कोण वाईट असते म्हणा!) पण बराचसा स्वार्थी आणि हेकट ती आपल्यासारखीच प्रौढ, विचारशील आहे हे कबूल करणे त्याला आवडत नसे आणि लग्न होते न होतें, तोच पोरवटा तिच्या मागे लागला होता मुलातच सारखे तिचें वावरणे असे त्याच्या मनातलेंच तिला समजून घ्यावे लागे आपल्या मनातले त्यानाच सागण्याचा प्रसग येई आणि त्याचे वडील तिला पोराप्रमाणे वागवीत म्हणून तीं मुलेदेखील तिच्याशी बरोबरीच्या नात्याने वागत नव्हे, तिला आपल्याहून जरा कमीच लेखीत ह्यामुळे मोठेपणीदेखील ती पोराप्रमाणेच वागे भातुकली खेळावी तसा पोरागी भाडत तडत, मोठ्याना घाबरत, आपला ससार करी

(म्हातारी उडून जावी तशी ती छोटी घटना दूर जात भूतकाळच्या बोगद्यात अदृश्य झाली) पुन्हा मुलीचे लुकलुकणारे डोळे खाद्य शोधू लागले—भिंतीवर टपून बसलेल्या पालीप्रमाणे. तेवढ्यात त्याच्या

वडिलाची मागे टेकलेली मान पुढे झुकली, आणि पुढे झुकतच राहिली

त्या मानेचें आता काय होणार ह्या भीतीने मुली भेदरून घाबरून गेल्या त्याची आईदेखील घाबरली टक लावून त्या सगळ्या त्या झुकलेल्या मानेकडे पाहू लागल्या अभावितपणे धाकटीने मोठीच्या खांद्याला धरले मोठीने आईच्या मांडीवरचे पातळ मुठींत घट्ट पकडले एका चमत्कारिक सहानुभूतीने त्या झुकणाऱ्या मानेबरोबर त्यांच्याहि माना आपोआप काहींशा झुकल्या

त्यातली धाकटी जरा धिट्टकली होती आपला हात वडिलाच्या मांडी-कडे नेत ती म्हणाली, "अण्णा, अण्णा!" पण तो हात मांडीपर्यंत पोंचलाच नाहीं तिचा आवाज अण्णाना ऐकू जाण्याइतका मोठा झालाच नाहीं ती झुकलेली मान तशीच झुकत राहिली

तेवढ्यात आईच्या मांडीवरच्या बाळाने आपलें अंग ताठ केले आणि तो मोठ्याने किंचाळला मुलीनी घाबरून त्याचे पाय पकडले आणि त्याची आई त्याला पुन्हा कुशीला वळवण्याचा प्रयत्न करू लागली थाला थोपटू लागली बळेंच आपल्या स्तनाची बोंथी त्याच्या तोंडात कोंबू लागली. पण आपले अंग तसेंच ताठ ठेवून बाळ किंचाळतच राहिला.

मुलाचे वडील जागे झाले त्याची आई खांदे अधिकच पाडून मुलावर वाकून त्याचें रडणे छपविण्याचा प्रयत्न करू लागली मुली कावऱ्याबावऱ्या झाल्या

पण वडील रागावले नाहींत बायकोशीं व मुलाशी बोलताना जो एक कडक आवाज ते काढीत त्या आवाजात ते म्हणाले, "काय ग? काय झाल त्याला रडायला? मारलबिरलस की काय?"

"मी कशाला मारू त्याला?" मुलाच्या वडिलाना ऐकू जाणार नाहीं, पण जाणवेल एवढ्या आवाजात ती म्हणाली

' आ? काय म्हणालीस? मोठ्यान बोलत जा बुवा तुम्ही, मोठ्यान बोलत जा." (वर्गातल्या शेवटल्या बाकावर बसणाऱ्या 'ढ' मुलाची थट्टा करताना ते ज्या ढबीनें बोलत त्या आवाजात अण्णा म्हणाले.)

वडील अशा आवाजात बोलले म्हणजे हसायला मुभा असते हें मुलींना माहीत होते म्हणून त्या हसल्या

राग गिळींत त्याची आई त्रस्त आवाजात म्हणाली, “त्याला उकडल असेल म्हणून रडतोय् तो ”

एवढयात पदर बाजूला करून बाळाने डोके बाहेर काढले होतें त्याला ते म्हणाले,

“काय रे ? उकडतय् का तुला ? उकडणारच ! सारखी मुळीं पदराखाली घेऊन बसली आहेस त्याला ! वारा लागणार कसा त्याला ? आ ?”

पुन्हा पुन्हा असे म्हणून बायकोची चूक त्यानीं तिच्या मनावर बिंबवली, ठसवली, डागली मुलींना आईची चूक पटली आणि त्याच्या आईलाहि पटली ‘गाडीत मुलांना वारा लागू देऊ नये’ असे जेव्हा तिच्या मामेसासूबाईंनी सांगितले होतें तेव्हा तें तिला पटलें होतें आता तिच्या मुलाच्या वडिलांनी असे म्हटल्यावर तिला हेंहि पटले मोठ्या माणसांनी सांगितलेली कुठचीहि गोष्ट तिला पटत असे दोघांनी दोन निरनिराळ्या गोष्टी सांगितल्या तर नंतर सांगितलेली गोष्ट खरी, असे तिला वाटत राही खरे खोटे ठरवायचा प्रयत्न ती करीतच नसे तेवढी बुद्धि आपल्याजवळ नाहीं हे त्या प्रांजळ स्त्रीला केव्हाच पटलें होते

मुलाच्या वडिलांनी बाळाला उचलून घेतलें मुलगा आणि पुन्हा दोन मुलींच्या पाठीवरचा, म्हणून तो त्यांचा जरा लाडका होता. त्यानीं आपल्या धोतराच्या सोग्याने त्याचे घामेजलेले तोंड पुसले आणि खिडकीशी त्याला उभे केले खिडकीच्या गजावर हात आपटून तो जेव्हा खेळू लागला तेव्हा त्याचे वडील म्हणाले, “आता पाहा कसा खेळतोय् तो ! आता नाही तो कुठे रडत ?”

त्याला गप्प करण्याची ही युक्ति त्याच्या आईला माहीत नव्हती असे नव्हे. पण कोणी सांगितल्याशिवाय स्वत. होऊन असे कांहीं करण्याची तिला सवय नव्हती ती इतके बांधलेले जीवन जगली होती की, आपल्या मुलांना आपण मोकळे सोडावें हे तिला जमत नसे

ती आणि त्या मुली अपूर्वाईनें बाळाचें होणारें हें कौतुक पाहात

होत्या त्याच्या वडिलानीं त्याचे कौतुक केल्यावर त्याच्याहि मनात त्याच्याविषयीं कौतुकाची भावना उमटली

मोठ्या मुलीने हात पसरून बाळाला आपल्याकडे बोलावलें तेव्हा त्यानें अग घुसळून 'नाहीं' म्हटले धाकट्या मुलीनें तर त्याला हातच घातला तेव्हा तो किंचाळला तशी तिला एक प्रेमळ चापटी मारून वडील म्हणाले, "आता का रडवते आहेस त्याला?"

मुली हसल्या आणि त्याच्या आईला वाटले की आपणहि असाच काहीं तरी द्वाडपणा करावा आणि मुलाच्या वडिलानी आपल्याला अशीच खुसखुशीत चापटी मारावी पण असे कधी व्हायचे नाहीं हे तिला माहीत होते म्हणून विशेष वैषम्य वाटू न देता तिनें पाय मोकळे सोडले आबलेले अग सैल सोडलें अगावरचा पदर नीट केला केसावरून दोन्ही हात फिरवले खुटखुटीतपणें ती खिडकीबाहेर पाहात बसली मजेंत पाय हलवू लागली इतका मोकळेपणा तिला क्वचितच अनुभवायला मिळत असे घडीघडी ती पोराच्या उस्तवारीत अगदी बाधली जात असे त्यामुळे तिला हल्के वाटलें लहानपणी मैत्रिणीं-बरोबर झोपाळ्यावर बसून उच्च उच्च झोके घेत असताना अनुभवलेल्या आनदाचें तिला स्मरण झाले असावें कारण तेव्हा म्हटलेल्या गाण्यातली एक ओळ तिला आठवली आता थड होऊ लागलेल्या वाऱ्याच्या झुळकेबरोबर तिने ती सोडून दिली कोवळ्या वयातल्या सुखाची आठवण बरोबर घेऊन आलेली ती गाण्याची ओळ वाऱ्याच्या झुळकेबरोबर कुठे गेली असेल बरे?

मुक्त आनदाच्या झुळकेबरोबर तीदेखील उडून जाऊ लागली कुतूहलानें भरलेल्या डोळ्यानी बाहेर पाहताना तिला एक छानसे घर दिसले तिला ते आवडलें फार फार आवडले ती एकदम मोठ्याने म्हणाली, "पाहा तरी किती छान घर आहे ते!"

तिच्या यजमानानी आश्चर्यानें बाहेर पाहिले आणि मग ते प्रौढपणानें म्हणाले, "घरासारख घर त्यात काय पाहायच! तो काय ताजमहाल आहे, कीं त्याच्याकडे पाहात राहाव!"

हें बोलताना त्यांनीं चेहऱ्यावर थट्टेचा आविर्भाव आणून आजू बाजूच्या चार लोकाकडे पाहिले पण त्या सर्वांनीच जेव्हा त्याच्याकडे दुर्लक्ष केलें तेव्हा ते आपल्या मुलीकडे पाहून म्हणाले, "काय ग पोरींनो !"

पोरी आज्ञाधारकपणे हसल्या आणि मग त्यांचे वडील त्यांच्या मतें त्यानी केलेला विनोद पुन्हा पुन्हा गिरवीत राहिले आपल्याजवळ कोणीं भितीवरून नखे ओढली म्हणजे जसे अंगावर शहारे येतात तसे ते बोलणे ऐकून त्यांच्या बायकोला होत होते पण तिला कांहींहि करता येत नव्हते असहायपणें ती ते ऐकत बसली होती

अखेर आपल्या छोट्या मुलाला त्यानी विचारलें, "वेड कोण?"

मुलगा चटकन् म्हणाला, "तू"

ह्यावर मुलाची आई अगदीं गद्गदून हसली स्वत वर ताबा ठेवायचा तिला क्षणभर विसर पडला एका बालिश आनंदात तिनें पुन्हा पुन्हा बुचकळ्या मारल्या

मुलाच्या वडिलाना राग आला, पण त्यानीं तो आवरून धरला ते खोटे खोटे हसलेदेखील. पण ती जेव्हा फारच हसत राहिली तेव्हा ते चिडखोरपणानें म्हणाले, "इतक हसायला काय झाल? आ? हसतेस काय गाढवासारखी?"

त्याच्या आवाजात पडलेल्या फरकानें ती एकदम गप्प झाली तिचा चेहरा गोरामोरा झाला थोड्या वेळापूर्वी वाटणारा मोकळेपणा, तेव्हा अंगावर आलेली ती आनंदाची झुळुक आता पार नाहींशी झाली होती आपले पाडलेले खांदे अधिकच पाडून ती अडकल्यासारखी बसून राहिली तिला अशी दबकलेली पाहून त्याना समाधान वाटलें आणि अधिक बरें वाटावें म्हणून ते तिच्यावर खेकसून म्हणाले, "बर, आता घे बर ह्याला आणि आता दुपार झाली. मुलाना कांहीं खायला देशील की नाहीं? त्याच तोंड पूस नीट"

मुकाट्यानें रुळलेल्या चाकोरींतून ती फिरू लागली तांब्यातल्या पाण्याने फडके ओलें करून तिने मुलाचें तोंड पुसलें नाक पुसताना तो

घुसमटल्यासारखा होऊन घाबरेल म्हणून सफाईने ते कडेकडेनें पुसून घेतलें आणि हे करीत असताना तो चापट्या मारील हे माहीत असल्यामुळे, त्या अडवण्याकरिता दुसरा हात तिने पुढे करून ठेवला मोठ्या मिनतवारीनें मुलाला मुलीच्या स्वाधीन करून तिने छोट्या पिशवीतला डबा बाहेर काढला मुली भांडतील म्हणून त्यांना कागदावर निरनिराळ्या वाटण्या करून दिल्या एकीला करजी आवडते म्हणून करजी जास्त घातली, दुसरीला चकली आवडायची म्हणून ती जास्त घातली एकीला चित्राचा कागद दिला तर दुसरी ओरडेल म्हणून दोघींना चित्राचे कागद दिले मुलीच्या वडिलांच्या हातात कागद देऊन त्यानाच आपल्या हाताने डब्यातले घ्यायला सांगितले कारण काही दिले तरी ते त्याना पसत पडत नसे असे सगळ्यांचे समाधान झाल्यावर तिनें स्वतःकरिता डब्यातून थोडेंसे काढून घेतलें तिची सासू तिला नेहमी इतरांपेक्षा कमी खायला देत असे आणि ती सवय आता तिच्या अंगात इतकी भिनली होती कीं, स्वतःच्या हाताने देखील ती आपल्याकरिता कमीच खायला घेत असे मग मुलगा हात मारील म्हणून कागदाची पुरचुडी हातात लपवून ती चोरटेपणानें खाऊ लागली )

खाताना तिच्या डोक्यात संसाराचेच विचार होते. तिचे हात आपसुखपणें संसाराचीच कामे करीत होते घरी पोचायला उशीर होणार होता वाटेत एखाद्या स्टेशनावर दूध मिळालें असते तर बरें झालें असते, नाहीं तर बाळ भुकेला राहून किरकिरू लागला असता तें त्याच्या वडिलांना मुळींच आवडले नसते घरीं गेल्यावर चटकन् पिठले भात करायचा, थोडे थोडें खाऊन झोपी जायचे पण मुलाचे वडील लोणच्याच्या फोडीकरिता अडून बसले असते आमटी नाहीं म्हणून धाकटीनें ओकाबे काढले असते पिठल्यातल्या कांद्याच्या पाकळ्या वेचून खाऊन उठली असती. राधाबाईकडून निदान लोणचें तरी मागून आणायला हवें होतें दुसऱ्या दिवशीं घराची झाडलोट करायची होती. वर्न्सच्याकडे डबा पोचवायचा होता. हो, आणि त्याच वेळीं त्याच्याकडे फार दिवस राहिलेला सट पण घेऊन यायला हवा होता

असे एकापुढे एक अकलिपींतल्या आकड्यासारखे तिच्या मनात विचार येत होते हे विचार करणें आपल्याला आवडतें की नाहीं हें तिला माहीत नव्हतें नव्हे, असे विचार करणे अगर न करणे हे तिच्या हातातले नव्हते ते विचार करणे ही तिची प्रकृतीच झाली होती त्या पिंजऱ्यातून तिला कोणी बाहेर काढले असते तर भरारी मारायचे सामर्थ्य आता तिच्या अंगात राहिले नव्हते

असे विचार मनात आले आणि गेले स्टेशने आलीं आणि गेली सूर्य कलला उकाड्याचा भर ओसरला अवघडलेल्या अंगानी बसलेली माणसे हालचाली करू लागली पाठी वाकवून आळस देऊ लागली झुळझुळत्या वाऱ्यातून गार वाऱ्याचा शिडकाव झाल्यामुळे सगळ्याचे चेहरे अमळ टवटवीत झाले तिनेहि मोकळा हात केसावरून फिरवला

तेवढ्यात एक स्टेशन आले स्टेशनवर कोणी तरी आइस-फ्रूट विकत होता मुली पुढे सरल्या खिडकीच्या गजाना नाके लावून आशाळभूतपणे बाहेर पाहू लागल्या त्याच उत्सुकतेने त्याची आई-देखील बाहेर पाहू लागली तिला वाटले की, आपण आइस-फ्रूट खावे तिच्या पोरकट इच्छा अजून तृप्त होऊन गळून पडल्या नव्हत्या. मुलींच्याप्रमाणेच तिने भीतीने डोळ्याच्या कोपऱ्यातून मुलीच्या वडिला-कडे पाहिलें

अखेर अमळ धिटुकल्या असलेल्या मुलीने निरागसपणाचें सोंग आणीत म्हटले, “ आईस फ्रूट ना ग आई ते ? ”

तशी तिची आई म्हणाली, “ आइस फ्रूटच विकतोय् ना हो तो ? ”

आईची व लेकीची चोरटी नजर-भेट झाली

मुलीच्या वडिलानी भोळेपणाने म्हटलें, “ हो काय ग पोरींनो, हवय् का तुम्हाला ? ”

पोरी खुसुखुसु हसू लागल्या खिडकीच्या गजावर त्याची नाके चेपली. त्याच्या वडिलानी खुषीत येऊन त्याना आइस-फ्रूट घेऊन दिली त्याची आई नुसतीच आशाळभूतपणाने पाहात राहिली धाकट्या मुलीचे तिकडे लक्ष गेलेच नाहीं, पण पिचपिच्या डोळ्याच्या मोठ्या

मुलीचे अत करण द्रवले ती वडिलाना म्हणाली, “अण्णा ! आईला द्या ना ”

मुलीचे वडील म्हणाले, “होय ग ? हवय् तुला ?”

“इश्श ! मला कशाला ?” ती लाजली

“नाही हो अण्णा, हवय तिला ” मोठी मुलगी बोट दाखवीत म्हणाली

मुलीचे वडील खेकसले, “मग बोलायला काय होत ?”

आणि मुलीच्या आइला आईस फ्रूट मिळाले त्याचा रगीत गोड गारवा तिने शोषला, चोखला सगळे तोड कसे गार झाले पुन्हा तिनें ती काडी तोडाजवळ नेली, तेवढ्यात इतका वेळ टक लावून पाहणाऱ्या माडीवरच्या मुलाने चटकन् हात मारला आणि अर्धवट उघडलेले त्याच्या आईचें तोंड तसेच राहिले तिच्या हातातले आइस-फ्रूट खालीं पडलें

(त्या वेळीं तिच्या अगाचा नुसता तिळपापड झाला क्षणोक्षणीं तोंडाचा घास काढून घेणाऱ्या त्या पोराचा आणि त्या ससाराचा तिला वीट आला तिला वाटले की माडीवरच्या त्या पोराला त्याच्या बापापुढे आपटावें आणि ओरडावें, ‘सभाळा आपल्या पोराना मी जातें’ आणि गाडीं-तून उतरून सरळ चालायला लागावें वाट फुटेल तिथे जावें चालून चालून थकल्यावर रस्त्याच्या कडेला पडून मरून जावें )

त्या लहानशा निमित्ताने तिच्या हृदयात खोल कुठे तरी दडलेले सगळे माथेफिरू विचार वर उसळून आले तिचे सारे दुबळे जिणें त्यानी गदगदा हलवून सोडलें आणि मग स्वत च दुबळेपणानें ते खोल बुडून गेले

आणि त्याच वेळेला एक बाई त्याच्या डब्यात शिरली तिच्याहून वयानें जरा मोठी असेल नसेल पण तिच्या चेहऱ्यावर एक निराळाच मोकळेपणा होता नजरेत निर्भयपणा होता स्वातत्र्य तिनें अनुभविलें होतें स्वतत्रपणे जबाबदारी घेऊन ती वागली होती ज्या प्रकारें ती पावलें टाकीत होती, ज्या प्रकारे ती हमालाला सामान नीट ठेवायला

फर्मावीत होती, ज्या प्रकारे ती आपल्या नजरेने डब्यात जागा हुडकीत होती आणि ज्या ऐटीने तिच्या हातात अडकवलेली पर्स झुलत होती, त्यावरून हे सगळे समजण्यासारखे होते सगळ्या डब्यातील लोक आपल्याकडे पाहात आहेत हे माहीत असूनहि त्याच्याकडे ती सहजपणें दुर्लक्ष करीत होती

तीन मुलाच्या त्या आईने त्या बाईकडे पाहिले आणि तिच्यावर त्या बाईची एकदम छाप बसली हेव्याची एक लकेर तिच्या मनात उमटली अभावितपणे तिने आपल्या केसावरून हात फिरवला पदर सारखा केला, आणि बावळटपणानें ती त्या बाईकडे पाहू लागली

'कोणी तरी डॉक्टरीण दिसते आहे' ती उद्गारली कारण स्त्रीवर्गात अत्यत आदरणीय म्हणजे इस्पितळ चालवणारी डॉक्टरीण अशी तिची समजूत होती आपल्या यजमानाकडे तिने वळून पाहिले आणि प्रश्नार्थक मान तुकवली

त्या बाईकडे हावऱ्या नजरेने पाहणारे तिचे यजमान दचकले आणि मग आपला तोल राखण्याकरिता तुच्छतेने म्हणाले, "कसली आली आहे डॉक्टरीण! असेल कुणी नर्स नाहीं तर मास्तरीण आजकाल काय, कुणींहि मोठी ऐट आणावी असं झालय्"

तिनें पुन्हा एकदा वळून आपल्या यजमानाकडे पाहिलें इतक्या ऐटबाज बाईविषयीं ते तुच्छतेने बोलू शकतात, हें पाहून तिचा त्याच्याविषयीचा आदर दुणावला

पण तेवढ्यात ती बाई चट्चट् चपला वाजवीत तेथें आली, आणि दोन माणसाची जागा अडवून बसलेल्या अण्णाना म्हणाली, "जरा तिकडे सरा"

तिच्या त्या बेपर्वाईचे त्या तीन मुलाच्या आईला फार आश्चर्य वाटले त्या बिचारीला आता नाहीं-नाहीं तीं बोलणी ऐकून घ्यावीं लागतील, म्हणून तिच्याविषयी तिला सहानुभूति वाटू लागली, काहींशी भीतीहि वाटली आणि आपल्या यजमानाकडून होणाऱ्या गडगडाटाची ती उत्सुकतेने आणि अभिमानाने वाट पाहू लागली

पण तसा गडगडाट झालाच नाही घाबरटपणे आपल्या कोटाच्या दोन्ही बाजू पोटावर आवळून घेत ते कोपऱ्यात सरकले आणि अघळ-पघळ हसून म्हणाले, "बसा बसा"

त्याच्या त्या अघळपघळ हसण्याला तिनें जराहि प्रत्युत्तर दिलें नाहीं परकेपणानें ती त्या जागेवर बसली आपल्या पर्समधून पैसे काढून तिने हमालाला दिले आणि तोकड्या रुमालाने ती आपले तोंड पुसू लागली

आपल्या नवऱ्याची झालेली ती फजिती पाहून ती तीन मुलांची आई चकित झाली, अस्वस्थ झाली, आणि एका नव्या आदरानें ती त्या बाईकडे पाहू लागली तिच्या मनातील नवऱ्याची आकृति एकदम लहान झाली—निदान तात्पुरती तरी आणि त्या बाईची प्रत्येक हालचाल तिला फार महत्त्वपूर्ण वाटू लागली

तेवढ्यात तिचें त्या बाईच्या कपाळाकडे लक्ष गेलें आणि तिच्या ध्यानात आले की, ती बाई विधवा आहे गरीब बिचारी विधवा! नातेवाइकांचा छळ सहन करणारी दुष्ट पुरुषांच्या काव्यांना बळी पडणारी

फोनोग्राफच्या तबकडीवरून पिन् फिरली म्हणजे ठराविक आवाज यावे तसे तिच्या मनातले ते विचार खोडले गेले ती बाई तरी चांगली सुखी दिसत होती ऐटींत राहात होती कारुण्याच्या लाचारीचा लवलेशहि तिच्या चेहऱ्यावर दिसत नव्हता ती तीन मुलांची आई गोंधळली स्वत विचार करायचे कष्ट तिच्या मनाला जाणवले

आणि मग एकदम तिच्या मनात शंका आली की, ही बाई चवचाल तर नसावी! चवचाल बायकांची रंगवलेली सारी भयंकर चित्रें तिच्या नजरेसमोर उभी राहिली उध्वस्त संसार, दारूच्या फोडलेल्या बाटल्या (दारूच्या बाटल्या सोडा-वॉटरच्या बाटल्यासारख्याच असतात असा तिचा समज होता), लांब केसांचे मवाली! घाणेरडे रोग, इस्पि-तळांतला बेवारशी मृत्यु!

तिनें पोरींना ओढून आपल्याजवळ घेतलें. एक प्रकारच्या आढ्यतेनें आणि तिरस्कारानें त्या बाईकडे पाहिलें तिचा हात पुढे होऊन मुलींना

आपल्याजवळ ओढू लागला

पण तिच्या ह्या वागणुकीचा त्या बाईवर काहींच परिणाम झाला नाहीं ती बावळट बाई आपल्याकडे तिरस्काराने पाहील हे तिला खरेच वाटले नसते, आणि अर्थात् तिला त्या तिरस्काराची यत्किंचितहि पर्वा वाटली नसती उलट हसू मात्र आले असते

गाडी सुटली आणि काहीं वेळ गला तेव्हा त्या बाईने आपल्या-जवळचे पिशवीतले खायचे काढले आणि समोर मुले पाहून ती अर्थातच त्याना त्यातले देऊ लागली मुलीनी भीतभीत आई-वडिलाकडे पाहात हात पुढे केले

—मुलीच्या आईने त्याचे हात खसकन् मागे घेतले त्या बाईविषयी वाटणारा आपला तिरस्कार व्यक्त करण्याची सधि तिने घेतली

पण तेवढ्यात त्या मुलीचे वडील अघळपघळपणे हसून म्हणाले, "अग घ्या पोरीनो, घ्या त्यात काय झाल !"

मुलीनी खायला घेतले आणि त्याची आई आपल्या यजमानाकडे आश्चर्याने पाहात मागे सरली गप्प बसून राहिली

तिचे यजमान जागच्या जागी चुळबुळत त्या बाईशीं सभाषण करण्याचा प्रयत्न करू लागले त्याच्या त्या प्रयत्नानें एका निराळ्याच सशयाची ठिणगी तिच्या मनात पडली ती भडकण्याच्या अगदी बेतात होती पण त्या बाईच्या तुटकपणामुळे तिचे यजमान गप्प बसले आणि ती ठिणगी विझली मात्र विझण्यापूर्वी तिने तिला बाईविषयी वाटणाऱ्या रागात भर पाडली

पण नतर जेव्हा त्या बाईने मुलीच्या हनुवट्याना हात लावून त्या कुठच्या शाळेत जातात तें विचारलें व त्याची इतर चौकशी केली, तेव्हा त्या रागाची धार आपोआपच कमी झाली, आणि नतर जेव्हा तिने 'तुमचा मुलगा पाहायचा आहे' असे म्हणून त्याला उचलून घेतलें, त्याच्या मळक्या गालाचा मुका घेतला तेव्हा तर राग साफ पळाला ती बाई तशी चागली आहे असे तिला वाटू लागलें आपुलकी निर्माण झाली स्त्रियाना परस्पराना जोडणाऱ्या सर्वात प्रभावी धाग्यानें त्या

एकत्र आल्या

ती बाई म्हणाली, "मला मुलं फार आवडतात मी सुटी घेऊन आता काकाच्याकडेच गेले होते त्याच्याकडेहि पुष्कळ मुलं आहेत. त्याच्यात माझा वेळ फार मजेत जातो "

मग हे काका कोण वगैरे विषय अपरिहार्यपणे निघालेच आणि त्यावरून तिची माहिती कळली लग्न झाल्याबरोबरच ती विधवा झाली होती आणि मग शिक्षण घेऊन नर्स होणे तिला भाग पडले होते नर्सेसना फार मागणी होती तिला पैसा पुरेसा मिळत होता ती मजेत होती सुटींत ती काकाच्याकडे राहायला जात असे पन्नास–शंभर रुपये दिले की त्याच्या संसाराला तेवढीच मदत होत असे, आणि तिचाहि वेळ मजेंत जात असे थोडक्यात म्हणजे सुटसुटीत आणि सुखदायक असे तिचे जिणे होते

आपल्या मनगटावरच्या सुंदर घड्याळात तिने पाहिलें व छोट्या रुमालाने तोंड पुसले

आणि तिच्या त्या नखरेल हालचाली पाहून त्या तीन मुलांच्या आईच्या पोटात असूयेचा जाळ पेटला तिच्या मनात एकदम असा चमत्कारिक विचार आला कीं, आपले लग्न झाल्यावर जर आपण ताबडतोब अशा विधवा झालों असतो तर आपणहि असे ऐटबाज आणि सुखदायक जीवन जगलो असतो

हा विचार किती भयंकर आहे हें त्या सोज्वळ बाईच्या ताबडतोब ध्यानात आले ती एकदम भेदरून गेली आणि एकाद्या लतकोडग्या कुत्र्याला जसे पाठींत दांडके मारून हाकून काढावें तसे तिनें त्या विचाराला पुन्हा पुन्हा हाकून काढले

पण असे कितीहि हाकून काढले तरी तो विचार खोल कुठे तरी तिच्या जीवनात दडून राहणार होता आणि तिच्या साऱ्या जीवनाचा रंग पालटणार होता तिच्या मनावरचें कुठचे तरी आवरण त्याने फाडून टाकलें होतें

तेवढ्यात एक स्टेशन आले ती बाई खिडकींतून वाकून वाकून

बाहेर पाहू लागली मग एक उंच देखणा तरुण हात हलवीत म्हणाला, "विमल "

ती आपला छोटा रुमाल हलवीत म्हणाली, " श्याम "

खिडकीशीं येऊन त्यानें तिचा हात धरल्यासारखें केले आणि मग चपळाईने गाडीत शिरून त्याने तितक्यात रिकाम्या झालेल्या खिडकीजवळच्या दोन जागा पकडल्या आणि तिला आपल्याजवळ बोलावून नेले

त्या तीन मुलाच्या आईच्या मागेच ती बसली त्याची किलबिल तिला ऐकू येत होती त्याच्या हालचाली न बघताहि तिला जाणवत होत्या त्याचे ते सुख खोल कुठेतरी तिच्या हृदयात खुपत होते, टोचत होते (आपल्या नवऱ्याकडे तिने अगदी नव्या नजरेने, नव्या अपेक्षेने पाहिले वेड्यावाकड्या कशाहि पद्धतीने जर त्याने हें असले सुख तिला दिले असते तर तिने त गोड मानून घेतलें असते त्याच्या ससाराचे सारे कष्ट काढायला, त्याच्या पोराच्या साऱ्या खस्ता खायला तिला हुरूप आला असता ती त्याची कायमची ऋणी झाली असती. पण तिच्या नजरेने जे मागितलें ते त्याला समजू शकलें नाही आणि शब्दानी तर ते मागता येण्यासारखे नव्हतें.)

खटखटत, हिसके देत गाडी चाललीच होती दिवस मावळला. जेवण्या-खाण्याचा आणि बोलण्याचा एक मोठा कलकलाट करून माणसे शात झाली पापण्या डोळे झाकू लागल्या माणसाचीं मने घरट्यात परतू लागली आणि मग सगळीं झोपाझोप झाल्यावर पावले न वाजवता बाहेर चादण पडलें

मागे बसलेल्या बाईने म्हटले, "किती छान चादण पडलय्!"

तो तरुण म्हणाला, "खरच—किती छान!"

आणि तीं दोघे स्तब्ध झालीं

त्या तीन मुलाच्या आईने ते ऐकलें आणि ती अगदी बेचैन होऊन गेली तिला वाटलें की, आपण उठून नवऱ्याच्या शेजारी बसावें आणि त्याच्या खाद्यावर हात ठेवून म्हणावे, 'किती छान आहे चादण!'

( आशेने, व्याकुळतेनें तिने नवऱ्याकडे पाहिलें आणि तिच्या लक्षात आले की ते कधीच शक्य नव्हते, अगदीं मुळीच शक्य नव्हते )

आणि मग सहज ती आपल्या मांडीवरच्या न झोपणाऱ्या मुलाला खिडकीबाहेरचा चंद्र दाखवीत म्हणाली, "तो पाहा चांदोमामा कसा छान आहे, नाहीं? म्हण बरं, चांदोमामा चांदोमामा भागलास का"



# ४.  माणूस, परी आणि कासव

एक होती परी इवलीशी तिची आकृति पिसासारखे हलके तिचें अग. वाऱ्याबरोबर ती कुठेहि आणि कशीहि तरगत जायची फुलपाखराच्या पखाचे ती वस्त्र नेसायची आणि तितक्याच बहुरगी तिच्या कल्पना असायच्या सहानुभूतीचा काळा चष्मा ती फॅशन म्हणून लावायची आणि प्राणिमात्राच्या रक्ताने आपले ओठ लाल करायची तिच्या पर्समध्यें सुवर्णमुद्रा असत सत्तेची छत्री तिने बगलेंत मारलेली असे मृत्यूची रहस्यकथा ती फुरसत मिळाली म्हणजे वाचायची राग-द्वेषाच्या उच्च टाचाचे बूट घालून हिंडायची

ती होती मोठी लहरी ! मोठी छादिष्ट ! इवलीशी होती खरी ती, पण शक्याशक्यतेच्या तराजूला असे काहीं अनपेक्षित झोके द्यायची म्हणताय् ! ती चद्रमौळी झोपड्यावरून तरगत जायची आणि त्याचे प्रासाद व्हायचे. प्रासादाच्या सौधावर ती मजेंत पाय हलवीत बसायची आणि त्याचें वैभव लयाला जायचे मृत्यूच्या उघडलेल्या जबड्यावर ती पाय ठेवायची आणि तो मिटत नसे निर्मितीच्या क्रियेला झोके देत ती गाणी म्हणायची आणि एकेका जिवाची निरनिराळी दैवगति ठरली जायची. कधीं माजराच्या पिलाला ती मोटारीच्या चाकाखालून बसवायची, तर कधीं राज्यक्रातीच्या सुरुगाना बत्ती द्यायची, आणि आपलें पोरकट भासणारे गूढ हास्य करायची

सूर्यकिरणाच्या झोतावरून घसरगुडीचा खेळ खेळत ती खालीं उतरली.

भूमीचा स्पर्श व्हायच्या आधीच ती थबकली आणि तिने इकडेतिकडे पाहिले एका सशाच्या पिलाला तिने कुत्र्याच्या तोंडात दिले आणि त्याच्या उष्ण, लालभडक रक्ताने आपले ओठ रंगवले आपला काळा चष्मा लावून तिने एका ढगाकडे पाहिलें आणि त्या ढगाचे सोने झालें एका झोपलेल्या तरुणाच्या मस्तकावर तिने आपली छत्री उघडून धरली आणि त्याच्या जीवनात एक स्वप्न उमलले महत्त्वाकांक्षेच्या घोड्यावर तो स्वार झाला आणि त्या दूर पळणाऱ्या स्वप्नाला पकडण्याकरिता धावू लागला जन्माचा दु:खी झाला

तेवढ्यात तिला कासव दिसले आपल्या शहाणपणाचें जाड आणि त्रासदायक वाटणारे कवच पाठीवर सावरीत ते सावकाशपणे एका निश्चित दिशेनें पुढे सरकत होते वाटेत उंचवटा आला कीं तें बाजूने वळसा घालून पुढे जायचे तें जमले नाहीं तर जरा थांबायचे आणि मग सावकाश मोठ्या प्रयत्नाने तो उंचवटा चढून पुढे जायचे

त्याला पाहून परीला मोठी गमत वाटली ती वाऱ्याच्या झोतावरून पळत पळत त्याच्याजवळ गेली आपल्या उंच टाचाच्या बुटाने तिने त्याच्या जाड पाठीवर लाथा मारल्या आपल्या छत्रीच्या टोकाने त्याला डिवचलें कासवाने आपले तोंड आणि पाय आत ओढून घेतले तिनें कासवाच्या टणक पाठीवर खूप मारले, पण ते स्तब्ध पडून होतें, त्याला काहींच लागले नाहीं ती खूप खूप चिडली, पण तिला काहींच करता येईना

अखेर तिला युक्ति सुचली कासवाच्या पाठीवर बसून पाय हलवीत ती म्हणाली,

"कासवा! कासवा! किती दूरचा पल्ला?"

कासव म्हणालें, "खूप खूप लांबचा किती तरी लांबचा!"

तिनें थट्टेनें विचारले, "डोंगराच्या पलीकडे?"

कासव शांतपणे म्हणाले, "क्षितिजाच्या पलीकडे!"

परीनें विचारलें, "काय? क्षितिजाच्या पलीकडे?"

आणि ती खदखदून हसू लागली

कासव आपले शातपणे मार्ग चालू लागले

तिने विचारले, " एवढे लाब जायचे, मग कशाला एवढे ओझे ? ओझे दे टाकून आणि जा धावत !"

कासव म्हणाले, " खुळे परी ! फसेन का असे मी ? ही युगायुगाची कमाई टाकीन बरी मी !"

"कसली रे ही कमाई ?" परीने विचारले

"अनुभवाची, शहाणपणाची !" आणि आपले सुरकुतलेले डोके बाहेर काढून कासव पुढे चालू लागले

परीचा डाव फसला परी चिडली तिने एक भलामोटा दगड घेतला आणि कासवाच्या मार्गात ठेवला कासव थबकले त्याने त्या दगडाकडे पाहिलें आणि त्याला वळसा घालून ते पुन्हा आपल्या ठराविक दिशेनें चालू लागले परीने पुन्हा पुन्हा त्याच्या मार्गात अडथळे टाकले, पण आपले सुरकुतलेले डोके वर करून कासव त्याचा अजमास घ्यायचें आणि पुढे सरकू लागायचे ते पुढे सरकायचे थाबले नाहीं आपली दिशा विसरले नाहीं

अखेर परी कटाळली कासवाच्या पाठीवर लाथाबुक्क्या मारून तिच्या हातापायाना झिणझिण्या आल्या तिने कासवाचा नाद सोडला आणि एका उडत्या पानावर बसून ती तरगत तरगत दूर जाऊ लागली तिची नजर चौफेर फिरत होती

वाटेत एक भिकाऱ्याचे भुकेलेले पोर एकटेच धुळींत बसले होतें. भुकेने रडत होते आपला धुळीने माखलेला आणि खारट कडवट लागणारा अगठा चोखीत होते त्याच्या अश्रूनी परीने आपलें तोंड स्वच्छ केले, आणि मग एकदम आपल्या पर्समधून एक सोन्याचे नाणें काढून त्याच्यापुढे फेकलें

त्या पोराचें लक्ष त्या नाण्याकडे गेले—आणि आश्चर्यानें, अविश्वासानें तें तिकडे पाहू लागलें मग एकदम तें अगठा चोखायचें थाबलें, आणि त्याने त्या नाण्यावर झडप घातली पोरानें नाणें उचलताच तें ताब्याचें झालें. परी खदखदून हसली पण पोराला त्याचें मुळींच वाईट

वाटलें नाहीं आपलें फुगलेले पोट त्यानें आपल्या हाडकुळया हातानी खाजवलें आणि लुटलुटु चालत जाऊन त्याने त्या पैशाचे कुरमुरे घेतले दुकानातल्या अनेक महाग चवदार खाद्यपदार्थाकडे तें पाहात होते, आणि आपण जणु तेच खात आहोत, अशा कल्पनेनें आपल्या हातातले चुरमुरे खात होतें त्यातले काही त्याच्या गालाला नाहीं तर नाकाखाली चिकटत होते आपल्या हाताने ते काळजीपूर्वक ते चुरमुरे आपल्या तोंडात टाकीत होते एखादा चुरमुरा धुळींत पडे, तेव्हा चपळपणे तो वेचून तें चटकन् आपल्या तोंडात टाकायचें तेवढ्यात पोट खपाटीला गेलेले एक कुत्रे जीभ बाहेर लोंबती सोडून त्याच्याकडे धावत आले आपली शेपटी हलवीत आणि जिभेने तोंडाच्या कडा पुशीत ते त्याच्यासमोर उभे राहिलें त्याच्या तोंडाकडे आशाळभूतपणें पाहू लागलें पण मूल आपले खातच होते अखेर कुत्र्याने एक रडका आवाज काढला आणि त्यानें त्या पोरासमोर बैठकच मारली तें पोर विचारपूर्वक त्याच्याकडे पाहात होतें आणि त्याहूनही विचारपूर्वक खात होतें मग त्या पोराच्या डोक्यात काय आले कोण जाणे, त्यानें वेचून नेमके दोन कुरमुरे आपल्या हातात घेतले आणि त्या कुत्र्याच्या दिशेने फेकले कुत्रे एकदम उडी मारून उठलें आणि त्याने लावसटपणे ते दाणे खाऊन टाकले ते मूल गमतीनें हसलें आणि कुत्रेदेखील त्या गमतींत समभागी होण्याच्या हेतूनें भुंकलें त्या पोराशीं अधिक लगट करू लागलें

परीला काय वाटलें कोण जाणे, ती पुढे झाली आणि हात पसरून म्हणाली, “अरे मुला! अरे मुला! देतोस का जरा कुरमुरे मला, खायला मूठभर?”

त्या मुलाने तिच्याकडे आश्चर्यानें पाहिलें आणि एकदम अंग चोरून घेतलें कुरमुऱ्याचा कागद आपल्या पोटाशीं चुरगळून धरला आणि तो म्हणाला, ‘वा ग वा! तुला नाहीं मिळायचे, माझे कुरमुरे!”

परी म्हणाली, “अरे वेड्या! मींच दिले ना कुरमुरे तुला?”

मुलानें पुन्हा तिच्याकडे पाहिलें. आपलें काहीं तरी चुकलें असे त्याला वाटलें. त्यानें एकदम रडवा आवाज काढला आणि तो म्हणाला,

"माई! अवो चष्मेवाल्या माई! पैसेवाल्या माई! भूक लागली गरीबाच्या पोराला भूक लागली पैसा द्या हो माई पैसा द्या हो माई!"

परी म्हणाली, "वेडा रे वेडा! ताब्याचा पैसा कसला मागतोस? कपडे माग! लत्ते माग! पक्वान्ने माग! संपत्ति माग! सुख माग! मागशील तें देईन!"

भिकाऱ्याच्या पोराने आश्चर्यानें तिच्याकडे पाहिले ती काय बोलत होती ते त्याला समजतच नव्हते ह्या असल्या गोष्टी असतात आणि त्या आपल्याला मिळू शकतील, ह्याची त्याला कल्पनाच नव्हती तें पुन्हा तोंड वेगाडून म्हणाले, "माई! पैसेवाल्या माई! एक पैसा द्या ना!—एक पैसा! कुरमुरे घेईन, पोटभर खाईन! द्या ना पैसा! द्या ना पैसा!"

परी त्याच्याकडे पाहात राहिली. तिला एकदम अपराध्यासारखे वाटू लागलें पख चिकटल्यामुळे खरडत चालणारी माशी तिच्या नजरेसमोर दिसू लागली तिच्या नकळत ती जमिनीच्या जवळ जवळ येऊ लागली पण जमिनीला स्पर्श होण्याच्या आतच तिनें स्वत:ला सावरलें आणि स्वत च्या डोळ्यावरचा चष्मा काढून घेतला एक गूढ हास्य करून ती तेथून अदृश्य झाली

तेथून ती दूर दूर गेली जेथें भिकाऱ्याची पोरे नव्हतीं, जेथे वर्दळ नव्हती, अशा ठिकाणीं ती गेली कातरलेल्या बागा, आखलेले रस्ते, रेखीव बगले आणि ह्या सर्वातून उतू जाणारे वैभव एका बगल्यात दुलदुलीत कोचावर एक थुलथुलीत अगाचा माणूस बसला होता त्यानें पायाची अढी घातली होती आणि रेशमी विजारीच्या इस्तरीच्या घडीखाली बूट चकचकत होते त्याच्या पोटाच्या घडीवर तलम टाय रुळत होता त्याच्या तुकतुकीत चेहऱ्याभोंवतीं चिरुटाचा धूर भपकारत होता. त्याचा एक हात एका तरुणीच्या वक्ष स्थलावर होता आणि दुसरा टेलिफोनवर होता शेअर्सचे आणि इतर वस्तूचे भाव काय आहेत तें तो विचारीत होता. परी टेलिफोनवर बसली

तो मनुष्य म्हणाला, 'हलो! काय ग परे! केव्हा आलीस? मला वाटल कीं तू ओळख विसरलीस."

तो आपल्याला ओळखतो, असे पाहून परीला बरे वाटले ती म्हणाली, "पैशाच्या धुंदीत, भोगाच्या कैफात, ओळख बरी ठेवलीस माझी!"

"तुझी–माझी मैत्री किती तरी जुनी त्यामुळे तर मिळाली ही संपत्ति!" त्या मनुष्याने लठ्ठ मानेत रुतलेली कॉलर चाचपली मग तो अधाशीपणाने म्हणाला, "बोल, काय बातमी?"

परी काहींच बोलली नाही ती नुसती हसली आणि तिने पाय हलवले

मनुष्य म्हणाला, "परे! परे! जाऊ नको कुठे राहा ना गडे बंगल्यात माझ्या लोळत ठेव ना सुखात मला!"

परी दुष्टपणानें हसली आणि म्हणाली, "संपला आपला जिव्हाळा येईल आता उन्हाळा तरी सावध राहा बाई, सावध राहा!"

तो माणूस म्हणाला, "कोणी वैभवात लोळावें, कोणी दारिद्र्यानें पोळावें, ही जगाची रीत देवाचा न्याय जगरहाटीचा आस त्यातला मी भाग्यवंत, देवाचा मानसपुत्र तू माझे काय करणार? वैभवाकरिता मी, माझ्याकरिता वैभव!"

परी मिश्किलपणें टेलिफोनची घंटी वाजवीत म्हणाली, "सट्टा बुडेल"

तो आळस देत म्हणाला, "दिवाळे काढीन"

आणि त्यानें टेलिफोन उचलून एक सौदा केला.

"कंट्रोल बसेल" तिला वाटले, आपण त्याला पेचात पकडलें

"काळा बाजार करीन!" तो निगरगट्टपणे म्हणाला

"पकडला जाशील" तिनें धमकी दिली

"लाच देईन" तो म्हणाला

"अब्रू जाईल" तिनें चिडून म्हटले

"वैभवाची बटीक अब्रू आणि मी तर असा गब्रू कशी जाईल सोडून? कशी जाईल टाकून?" तो खदखदा हसला

परीला वाटलें कीं त्याचें अशक्त हृदय बंद पाडावें, दुसऱ्या दिवशीं त्याच्या विमानाला अपघात करावा आणि त्याचें जीवन चिरडून टाकावें किती सोपे होतें! किती छान होतें! त्या कल्पनेच्या काडीनें तिनें आपलें

मन कोरलें आणि मग सहजगत्या ती काडी फेकून दिली एकदम तिचा बेत फिरला ती त्याच्या टायचें टोक ओढीत म्हणाली, "देतें तुला वैभव किती हवे? इतके? इतकें? इतके?"

आळशीपणाने कोचावर रेलत तो म्हणाला, "आणखी, आणखी "

परी आश्चर्याने तोंडावर हात ठेवून म्हणाली, "इतका पैसा? इतकी सपत्ति? कशाला रे हवी?"

चिरूटाचे भपकारे सोडीत आणि तरुणीच्या वक्षस्थलावरून हात फिरवीत तो तारवटल्या नजरेनें म्हणाला, "आणखी—आणखी—आणखी "

परी टुणकन् उठली चिरूटाच्या धुराच्या वेटोळ्यावरून सावकाश गरगरत वर गेली आणि मग टेलिफोनच्या तारेवरून मजेंत सरकत दूर दूर गेली शहरी जीवनाच्या फिरत्या चक्राकडे मिश्किलपणें पाहात, त्याचे झिजलेले दाते निखळून काढीत, सपत्तीचा ओघ इकडून तिकडे फिरवीत, आशेच्या वावड्या उडवीत, आपल्या हातातील छत्री इकडून तिकडे करीत, ती गेली

आणि एका कारखान्याच्या आवारात, यत्रातल्या चकाकत्या नळीवर बसली पाय हलवीत इकडेतिकडे पाहू लागली चक्रें गरगरत होतीं मोठाले पट्टे गिरक्या घेत होते यत्राचे भाग उचलले जात होते आणि पुन्हा खाली पडत होते खट् खट् धातूचे पत्रे कापले जात होते मग ते पकडले जात होते त्याना आकार दिले जात होते यत्रातले नाजुक भाग पुढेमागे सरकत होते तेलाचे थेब गळत होते कुठे तरी पडून जागच्या जागी थरथरत होते सारीं यंत्र आणि सारी जमीन थरथरत होती, आणि एकाच ठराविक लयींत आवाजाचा चढउतार होत होता. त्या यत्राच्या आवाजात आणि हालचालीत जरा फरक झाला की मळकट पोषाख चढवलेले इजिनिअर धावत होते सगळ्याच्या माना वळत होत्या कामे बद पडत होतीं, आणि ती कामे सुरू होईपर्यंत सगळेजण कावरेबावरे होत होते आणि यत्र सुरू झालें कीं त्याच्या तोंडात हव्या त्या वस्तू पुन. आज्ञाधारकपणें देत होते

यत्र गिरक्या घेत, हिसके देत, आपल्या लयदार आवाजात म्हणत होतें, "आणखी, आणखी "

आणि सगळेजण घाम गाळीत आणि डोळ्यात तेल घालून त्याला आणखी खाद्य पुरवीत होते वेड्या यत्राची ती भूक आणि शहाण्या माणसाची ती पुरवायची तत्परता पाहून परीला खदखदून हसू आलें

घामेजल्या अगाच्या एका कामगाराला ती यत्राच्या लयीवर म्हणाली, "थाब थोडा थाब गप्पा मारू, थाब "

कामगाराने यत्रावर खिळलेली आपली नजर फिरवली नाहीं त्याच्या तोंडात धातूच्या पट्टया कोबायचें काम त्याने थाबवलें नाहीं तो म्हणाला, "काम चाल्लें पाहिजे यत्राच्या तोंडात पट्टी कोंबली पाहिजे. मिनिटाला पाच पट्टया! कमी नाहीं, जास्त नाहीं बरोबर पाच पट्टया!"

"पट्टयाचें काय होते?" परीने विचारले

"पट्टीची चौकट होते " कामगार थडपणें म्हणाला

"प्रत्येक पट्टीची?"

"सगळ्या पट्टयाची "

"चौकटीचें काय होते?" परीने विचारले

"त्याची माहिती मला नाहीं पुढच्याला विचारा चौकट पुढे जाते. पुढच्याला विचारा " कामगार यत्राच्या तोडात पट्टी कोबीत म्हणाला

"रोज हेंच करायचे? सारखे हेंच व्हायचें?" परीला तें कटाळवाणें वाटलें

"वा वा! असे कसे? नवें यत्र आणायचें पुष्कळ काम करायचें"

"आणि मग?" परीचें समाधान झालें नाहीं

"आणखी मोठे यत्र, आणखी खूप खूप काम " कामगार काहींसा चिडून म्हणाला

"पण हा सगळा खटाटोप कशाला?" परीचा चौकसपणा सपेना

"तें मला ठाऊक नाहीं. तें मला माहीत नाहीं त्याना विचारा, त्याना विचारा." त्यानें यत्र पुसलें. साफ केलें त्याच्या तोंडात एक पट्टी कोंबली.

"किती तुझी हुषारी! किती तुझी सफाई!" परी त्याच्याकडे कौतुकाने पाहात म्हणाली

"यंत्रासारखी यंत्रासारखी" तो खुषींत येऊन म्हणाला आणि त्याने आपल्या हाताची अधिक सफाईदारपणें आणि यांत्रिकपणे हालचाल करायला सुरुवात केली

परीच्या मनात एक दुष्ट विचार आला तिनें त्या कामगाराच्या चेहऱ्यावर किरण पाडला क्षणभर त्याचें चित्त विचलित झाले त्याच्या यांत्रिकपणे काम करणाऱ्या हाताने थोडी चुकी केली आणि त्या अधाशी यंत्रानें कटकन् त्याचा अंगठा तोडला आणि गिळून टाकला त्या अंगठ्याचीहि चौकट करण्याचा ते प्रयत्न करू लागलें आणि तें जमेना तेव्हा तो रक्तमांसाचा अंगठा त्याने निरुपयोगी म्हणून टाकून दिला

किंचाळी फोडून आणि भोवळ येऊन तो कामगार खाली पडला. त्याच्या हातातून भळभळा रक्त वहात होतें

पण त्याची किंचाळी यंत्राच्या गोंगाटात कोणाला ऐकू गेली नाहीं

"यंत्र बंद करा यंत्र बंद करा" कोणी किंचाळलें पण यंत्र बंद झाले नाहीं खाद्य मिळत नव्हते तरी त्याच्या तोंडाची उघडमीट चालूच होती, आणि त्यातून रक्ताचे थेंब गळत होते

कामगाराला बाहेर नेण्यात आले (त्याचा अंगठा जसा यंत्राच्या दृष्टीने निरुपयोगी ठरला होता, तसा तोही आता यंत्राच्या दृष्टीनें निरुपयोगी ठरला होता)

परीनें त्याच्या सांडलेल्या रक्तानें आपले ओठ रंगवले आणि यंत्राच्या एका फिरत्या पट्ट्यावर चढून ती हवेंत उडाली, आणि एका उडत्या कागदावर बसून दूर दूर जाऊ लागली मग तो कागदाचा कपटा एका चाळीच्या खिडकींतून आत गेला आणि जमिनीवर पडला. परी टुणकन् उडी मारून विजेच्या दिव्याच्या बटनावर बसली

कारकून बायकोला सांगत होता, "१००–१५–२५०, हें माझं स्केल"

"१००–१५–२५०?" बायकोनें न समजता विचारले

"होय, १००–१५–२५० नाहीं पेन्शन, आहे फड" कारकुनानें सावकाश समजावून सांगितलें

"१००–१५–२५०? पण मला पातळ हव छान दिमायगा बायकात मिरवायला माझी पातळ फक्त चार शेजारणीची आठ रेशमी चार, जरीची चार मला पातळ हव जरीच हव! उची हव! देता ना?"

"मला काय विचारतेस? पगाराला विचार! १००–१५–२५०" कारकून उद्विग्नतेने म्हणाला

"शेजारणीची तेवढी आठ माझीं मात्र चार" बायको हिरमुसली झाली

"त्रास नको देऊ मला लागू दे कामाला" कारकून तिला झिडकारून म्हणाला

"काम कसल?"

"ऑफिसच"

"बघू दे मला"

"नाहीं समजायच तुला"

"बाई! बाई! बाई! Byt रेघ 2344? ह्याचा अर्थ काय?"

कारकुनानें सफाईने फायलीचे कागद उलटले आणि एका कागदावर हात ठेवून तो म्हणाला, "त्याचा अर्थ हा"

"आणि ह्याचा अर्थ?" बायकोचा चौकसपणा वाढला

'नोट आहे ही बी एम् ला सी एम् ची"

"बी एम् ला? सी एम् ची?"

"कन्साइनमेंट पाठवा मालाची"

"पण ह्या सगळ्याचा अर्थ काय?" बायकोनें अधिकच गोंधळून विचारले

"ऑफिस म्हणजे तू समजलीस काय? मोठमोठ्या फायली लेजरें जाडीं जाडीं आफिसराची राग—सी एम् पर्यंतची उलाढाली, देवघेवी"

"मला नाहीं समजल मला एवढच समजल की, १००—१५—२५० ” बायको निराशेने म्हणाली

परीला देखील तितकेच समजले कारकुनाच्या बायकोला जरीचें पातळ हवे हे तिला अधिक समजले तिने त्या कागदाच्या कपट्याला छत्रीचे टोक लावलें, आणि त्याचें एकदम एक पत्र झालें

कारकुनाच्या बायकोचे तिकडे लक्ष गेले ती ते उचलून म्हणाली, "हे बघा काय ते ”

"आण ते इकडे ” कारकुनानें काळजीपूर्वक त्या पत्राची बाहेरून तपासणी केली त्याला कसली तरी आनदाची शका आली काहीं तरी तो बोलणार होता पण त्यानें ओठ घट्ट दाबून धरले आणि पत्र वाचले आणि मग तो आनदानें पटकन् खाली बसला

"काय झाल ? काय झाल ?” बायकोने विचारले.

"दहा हजार ! दहा हजार ! ” कारकून बरळला

"दहा हजार ? ” घाबरून बायकोने फायलीकडे पाहिले

"अग वेडे ! शब्द कोडे सोडवलें दहा हजार मिळाले दहा हजार मिळाले दहा हजार ! ” कारकुनाने डोकें घट्ट दाबून धरलें

"जरीचीं पातळ. सोन्याचे दागिने कामाला चाकर बसायला मोटर ! ” कारकुनाची बायको आनदानें नाचू लागली

"हट् वेडे ! असे का चाळे करायचे ? चाळ काय म्हणेल ? १००—१५—२५० ! ” कारकून घाबराघुबरा होऊन म्हणाला

बायको हिरमुसली झाली तेवढ्यात परी तिच्या कानात कुजबुजली, 'जरीच पातळ '

बायको म्हणाली, "पातळ तरी आणा ”

कारकून उत्साहाने म्हणाला, "हो हो ! चला चला ! ”

कारकुनाच्या बायकोच्या अबाड्यावर गुलाबाच्या फुलासारखी बसून परी बाहेर पडली, आणि थोडे पुढे गेल्यावर तिने एका कोऱ्या करकरीत मोटारीच्या फडफडणाऱ्या निशाणावर झेप घेतली एका देशभक्ताची मोटार होती ती देशभक्ताना डुलकी येत होती परी हळूच मोटारींत

देशभक्ताच्या जवळ गेली आणि तिने त्याना आपल्या छत्रीने डिवचलें. देशभक्ताना स्वप्न पडले कीं, आपल्याला प्रधान करण्यात आलेले आहे ते झोपेतच वडबडू लागले, "दलितवर्ग पिडलेली जनता सेवे-करिता सत्ता पुढाऱ्याचें चारित्र्य हिंदी सस्कृतीचे पावित्र्य जनतेचे बळ जनतेची सेवा दलितवर्ग! "

परीने कानात फुकर मारून त्याना जागे केले त्यानीं दचकून इकडे-तिकडे पाहिलें ते प्रधान झालेले नव्हते, हें त्याच्या ध्यानात आलें ते हिरमुसले झाले, पण ताबडतोब पुढाऱ्याला योग्य असे स्मित त्यानी चेहऱ्यावर आणलें

परी मोटारीच्या दाराच्या चकचकीत हॅडलवर बसून म्हणाली, "करीन जर मी जादू होशील प्रधान तर तू!"

"खरे म्हणतेस तू? अशी आहे तुझी जादू? सत्ता देशील मला? सत्ता! सत्ता!" पुढाऱ्याचे डोळे फाटले आवाज चिरका झाला

"हा हा, वाटेल तितकी सत्ता! पण हवी कशाला तुला इतकी सत्ता?" परीनें खोडकरपणें विचारलें

"सत्ता! हजारों, लाखो, क्रोडो माणसावर सत्ता—जीविते चिरडण्याची, वाकविण्याची सत्ता इतिहास घडविण्याची सत्ता परिषदा, घोषणा, कवायती, मिरवणुका—"

"असे असे!" परी हनुवटीवर हात ठेवून म्हणाली

देशभक्त एकदम शरमल्यासारखे झाले. "नाहीं नाहीं. सेवा दलितवर्गाची सेवा—ध्येयें—मूल्यें—स्वप्नें! "

परी खदखदून हसली पण आता देशभक्त चागले सावध होते ते मुळींच शरमले नाहींत. उलट ते तुच्छतेने म्हणाले, "तू इवलीशी. देशील सत्ता कशी?"

असे ते म्हणत आहेत, तोंच परी अदृश्य झाली आणि कुठून तरी दगड येऊन देशभक्ताच्या मोटारीची काच फुटली काचेचा तुकडा त्याच्या गालात शिरून रक्त वाहू लागले

रक्त पुसताना देशभक्ताना वाटलें, तेवढीच प्रसिद्धि. आणखी एक

फोटो आणखी एक पत्रक सहानुभूतीच्या तारा !

त्याच्या मनातले हे विचार समजताच परीला हसू आले आणि तें गूढ हास्य तोंडावरून पुशीत ती दूर दूर निघून गेली

वाटेत पुन्हा तिला तें कासव भेटले अगदीं थोडें पुढे गेलें होतें तें पण सावकाश, निश्चयाने तें चालले होते त्याच दिशेनें चाललें होतें

"काय रे कासवा? क्षितिजाच्या पलीकडे पोहोचलास का?" परीनें थट्टेनें विचारलें

"पोंचेन पोंचेन" ते म्हणालें आणि पुढे सरकत राहिले

यत्राचा अधाशीपणा, गरीबाची लाचारी, श्रीमताची मग्रूरी हे सगळे मोठाले अडथळे ओलाडून पुढे जाण्याच्या ईर्षेने ते पुढे सरकत राहिलें.



# ५. चेटुक

विश्राम साठे उंच, सडपातळ आणि देखणा होता तो आपले काम झराझर करायचा, ऑफिसात सगळ्यांच्या उपयोगी पडायचा आणि हसत-मुखानें गमतीदार बोलायचा त्याच्या चांगुलपणाचा सगळेच फायदा घेत असत आणि त्याच्या हसरेपणावर खूष असत मात्र सगळ्याना वाटायचें असे की, आपण त्याच्या चांगुलपणावर खूष आहोत

इतराप्रमाणें आफिसात नवीन आलेली वसुधरा काळे देखील त्याची मदत घेत असे इतराप्रमाणेंच नव्हे, तर इतराहून जास्त कारण तिची बुद्धि मद्दड होती पुळणीतून जाणाऱ्या खटाऱ्याच्या अवजड चक्रा-प्रमाणे ती सावकाश अडखळत काम करायची, हें सगळ्याना माहीत होतें पण तिचें विश्रामवर प्रेम होतें हे कोणालाच माहीत नव्हतें खुद्द तिला देखील

—वसुधरा काळेने ऑफिसात येऊन फायलीशीं तासभर खटपट केली कागदावर कांहीं तरी खरडलें खोडलें पुन्हा खरडले तिनें फायलींची पानें उलटींसुलटी केली केसातून पेन पुन्हा फिरवले आणि मग उठून ती विश्रामकडे गेली ती विश्रामला म्हणाली, "हें बघा हो" विश्रामनें तें हातात घेतलें आणि तो हसत म्हणाला, "वा! छान खोडाखोडा केलीय् की तुम्हीं आता थोडसच खोडायच्च राहिल आहे, तें खोडून टाका म्हणजे होईल झक्क ममुदा तयार"

आजुबाजूचे सगळे लोक हसले वसुधरेला त्यात हसण्यासारखे काय

झालें तें समजेना तिचा चेहरा थंड, निर्विकार राहिला पण विश्राम आपल्याकडे पाहून हसत आहे असे जेव्हा तिच्या ध्यानात आलें तेव्हा ती सावकाश, स्वत च निराळे हसली तिचा खालचा ओठ विलग झाला आणि तिचे कळकट मोठे दात दिसले ती म्हणाली, "पॉहॉ नॉ हो त्यॉत कॉय चुकलॉय तें"

तिचा जाड आवाज लाडिकपणाने खरखरीत झाला होता

विश्राम म्हणाला, "हे पाहा, मी आता जरा कामात आहे मग सध्याकाळीं बघेन मी ते"

"नको आताच बघा ना फार वेळ नाहीं लागायचा" तिच्या जाड आवाजातल्या सथ बोलण्यात कटाळा आणणारा, दुसऱ्याची इच्छा-शक्ति झिजवून टाकणारा, आग्रह असे

विश्राम त्रासिकपणे म्हणाला, "नाहीं कस म्हणता? बराच वेळ लागेल त्या कामाला"

"नाहीं हो होइल लवकर!"

तिच्या जाड आवाजात पुन्हा तोच हतबुद्ध करणारा आग्रह होता. जें बुद्धीला पटणारें होते ते ग्रहण करायला तिचें मन तयार नव्हते. सभ्यतेमुळे वाटणारा संकोच तिला वाटू शकत नव्हता अमुक एक गोष्ट आपल्या हिताची आहे हे कुठल्या तरी अज्ञात प्रेरणेनें तिला कळत होते आणि खडी दाबणाऱ्या वाफेच्या रुळाप्रमाणे, तिची जड बुद्धि ती पुनरुक्तीने मिळविण्याचा प्रयत्न करीत होती अनेक निर्बुद्ध माणसा-प्रमाणें दोन गोष्टीत तिचे सामर्थ्य साठवलेलें होते दुसऱ्याविषयीं सहानुभूति दाखविण्याइतकी सवेदनाक्षमताच अगात नसल्याकारणाने ती पूर्णपणे स्वार्थी होती आणि कुठच्याहि गोष्टीचा कटाळा येण्याइतकी चपळ बुद्धि नसल्याकारणाने तिच्या अगात विलक्षण चिकाटी होती

ती बोलायची थाबली तरी तिची दुहेरी हनुवटी बोलतच राहिली. तिचें तिथे नुसते उभे राहणेच आग्रह करीत राहिले विश्राम साठे चिडला रागानें त्याने टेबलावरचे कागद इकडेतिकडे केले मग निश्चयानें वसुधरेकडे दुर्लक्ष करून तो आपले काम करू लागला. पण मिनिटभर

झालें तरी त्याच्या टेबलावर पडलेली ती काळीं सावळी हलली नाहीं

विश्रामला एकदम चमत्कारिक वाटायला लागलें ती सावली आपल्याला गुदमरवून टाकीत आहे असा त्याला भास झाला सगळ्या लोकाच्या नजरा आपल्यावर खिळल्या आहेत असे त्याला वाटू लागलें. ह्या मुलीला विरोध कसा करायचा तेच त्याला समजेनासे झालें.

तो भित्रेपणाने म्हणाला, "बरे द्या ते कागद इकडे "

"लवकर द्या ह बघून " वसुधरेनें त्याला बजावले जणु तिचें काम करायची जबाबदारीच त्याच्यावर होती लोकानी आपली कामे करावी हें तिला अगदीं नैसर्गिक वाटत असे, आणि आपले काम कोणीं केले नाहीं कीं तिला विलक्षण राग येत असे

सावकाशपणे वसुधरा पुन्हा आपल्या जागेकडे गेली तिचे शरीर पुष्ट—वासनेनें भारावलेलें—होते तिच्या घाटदार नितबाची आणि पोटऱ्याची गोलाई होती ती वासनेची आणि तिच्या भरदार शिसवी वक्ष.स्थलाचा उद्धटपणा होता तो देखील वासनेचाच तिचीं गालफडे रुद होतीं, आणि तिच्या मोठ्या डोळ्यापैकीं एक नेहमीं अर्धवट मिटलेला असे त्या अर्धवट मिटलेल्या डोळ्यात साऱ्या पुरुष जातीवर चेटुक करणारे अमानुष सामर्थ्य होते

ठाशीव भारावलेल्या हालचाली करीत ती जागेकडे परतली तेव्हा अभावितपणें विश्रामचे डोळे तिच्यावर खिळून राहिले होते त्याला वाटलें कीं, ती म्हणजे नुसतें शरीरच आहे त्याने चोरटेपणानें आजुबाजूला पाहिलें, तेव्हा त्याच्या ध्यानात आले कीं, सगळ्याच्या नजरा तिच्यावर खिळलेल्या आहेत, आणि ऑफिसातल्या मुली तेवढ्या आपापल्या कामात फारच गढून गेल्या आहेत

विश्रामच्या दृष्टिक्षेपामुळे आपण काय करीत आहोंत तें सदुभाऊ शिरनाम्याच्या ध्यानात आलें त्यानीं मागे सरकवलेली टोपी पुढें ओढून आपलें डोके पुरतें झाकलें उघडें केलेलें शर्टचें बटन उगीचच लावल्यासारखे केलें. जाडजूड जाधवानीं तिच्यावरची नजर न काढताच खिशातून डबी काढून तपकीर नाकात कोंबली, आणि मग त्याचे डोळे

मिटून त्याना थोडा वेळ तद्री लागली फाजील बामबोटने एक डोळा अर्धवट मिटून विश्रामकडे पाहात मान हलवली, आणि किडकिडीत पडित लगबगीने उठून कुठेसे बाहेर गेले आज कित्येक वर्षे ते असेच लगबगीनें बाहेर जात होते पण ज्या गोष्टीपासून ते असा निसटण्याचा प्रयत्न करीत होते ती अजून त्याच्या मानगुटीला तशीच बसली होती त्याना अजून मूल झाले नव्हते

कामात गढलेल्या मुलींनीं चोरटेपणाने वर पाहिलें आणि पुरुषाच्या नजरा कुठे लागल्या आहेत ते पाहून त्या कामात चूर झाल्या

वसुधरा आपल्या जाग्यावर जाऊन बसली तिने टेबलावरच्या फायली चिवडल्या आणि वेडींवाकडी तोंडे करीत पेन्सिलीने डोके खाजवले

तिची ती कृति पाहून विश्रामला एकदम तिटकारा वाटला, आणि त्याने आपल्या कामाकडे पुन्हा नजर वळवली पण तेवढ्यात कृश, गोड लता आपटेनें त्याच्याकडे ज्या विचित्र नजरेने पाहिले ती त्याच्या डोळयानी आपोआप टिपून घेतली व तो अधिकच अस्वस्थ झाला

विश्राम आपल्या कामात मग्न झाला तशी त्याच्या मनातली ही अस्वस्थता झरून गेली आपल्या जीवनाचा जो रेखीव छोटासा बगीचा तो फुलवीत होता त्यात त्याचे मन प्रसन्नतेने येरझारा घालू लागले मुबईत ह्या जागेच्या टचाईच्या दिवसातहि त्याने छोटीशी दोन खोल्याची जागा मिळवली होती तथे त्याने आपल्याला आवड-णारी आरामखुर्ची आणून ठेवली होती छोटेसे टेबल आणि त्यावर चकाकते पेपरवेट सोफा सेट घ्यायची त्याची महत्त्वाकाक्षा होती अशी सजावट जमल्यावर त्या खोलीत आणखी कोणी तरी येणार होते. कोण बरे होती ती? कशी दिसत असेल ती? कशी चालत असेल? कशी बोलत असेल? तिच्या पातळाची सळसळ, तिच्या बागड्याची किण-किण, तिच्या केसातल्या टपोऱ्या गुलाबकळीचा तिरपा डोल—सारें त्याला दिसल्यासारखे वाटत होतें आणि तरी नीट दिसत नव्हते

विश्रामच्या एकदम ध्यानात आले की आपण लता आपटेकडे पाहात आहोंत आणि लाजून त्यानें मान वळवली तेवढ्यात ती सावली पुन्हा

त्याच्या टेबलावर पडली, अंगावर पडली त्यानें दचकून वर पाहिलें.

वसुंधरा काळे त्याच्यासमोर उभी होती आपल्या छायेच्या टापूतल्या साऱ्या वनस्पतींना करपवून टाकणाऱ्या एखाद्या प्रचंड वृक्षासारखी ती त्याला वाटली

आपल्या जाड, सथ आवाजात ती म्हणाली, "झालं?"

"हो हें घ्या ना" विश्राम धादरटपणे म्हणाला

"हें आता मी पुन्हा लिहून काढू ना?"

"कशाला?"

"नाही पण ते पुन्हा लिहून काढायला हवं" ती मद्दडपणे म्हणाली

"उगीच वेळ फुकट जाइल" विश्रामनें अधिक खुलासा करण्याचा प्रयत्न केला

"वा! वेळ कसा फुकट जाईल? मी लिहीत बसेन ना!" ती आपल्या पद्धतीने पुढे विचार करीत म्हणाली सर्वसामान्य लोकांच्या तर्कशास्त्रापेक्षा तिचें तर्कशास्त्र वेगळे होते इतरांचे विचार तिला पुष्कळदा समजत नसत आणि जें समजत नाहीं ते समजून घेण्याचा प्रयत्न करण्याची तिची वृत्ति नव्हती तिचें अंतर्जीवन स्वयपूर्ण होते. एकमार्गीपणानें ती तेंच जगत होती

विश्राम काहींच बोलला नाही, तेव्हा ती म्हणाली, "वेळ कसा फुकट जाईल? मी लिहीत बसेन ना!"

"बरोबर आहे तुमचं" विश्राम हतबुद्धपणें म्हणाला.

"मग तुम्ही कसं म्हणालात वेळ फुकट जाईल म्हणून?" तिच्या मनाचा रूळ त्याच गोष्टीवरून पुन्हा पुन्हा फिरत होता!

विश्राम काहींच बोलला नाहीं जागच्या जागीं चुळबुळत राहिला. तिला दूर ढकलून द्यावें असे त्याला वाटत होते पण त्याला तें जमेना. सर्वसामान्य माणसाइतकी त्याची इच्छाशक्ति तीव्र होती. आणि ती उपयोगात आणायचे सर्वसामान्य मार्ग त्याला अवगत होते. पण ते सगळे येथें बोथट ठरत होते.

हतबुद्धपणे तो जागच्या जागी चुळबुळत राहिला पण त्याच्यावर पडलेली ती सावली स्थिरच होती आणि विलक्षण सामर्थ्याने त्याची दृष्टि त्या शिमवी वक्ष स्थलाकडे ओढून घेत होती शिपल्यात चिकटलेल्या प्राण्याला कोणी बाहेर ओढून काढावे त्याप्रमाणे

वसुधरा काळेला ह्या गोष्टीची दादच नव्हती तिला काही तरी बोलायचे होते ते ती आठवत होती आणि आठवण होईपर्यंत ती साहजिकच तेथे तशीच उभी राहणार होती ह्यात काहीं अयोग्य आहे असे तिच्या एकमार्गी मनाला वाटूच शकत नव्हते

अखेर गुदमरून गेलेल्या विश्रामला ती म्हणाली, "तुम्हीच कस हें काम चटकन् करता ?"

' तसच " विश्राम म्हणाला

"अ ? सागा ना ! कस जमत हे तुम्हाला ?" तिनें पुन्हा तोच प्रश्न केला

"बर जा आता तुम्ही मला काम आहे " विश्राम धीर करून जरा मोठ्यानेच म्हणाला

वसुधरेच्या मनावर त्याच्या बोलण्याचा काहीं परिणामच झाला नाहीं. ती आपल्या पद्धतीनें त्या प्रश्नाचें उत्तर शोधीत होती अखेर ती म्हणाली, "तुम्ही खूप वाचता, म्हणून तुम्हाला जमत हें काम होय ना ?"

"होय, होय " विश्राम म्हणाला

वसुधरा सावकाश हसली ती पुन्हा एकदा विश्रामच्या नजरेला नजर भिडवीत म्हणाली, "तुम्ही खूप वाचता म्हणून "

तेवढ्यात तिच्या अर्धवट मिटलेल्या डोळ्यानें चेटुक केलें आणि विश्राम मत्रमुग्धपणे तिच्यावर नजर खिळवून राहिला एक आगीचा लोळच्या लोळ त्याच्या अगातून धावला. आणि आपल्या घाटदार नितबाच्या सथ हालचाली करीत जेव्हा वसुधरा आपल्या जागेकडे गेली तेव्हा तोहि फरफटत तिच्या मागोमाग गेला

ती गेल्यावर त्याच्या शेजारीं बसलेला गुप्ते म्हणाला, "काय रे, तुझ्या-वर मर्जी दिसते आहे !"

आणि बामब्रोटने छातीवर हात ठेवून बेहोष पडल्याचा असा काहीं अभिनय केला की सारे लोक खिदखिदले

विश्रामच्या इच्छेविरुद्ध तिचा त्याच्याशीं संबंध जोडला गेला होता ती सावली त्याला चिकटली होती त्याच्या जीवितावरून तो जड रूळ फिरू लागला होता

विश्राम चिडला इतक्या निर्बुद्ध मुलीला आपल्या ऑफिसात नोकरीला ठेवावे ह्याचा त्याला राग आला तिचा वशिला वगैरे काही नव्हता पण नोकरीकरिता ती मॅनेजरसाहेबांना येऊन भेटली होती बाईमाणूस म्हणून त्यांनी तिला बाहेरच्या बाहेर परतवले नव्हते आणि ती आत आल्यावर 'मग या, पुढं पाहू—' अशी सभ्य शब्दात तिची बोळवण केली होती पण ती खरोखरच पुन्हा आली आणि मग पुन्हा आली मॅनेजरसाहेबांना चमत्कारिकपणे भुरळ पडल्यासारखे झाले आणि ऑफिसात एक जागा रिकामी झाली तेव्हा त्यांनी तिलाच घेतले लोंबत्या पोटाचे ते खेकसणारे गृहस्थ वसुंधरेशी मात्र मवाळपणे, काहींशा लाचारीने वागत

विश्रामला ते सारे माहीत होते आणि त्याची आठवण झाल्यावर त्याच्या रागाचे भीतींत रूपांतर झाले

त्यानंतर पुन. विश्रामने आपले लक्ष कामात गुंतवलें आणि काम करता करता मॅनेजरसाहेब आपल्यावर कसे खूष आहेत, आपल्याला बढती मिळण्याची कशी शक्यता आहे, त्याचे सुखदायक विचार त्याच्या मनात घोळू लागले. आपण सध्याकाळीं बॅडमिंटन टूर्नामेंटमध्यें कसे सफाईदार खेळणार आहोत त्याची सुखदाय चित्रे त्याच्या नजरेसमोर उभी राहू लागली त्याच्या आशा पुन' पालवू लागल्या तेवढ्यात त्याच्या टेबलावर पुनः सावली पडली

तो एवढ्यानें दचकला की त्याचे टेबल हललें पण त्याने वर पाहिले तो बामब्रोट त्याच्यासमोर उभा होता, तो म्हणाला, "काय तात्या? यवडा घाबरते कश्याला?"

आणि मग ते दोघे खदखदून हसले. विश्राम तर फारच मोठ्याने

हसला—फारच

दुपारी चहाच्या वेळीं विश्रामची लता आपटेशी चुटपुटती भेट झाली हातात डबा घेऊन ती चहाच्या खोलीकडे जात होती

विश्राम तिला म्हणाला, "एकट्याएकट्यान खाता काय?"

तशी ती खारीसारखी भित्री पोर एकदम चपापून उभी राहिली अभवितपणे तिने डब्याचा हात पाठीमागे लपवला

विश्रामला तिच्या घाबरटपणाची गमत वाटून तो हसला आणि मग ती पण हसली

"अजूनसुद्धा बोलावत नाही आहात तुम्ही मला" विश्राम थट्टा पुढे चालवत म्हणाला

लता अजीजीने म्हणाली, "आज मीं फक्त चपाती आणली आहे उद्या शिरा आणीन तुमच्याकरिता, ह?"

"बर तस पण आज माझ्याबरोबर चहा घ्यायला काय हरकत आहे?" विश्रामला खोल पोटात कुठे तरी गुदगुल्या झाल्या

लता लाजली अधोवदन झाली आणि वाकलेल्या फांदीवरून लाल देठाचे पारिजातकाचें फूल अलगद गळून पडावें तसा तिच्या तोडा-तून शब्द आला, "नको"

विश्राम तितक्याच हलक्या आवाजात म्हणाला, "बर, बर नको" लतानें पटकन् मान वर करून विश्रामकडे विश्वासाने पाहिले

तेवढ्यात गुप्ते तेथे येऊन विश्रामच्या पाठीवर थाप मारून म्हणाला, "काय रे लेका! चहा घ्यायला येणार की नाहीं?"

विश्रामने दचकून त्याच्याकडे पाहिले आणि लता खारीसारखी तेथून पळाली अदृश्य झाली

विश्राम आणि गुप्ते जिना उतरून चहा घ्यायला निघाले पुढे चालणारी वसुधरा दिसली, तशी अभावितपणें त्याने आपली गति कमी केली ती इतकी की, गुप्ते त्याला म्हणाला, "का रे? असा रेंगाळतो आहेस काय?"

"कुठे काय!" विश्राम म्हणाला. आपल्या रेंगाळण्याचें कारण

गुप्तेच्या ध्यानात येऊ नये, असे त्याला तीव्रतेने वाटत होते

तेवढयात वसुधरा काळेच्या मागून चालणाऱ्या एका छाकटया पोराने डबल शिटी मारली आणि तो मोठ्याने म्हणाला,—

"घोण आहे साली घोण!"

गुप्तेनें ते पाहिले आणि तो पुढे सरसावला आणि तो पुढे सरसावला म्हणून विश्रामहि पुढे झाला तेवढयात वसुधरा मागे फिरली तिनें पायातली चप्पल काढली आणि त्या छाकटया पोराचा दंड पकडून तिनें त्याला फडाफडा मारायला सुरुवात केली तो पोरगा भेदरून जागच्या जागीं खिळला त्याच्या तोंडातून शब्द फुटेना दर प्रहारागणिक त्याचें तोंड इकडचे तिकडे होत होते गालावर हिरवे-निळे वळ उठत होते लोक जमले काय झालें विचारू लागले त्या पोराच्या तोंडातून रक्त आलें, पण वसुधरा त्याला मारीतच होती

विश्राम भेदरला आणि त्याने तिचा हात पकडला तो पोरगा सुटला आणि जीव घेऊन पळाला आणि मोठ्यानें श्वास घेत, फुललेल्या चेहऱ्याने वसुधरा विश्रामकडे मूढपणे पाहात होती तिचा तो एक अर्धवट मिटलेला डोळा आता पूर्णपणे उघडला होता पेटलेल्या क्रोधानें तारवटला होता ती नजर विश्रामच्या नजरेला भिडताच त्याच्यावर काहीं तरी चमत्कारिक परिणाम झाला त्याला वाटू लागलें, कीं आपणच तो छाकटा पोरगा आहोत आपलेच गाल चपलेच्या मारानें हिरवे-निळे झाले आहेत आणि वसुधरा आपल्याला अशीच मारत राहणार आहे तो भास त्याला इतका खरा वाटू लागला की त्याने चटकन् तिचा हात सोडून दिला

मारणे अशक्य झालें तेव्हा वसुधरा तोंडानें बडबडू लागली, "हलकट मेला! आया-बहिणी नाहींत की काय त्याला?" अशाच अर्थाचें ती पुन्हा पुन्हा बडबडत होती. तो एकच मुद्दा तिला सुचत होता आणि तोच तिला फार महत्त्वाचा वाटत होता तिच्या एकमार्गी मनाला एवढे माहीत होतें कीं, आपल्याला राग आला आहे. आणि तो सगळा राग ओकून टाकीपर्यंत तें स्वस्थ राहणार नव्हते

गुप्तेनें तिची कशीबशी समजूत काढून तिला वाटेला लावलें आणि मग विश्रामबरोबर पुढे चालतांना तो कोरड्या आवाजात म्हणाला, "खर रे बुवा, घोण आहे नुसती घोण!"

त्या दिवशीं सन्ध्याकाळीं हेड ऑफिसमधून आलेल्या कागदपत्रात विश्रामच्या दृष्टीने एक आनंदाची बातमी होती त्याला ऑफिसात सुपरिंटेंडेंटची जागा देण्यात आली होती त्याचा पगार एकदम शंभर रुपयानी वाढणार होता ऑफिसात ही बातमी पसरली सगळ्यानी विश्रामचे अभिनंदन केले, अगदीं मनापासून ज्याना त्याच्याविषयीं मत्सर वाटायला हवा होता त्यानादेखील तो तितकासा वाटला नाही. सगळे विश्रामच्या भोवतीं जमले थोडा वेळ नुसता गलकाच झाला

काय झाले तें वसुंधरा काळेच्या सर्वात शेवटीं ध्यानात आलें

तिने एका मुलीला विचारले, "काय झाल हो?"

"मि साळ्याना प्रमोशन मिळाल"

"मग पगार वाढला असेल त्याचा?"

"हो ना वाढणारच"

वसुंधरा काळेने अमळ विचार केला आणि ती पटल्यासारखा चेहरा करीत म्हणाली, "हो, वाढणारच प्रमोशन म्हणजे पगार वाढणारच"

हें भाषण सपले अशा कल्पनेने जेव्हा ती मुलगी दुसरीकडे पाहू लागली तेव्हा वसुंधरेनें विचारलें, "किती रुपये जास्त मिळणार त्याना?"

"शंभर रुपये" संभाषण सपवायची आतुरता त्या मुलीला वाटत होती

"शंभर रुपये अस्सं"

मग थोड्या वेळानें ती पुन्हा म्हणाली, "म्हणजे बराच वाढला की" आणि मग तिच्या तोंडून क्वचित् होणारा विनोद तिनें केला, "एवढा कशाला हवाय् म्हणाव तुम्हाला? आम्हाला देऊन टाका थोडासा"

आपल्या विनोदावर खूष होऊन ती मनसोक्त हसली दुसरें कोणी हसलें नाहीं तरी एकट्यानेंच हसली

मग तिच्या मनानें एकदम गभीर पल्ट घेतली. शेजारच्या मुलीला

ती म्हणाली, "सुपरिटेंडेंट व्हायला किती दिवस लागतात हो ?"

ती मुलगी हसून म्हणाली, "खूप आणि नुसते दिवस नाहीं—आणखीहि काही लागत"

तिच्या बोलण्यातली खोच वसुधरा काळेच्या ध्यानात आली नाहीं पण आपण इतक्यात सुपरिटेंडेंट होणार नाहीं ह्याचें तिला वाईट वाटले विश्राम साठेला असे प्रमोशन मिळावे ह्याची तिला फार चीड आली त्याच्या भोवतीं जमलेल्या लोकाचा राग आला तिला काहीं तरी हवें होते आणि तें तिला मिळत नव्हते

टक लावून ती विश्रामकडे पाहात होती चेहऱ्यावरच्या प्रसन्नतेमुळे तो अधिकच देखणा दिसत होता त्याच्याजवळ चपळ बुद्धि होती आता पैसा मिळणार होता तिला हवें होतें ते सगळे त्याच्याजवळ होते ते सगळे तिला हवें होतें अधाशीपणाने, मत्सरानें ती त्याच्याकडे पाहात राहिली तिच्या थड वृत्ती तापू लागल्या का कोण जाणे, आपण रस्त्यात त्या पोराच्या तोडात चप्पल कशी फडाफड मारली ते तिला आठवले त्या वेळी विश्रामने आपला हात धरला होता ते आठवलें आणि मग तिला एकदम वाटले की, आपण विश्रामच्या गालावर तसेच प्रहार करीत आहोत कल्पनेने ती प्रहार करीतच राहिली आणि मग अचानक तिच्या ध्यानात आलें की, आपण त्याच्या गालाची उष्ण चुबने घेत आहोत, त्याच्या अग प्रत्यगातील सारी उष्णता, सारे रक्त शोषून घेत आहोत—आणि तें सारे सुख आपल्या पोटात कुठे तरी खोल दडवून ठेवायचे—त्याला पुन्हा पुन्हा छळायचें, शोषून घ्यायचें आणि पुन्हा ते सारे सुख आपल्या पोटात कुठे तरी खोल दडवून ठेवायचें

तिला सारा उलगडा झाला अननुभूत सवेदनानी मोहरलेले तिचें अग तिला सागत होतें की तिला तो हवा होता ज्या स्फोटक द्रव्यानें आपलें शरीर ठासून भरले आहे ह्याची तिला आतापर्यंत पुरती जाणीवहि नव्हती, ते आता तिच्या शरीरात पेटू लागले होतें. तें [illegible]तें द्रव्य तिला सागत होतें कीं, तिला तो हवा होता

जणु त्याचा ताबडतोब कब्जा घेण्याकरिता ती एकमार्गी मुलगी खुर्चीवरून अर्धवट उठली आणि मग लाजून अडखळत खालीं बसली अशी ती कधीच लाजली नव्हती ऑफिस सुटण्याच्या वेळेची वाट पाहात ती बसून राहिली तिच्या चेतलेल्या इच्छेचा नाग तसाच फणा काढून डोलत राहिला तिचा तो अर्धवट मिटलेला डोळा मधूनच स्फुरत होता

विश्रामचे आणि आपले लग्न होणार ही गोष्ट तिला अगदी सरळ व साधी वाटत होती आपण त्याला न आवडण्याचा सभव आहे हे तिला समजूच शकत नव्हते आपल्याला जी वस्तु हवी आहे ती आपल्या-करिताच आहे असे जसे एखाद्या लहान मुलाला वाटते तसेच तिलाहि वाटत होते तो तिला हवा होता आणि तो तिला मिळणार होता

सध्याकाळीं ऑफिस सुटल्यावर विश्रामने लताला गाठलें ती घाबरली, लाजली, न बोलता चालू लागली बोलताना घुटमळली आणि विश्रामचे बोलणे ऐकून हसतच राहिली ती दोघे आपल्या तद्रींत चालत असता त्याच्या एकदम ध्यानात आले की, वसुधरा काळे आपल्या शेजारून चालली आहे त्याबरोबर दोघाचे सभाषण नासलें—बद पडले विश्राम वसुधरेशी काहीं तरी औपचारिकपणे बोलला लता आपटेच्या चेहऱ्यावरून एक छाया सरकली

वसुधरा काळे तशीच त्याच्याबरोबर चालत राहिली विश्रामला मिळालेल्या बढतीबद्दल पुन्हा पुन्हा तीच चौकशी करीत राहिली आणि मग ती एकदम चटकन् लतेला म्हणाली, "तुम्हाला घरी नाहीं का जायच ?"

लता बावरली आणि चटकन् म्हणाली, "हो, जायचय् ना" आणि खारीसारखी ती तेथून निघून गेली

विश्रामनें एकदम पुढे होऊन तिला हाक मारली पण तिला ती ऐकू गेली नसावी तो आणखी पुढे होणार तेवढ्यात एक मोटर आडवी आली मग दुसरी आली, मग तिसरी तिकडे लता गर्दीत अदृश्य झाली

—विश्राम वसुधरेकडे रागाने पाहून म्हणाला, "चू !"

पण त्या शिसवी स्तनानीं आणि त्या घाटदार नितंबानीं त्याचा राग वरच्यावर झेलून धरला तिच्या चेहऱ्यावरच्या थंड भावाने तो बोथटला विश्राम स्वत वरच चरफडत गप्प बसला

वसुधरा म्हणाली, "तुम्ही सगळ्यांशीं कसं हो बोलतां ?"

' मला आवडत लोकांशी बोलायला "

"अं हं ! मला नाहीं आवडत " वसुधरेची मान सावकाश हलली

"पण मला आवडत ना ?"

"अं हं ! मला नाहीं आवडत " विश्रामच्या बोलण्याकडे पूर्णपणे दुर्लक्ष करीत तिनें पुन्हा थंड आग्रही आवाजात आपले मत सांगितले

विश्राम विषय बदलीत म्हणाला, "बर, मला आता टूर्नामेंट्समध्यें खेळायला जायचंय् "

ती त्याच्याबरोबर चालत म्हणाली, "चला मी पण येतें तुमच्या-बरोबर."

त्यानें टॅक्सी यांबवली तशी ती त्याच्याबरोबर आत शिरली

टॅक्सींतल्या अपुऱ्या एकांतात देखील विश्राम तिच्याकडे न बघण्याचा प्रयत्न करीत होता पण तिचें सुस्त घाटदार शरीर त्याची नजर खेचून घेत होतें, आपली मोहिनी त्याच्यावर पाडत होतें वसुधरेने डोळ्याच्या कोपऱ्यातून त्याच्याकडे पाहिले आणि विश्रामला एकदम अशी मूर्ख इच्छा झाली कीं, तिच्या त्या अर्धवट मिटलेल्या डोळ्याचें चुंबन घ्यावें

टूर्नामेंटमध्यें त्या दिवशीं तो विलक्षणच चांगले खेळला विलक्षण चापल्य त्याच्या अंगात आले होतें आपल्या प्रतिस्पर्ध्याच्या मनातलें तो अचूकपणें हेरत होता त्याला बेमालूमपणे चकवीत होता परत करता येणेंच अशक्य असे शॉट तो मारीत होता पट्टीच्या प्रतिस्पर्ध्या-वर त्याने मात केली आणि टाळ्यांच्या कडकडाटात तो क्रीडांगणाच्या बाहेर पडला

टॅक्सींत त्यानें आपलें तापलेले अंग झोकून दिले. शेजारी वसुधरा होती. डोळे मिटून मागे टेकून तो बसला होता आणि वसुधरा आपल्या

जाड आवाजात काहीं तरी तेच तेच पुन्हा पुन्हा सागत होती

त्या पुनरुक्तीमुळे मनावर मोहिनी पडल्यासारखे होत होते तो जाड आवाज विश्रामच्या तापलेल्या रक्तात कसलेसे रसायन ओतीत होता

मध्येंच वसुधरेचा जाड आवाज घोगरा झाला ती म्हणाली, "मला तुम्ही आवडता !"

टॅक्सीच्या धक्क्याने तिचे गरम रसरशीत अग त्याच्या अगाला लगटले त्याने मत्रमुग्धपणे तिचा हात आपल्या हातात घेतला. मग ते शिसवी स्तन त्याच्या छातीला भिडले तो खालचा जाड ओठ त्याच्या ओठाला झोंबला. त्या अर्धवट मिटलेल्या डोळ्यानें विश्रामच्या डोळ्याची पारख केली तिच्यापासून दूर होण्याचें सामर्थ्य अगर धैर्य विश्रामच्या अगात राहिलें नाहीं त्याच्या शरीरभर सुखाच्या ऊर्मी उसळल्या आणि कोसळल्या आणि अपेक्षा अधिकच उच्च उसळल्या भोवऱ्यात माणूस खेचला जावा तसा तो त्या अनुभवात खेचला गेला

टॅक्सी थाबली तेव्हा तो भानावर आला. आणि तिच्यापासून दूर झाला टॅक्सींतून खाली उतरून त्याने पैसे दिले तिच्याजवळून पळून जावें असे त्याला वाटत होतें तो भेदरून घाबरून गेला होता पण ती सथपणे त्याच्या शेजारून चालतच होती त्याचा हात तिने घट्ट धरला होता आणि ती म्हणत होती, "तुम्ही मला फार आवडता तुम्ही छान आहात."

तो म्हणाला, "मी जातो आता"

ती पुढे बोलत राहिली, "मला तुम्ही हवे आहात तुम्ही माझे आहात"

तो म्हणाला, "मला भान राहिल नाहीं"

ती म्हणाली, "तुम्ही मला हवे आहात तुम्ही माझे आहात"

तो म्हणाला, "मी दमलोंय्—मी जातो"

तिला ऐकू गेलेंच नाहीं ती म्हणाली, "बर आपण लग्न कधीं करायच ?"

तो भेदरला आणि भीतींतून निर्माण झालेल्या धिटाईनें म्हणाला,

"नाहीं मला लग्न करायचंच नाहीं माझं लग्न आधींच ठरलंय्"

ती म्हणाली, "वा! असं कसं? तुम्ही मला आवडतां मी तुम्हांला आवडते मग आपण लग्न कसं नाहीं करायचं?"

"खोटं तूं मला मुळींच आवडत नाहीस मला लग्न करायचं नाहीं तुझ्याशी" अतिशय चिडल्यामुळे त्याचा आवाज चिरकला

"वा! म्हणे आवडत नाहीं मग चुंबन कसं घेतलं माझं! जवळ कसं ओढलं मला?"

तो कांहींच बोलू शकला नाहीं

ती म्हणाली, "ह्यालाच प्रेम म्हणतात एवढंसुद्धा कळत नाहीं वाटतं तुम्हांला अजून?"

त्याने पुन्हा पुन्हा जीव तोडून तिला सांगण्याचा प्रयत्न केला, पण तिच्या मनावर कशाचा परिणामच होत नव्हता लग्न कसें करायचें, केव्हां करायचें त्याच्या गोष्टी ती बोलत होती

आणि त्या वेळीं तरी पाण्यांत पुन्हा पुन्हा बुचकळल्यामुळे मरून गेलेल्या माशीसारखा, तो शून्य मनानें तिच्याबरोबर चालत होता



# ६. सुधा

सुधा आता वीस वर्षांचा झाली आहे पण अजून तिचा स्वभाव भारी पोरकट म्हणजे तशी इतर लोकांशी ती फार शहाणपणानें वागते बरे एवढीशी पोर पण थोरामोठ्याच्या अगी असतें इतके शहाणपण तिच्या अगात आहे कोणाशी कसे बोलायचे, कितपत सबंध ठेवायचा ते तिला अगदी उत्तम समजते माणसाचा स्वभाव ती अचूक हेरते. पण आपल्या अण्णाशीं—म्हणजे माझ्याशीं—वागताना तिचें हे शहाणपण कुठे ते नाहींसे होते अगदी पोराहून पोर होते ती 'अण्णा मला थोपटून निजवा,' म्हणून अजून माझ्याजवळ हट्ट धरून बसते आजारी असली तर 'अण्णा मला भरवा', 'माझ औषध तुम्हीच प्या', इथपावेतो मजल जाते चागले कान पिरगळावे तेव्हा पोर असले हट्ट सोडते आणि कधीं कान पिरगळूनहि सोडत नाहीं.

ती असा हट्ट करायला लागली की आमची ही तिच्यावर थोडीशी रागावते आणि माझ्यावर खूपच रागावते. म्हणते, "पोरीला फार बिघडवून ठेवल आहे तुम्हीं आता लहान का आहे पोर?"

मी म्हणता, "अग, ती हट्ट करते तर मी काय करू?"

ती ठसक्यात म्हणते, "हो, तुम्ही जसे काहीं हट्ट करीतच नाहीं. सकाळीं सुधानें चहाचा कप आणला नाहीं तर पोरासारख तोंड फिरवून बसता चहा म्हणून घेत नाही!"

ती असे बोलली म्हणजे मी आणि सुधा दोघेंहि हसतो

मग ती हलक्या आवाजात पुटपुटते, "काय ही बापलेकीची माया! पोटच्या पोरीवर देखील कोणी इतकी माया करीत नाहीं पण ही पोर पाळलेली आहे असं काहीं कोणास वाटायचं नाही"

हो, सांगायचे राहिलेच सुधा काहीं खरी माझी मुलगी नव्हे ती आमच्या शेजारच्या नाना देवळांची मुलगी ते वारले बिचारे आणि ही पोरगी मीं वाढवली लहान होती तेव्हा ही पोर इतरा-सारखीच माझ्याशीहि मोठ्या शहाणपणाने, सुजाणपणाने वागायची पण नंतर काय झाली गंमत—पण तसे नाहीं, ती सगळी हकीकतच तुम्हाला सांगितली पाहिजे

त्या वेळीं आम्ही नानजी गोविंदजीच्या चाळींत दुसऱ्या मजल्यावर रहात होतो आमच्या मजल्यावर तेव्हा सातच बिऱ्हाडे होती आणि तीं पुन्हा चांगली त्यामुळे एकाच घरची सगळीं असल्यासारखे आमचें सर्वांचें वागणें असे कोणाचें अडलें दुखलें म्हणजे दुसऱ्यानीं त्याच्या मदतीला धावायचें ही आमची रीतच होती त्यात कोणाला कसली अपूर्वाई वाटत नसे

आमच्या चाळींतले प्रत्येक बिऱ्हाड त्यातील महत्त्वाच्या व्यक्तीवरून ओळखलें जात असे. अगदीं टोकाचें बिऱ्हाड होतें भीमामावशींचें. भीमामावशींचा मुलगा सदू हा त्यातला खरा कर्ता पुरुष पण भीमा-मावशींचें तोंड असे खबरदार होतें आणि कामाचा रगाडा उपसायची ताकद इतकी मोठी होती की त्यांच्या इच्छेविरुद्ध त्या घरात पानहि हलत नसे. सदूभाऊ नवा कोट शिवायचा असला तरी अजून आईला विचारीत हजामत करायला झाली आहे असे देखील भीमा-मावशींनींच त्यांना सांगावें लागे.

दुसरें बिऱ्हाड होतें कृष्णा-वहिनीचें. कृष्णा ही तसे पाहिलें तर त्या घरातील सर्वांत धाकटी सून पण ती अशी चटपटीत आणि मनमिळाऊ होती कीं चाळींतल्या माणसांना तीच त्या घरातली प्रमुख वाटे. काहीं लागलेंसवरलें म्हणजे तिच्याकडे सगळीं धाव घेत

तिसरें बिऱ्हाड होते नेन्यांचें. हीं माणसे कधीं कोणाच्या अध्यात-

मऱ्यात नसत वैशिष्ट्य असे त्याच्यापैकी कोणात काही नव्हतें त्यामुळे आडनावानेच त्याचा उल्लेख होई

तात्या थोराताना देवपूजेचा आणि भजनाचा अतोनात नाद त्यातच ते सदैव रगलेले असत 'आज अमका चमत्कार झाला', 'आज स्वप्नात मला मारुती दिसला', 'अमक्या देवळात देवीला घाम फुटला आहे', अशा चमत्कारिक गोष्टी ते सदैव लोकाना सागत असत आणि आपल्या मुलाचे कधीच ऐकत नसत त्यामुळे थोरातार्चे घर हे चाळीच्या दृष्टीनें तात्याचे बिऱ्हाड होते

मामाची हौस दाडगी आणि चौकसपणा त्याहून दाडगा त्याना कसली माहिती नाहीं असे कधी नसायचेच आणि कुटल्याहि कामात त्याचा पाय कधी मागे नसायचा त्यामुळे आमच्याच नव्हे, तर आसपासच्या चार चाळींत मामा सुप्रसिद्ध होते

एक बिऱ्हाड अर्थात् होते आमचे

आणि एक बिऱ्हाड सुधेचे, असे सगळी चाळ म्हणत असे ह्या सुधेविषयीं सागण्याकरिताच तर मी हें सगळे चऱ्हाट लावलें आहे नाना देवलाची सुधा ही मुलगी नाना कमालीचे हडकुळे होते त्यानीं सदरा काढला की त्याच्याकडे बघवत नसे त्याच्या तोडावर काति अजिबात नव्हती, आणि त्याचे डोळे थिजलेले होते त्याच्याशीं कोणी कधीं बोलले तर नानाना तें समजत नसे आणि त्यावर ते जें पुटपुटत तें दुसऱ्या कोणाला ऐकू कधीं जात नसे कोणी जवळ नसले तरी त्याच्या ओठाची हालचाल मधूनमधून चाललेली असे मग स्वत शीच ते काय बडबडत असत कोण जाणे ऑफिसातून आल्यावर ते गॅलरीत कठड्याशीं उभे राहात मग घरात जाऊन मधल्या दरवाज्यात उभे राहात. सुधा त्याना म्हणायची, 'नाना, बसा बाहेरच्या खुर्चीवर' तेव्हा नाना बाहेरच्या खुर्चीवर जाऊन जरा बसायचे. मग पुन्हा अवघडून उभे राहायचे. त्याना कसला रोग नव्हता, वेड असे लागलेलें नव्हतें पण आज अनेक वर्षे ते अशाच स्थितींत होते आणि त्यामुळे पोस्टातील त्याची नोकरी टिकून कशी राहिली ह्याचे सर्वांनाच आश्चर्य वाटत असे.

असे म्हणतात की नानांची बायको तरुण वयांत चांगली उफाड्याची होती पण माझ्या आठवणीला तरी ती कित्येक वर्षे पोटाच्या दुखण्यानें अंथरुणाला खिळलेली होती कुठच्या तरी वैद्याचं औषध तिला चालू असे आणि दिवसभर ठणठणीत आवाजांत (आजारानें तिच्या आवाजा-वर तेवढा कसलाच परिणाम झाला नव्हता) आपल्या नवऱ्याला शिव्या देत असे

सुधा ही ह्या दुर्दैवी कुटुंबांतली मुलगी. परमेश्वरानें तिला घडवितांना मोठी अजब किमया केली असावी (कारण ह्या रोगट, आंबलेल्या मनाच्या नवराबायकोच्या पोटची ही पोर नक्षत्रासारखी होती अंगा-पिंडानें ती सुदृढ होती , दुखणेंबाणें तिला सहसा नसायचें डोकीपासून पायापर्यंत ती नुसती गोरीपान होती आणि चेहऱ्यावर गोडवा आणि तेज असें होतें की सगळ्यांना ती हवीहवीशी वाटायची देवघरांतल्या घंटेसारखा तिचा मधुर आवाज होता ती बोलू लागली की ऐकतच रहावेंसे वाटायचें आणि बोलणें तरी किती चतुराईचें आणि लाघवी असायचें पोरीचें ! तिनें अमुक एक म्हटल्यावर त्याला नाही म्हणणें मला तरी बाबा कधी जमलें नाहीं आणि दुसऱ्या कोणाला जमलें असेल असें वाटत नाहीं

तुम्ही म्हणाल की ह्यांच्या घरांत मूलबाळ नाहीं म्हणून ह्यांना त्या मुलीचें फार कौतुक वाटतें आणि माझा मुलगा वारल्यापासून मला मुलाबाळांची अपूर्वाई वाटते खरीच आया फटाफटा मुलांना मारतात तें मला बघवत नाही त्यांना ओरडून सांगावेंसे वाटतें, 'बायांनो, देवाची देणगी आहे ती त्या लेकरांचे असे हाल केलेत तर देवाला तें कधीं आवडायचं नाही '

पण माझें म्हणणें नसलें मानायचें तर नका बापडे मानू—पण आमच्या भीमामावशीचीच गोष्ट घ्या ना ! आपल्या मजल्यावरच्या लहानापासून थोरापर्यंत सगळ्यांची त्यांनी केव्हांना केव्हां खरडपट्टी काढलेली होती पण सुधेनें मात्र त्यांचे बोलणें कधी खाल्लें नाहीं उलट ती त्यांची फार लाडकी तिची बाजू घेऊन त्या इतरांची मात्र जास्तच

खरडपट्टी काढीत असत आमचे मामा बोलण्यात एवढे वाकबगार, पण ही पोरगी त्याना इतके आडवेतिडवे प्रश्न विचारून भडावून सोडायची कीं ते हिच्यापुढे हात जोडायचे, “ बाई ग ! तुझ्याशीं वाद घालायला ब्रह्मदेवच हवा आम्हाला ते जमायच नाहीं ”

अशी ही मोठी हुशार पोर

तिचे आई-वडील नेहमीं कुढत असत म्हणून की काय, ही सदा आनदी असायची त्याना कधी कसली हौस वाटली नसेल पण हिला प्रत्येक गोष्टीची हौस मुलाच्याबरोबर सध्या शिकायला देखील हिची तयारी

आई आजारी म्हणून अगदी लहान वयापासून ही पोरच सगळे घर संभाळीत असे आई आपलें पडल्या पडल्या चार शब्द सागेल, तेवढीच काय ती तिची मदत. तिची आई वारली तेव्हा ही पोर ढसढसा रडली भीमामावशींच्या आणि कृष्णावहिनीच्या मानेवर मान टाकून रडली पण थोड्या वेळाने तिने दाताखाली ओठ आवळून धरून आपले रडणे आवरलें आणि एकटीच ती एका बाजूला जाऊन बसली. यापुढे ती पुन्हा रडताना दिसली नाहीं

सगळयानाच त्या लहान पोरीच्या ह्या सयमाचें कौतुक वाटले मलाहि वाटलें पण पोरवयात मन इतके आवरणें बरे नाहीं वाहत्या पाण्याला जायला कुठे तरी वाट ठेवायला हवी

आई गेल्यापासून सुधाने एकटीनें आपलें घर सभाळलें. दहा वर्षांची ती पोर रोज सकाळ-सध्याकाळ स्वयपाक करी आईला विचारून विचारून ती सगळें शिकली होती पण नुसता दोन्ही वेळचा स्वयपाक करून तिचें समाधान होत नसे कृष्णावहिनींनी बटाटेवडे केले की ही पोर बटाटेवडे करायला घ्यायची आणि हाताला चट्टे पाडून घ्यायची भीमामावशींनी पापड करायला बायका बोलावल्या, की ही चिमुरडी सगळया बायकाना आपल्याकडे बोलवायची आणि गमत अशी कीं सगळया बायका तिच्याकडे जायच्या आणि पुन्हा बोलण्याच्या भरात बायकाचे हात जर काम करीनासे झाले तर ही पोरगी म्हणायची, “ काकू, चात्या करा.

लाटायच काम अद्भून राहिल आहे ''

काकू म्हणायच्या, "अग टवळे!"

आणि मग सगळ्या बायका हसत सुधावर त्या रागावत नसत. कोणाच्या घरात गोडधोड झालें की सुधेच्या घरी ते पोहोचवलें जायचे. त्यामुळे रोज रोज अशा वस्तू घेणे त्या मानी पोरीला आवडत नसे म्हणून ती मधून मधून स्वत केलेल्या वस्तू लोकाच्या घरीं पाठवीत असे

पोरीच्या हाताचा गुण असा की तिने केलेले जिन्नस सगळयाना आवडत पुरुष मडळी तिचे जिन्नस खाऊन आपल्या बायकावर टीका करीत त्यामुळे घरात भाडणे देखील होत आणि मग बायका येऊन सुधेला विचारीत, "कसे ग बाई करत्येस तू बटाटेवडे?"

सुधेला स्वयपाक चागला करता येतो असे समजल्यापासून चाळीं-तल्या बायका तिला बरोबरीच्या नात्याने वागवायच्या एवढ्या मोठ्या भीमामावशी, पण स्वयपाक करीत असता सुधा आली तर विचारीत, "काय ग पोरी, एवढ मीट पुरे का? की घालू आणखी थोड?"

सुधेच्या घरचे हळदीकुकू म्हणजे चाळींतला मोठा समारभ असे सगळ्याच्या घरचे साहित्य त्या दिवशीं तिच्या घरी गोळा होत असे सगळ्या बायका तिच्या घरी कामाला लागत तिनें 'नको नको' म्हटलें तरी कोणी ऐकत नसे चाळींतल्या बायका तर येतच पण विशेष मान असे चाळींतल्या पोरींचा त्या सगळ्या त्या दिवशीं सुधेकडे जमत नाना प्रकारचीं गाणीं म्हणत खेळ खेळत मोठ्या बायका देखील आपलें प्रौढपण विसरून त्या खेळात सामील होत सुधेची त्या दिवशी जी धावपळ व्हायची ती विचारू नका ती सारखी लुटुलुटु इकडून तिकडे फिरत असायची सगळ्याची रीतीप्रमाणे ऊटबस करायची खूप खेळा-यची, खूप हसायची आब्याची डाळ पुरते की नाही अशी चिंता भीमा-मावशींच्याजवळ व्यक्त करायची आनदानें नुसती वेडावून जायची

पण ह्या आनदाच्या भरात ती इतर बायकासारखी आम्हा पुरुष-मडळीला मात्र विसरत नसे संध्याकाळीं ती नानाना नवा शर्ट घालून पुरुषाना आमत्रणें करायला पाठवीत असे. नाना आस्ते आस्ते

पावलें टाकीत एकेकाच्या घरात जात आणि म्हणत, “ पन्ह पन्ह प्यायला चला, ” आणखी काहीं न बोलता ते चालू लागत पण आम्हा सर्वाना ते आमत्रण पुरेसे होत असे

सगळे पुरुष मग तिच्याकडे पन्ह प्यायला जमत, त्या वेळीं मात्र सुधेची नाना प्रकारे थट्टा करीत आणि इतर सगळे त्यात सामील होत

मामा म्हणत, “ काय पण पन्ह केल आहे सुधेन ! साखरच घातली नाहीं त्यात ”

सुधा कावरीबावरी व्हायची आणि इतराना विचारायची, “ खरच का हो ? ” मग दुसरे वाईट ताड करून म्हणायचे, “ पिववत नाहीं बुवा अगदी ”

तेवढ्यात कोणाला तरी हस् यायच आणि सार बेड फुटायच, पण एखाद्या वेळीं कोणी हसत नसे आणि मग अखेर सुधा केविलवाण्या नजरेने मला विचारी, “ खरच का हो कमी झाली आहे साखर ? मी साखर घातली होती—”

मी म्हणायचो, “ आपल्याला तरी बुवा गोड लागतय् ”

सुधाचा माझ्यावर फार विश्वास होता नव्हे, माझ्यात आणि तिच्यात एक नाजुक बध निर्माण झाला होता त्यामुळे माझा पाठिबा मिळाला की तिची कळी खुलायची उत्साहाच्या भरात आवाज चढवून ती म्हणायची, “ फसवता तुम्ही सगळे मला ! ”

मामा म्हणायचे, “ अग, तू आपली अण्णाची लाडकी आहेस म्हणून ते म्हणताहेत तसं बाकीच्याना विचार पाहू ”

“ मुळींच नाहीं अण्णा कध्धी खोट बोलायचे नाहींत. ”

“ म्हणजे आम्ही बोलतो की काय ? ”

ह्यावर सुधा गोंधळायची. पण मग चतुरपणें म्हणायची,

“ साखर नाहीं, मग रिकामा कप कसा हो झाला ? ”

मामा मग परत बाजू उलटवायचे सुधेला माझा आधार असे. आणि तिला पुरुष मडळी असा त्रास देताहेत असे कळल्यावर भीमामावशीच तिच्या मदतीला धावून यायच्या मग मात्र पुरुषाची भबेरी उडायची.

त्यानीं पुन्हा पुन्हा मागून सुधाचें पन्हे संपवलें तर तेवढ्यात भीमा-मावशी दुसरें पातेलें घेऊन यायच्या आणि बोलण्यात भीमामावशीचा हात धरणारे कोणी नव्हतेच

दिवसभर असा आनंदात, धावपळींत गेल्यावर कधीं कधीं सुधा तशीच सतरंजीवर झोपायची ते पाहिले की मी बायकोला तिचें घर आवरायला पाठवीत असे पण तिच्या हातून जरा आवाज झाला की सुधा जागी व्हायची आणि 'नको नको' म्हटले तरी सारे झराझरा आवरायला लागायची त्या पोरीला काय म्हणावे ते समजत नसे

आपले नाना चमत्कारिक आहेत ह्याचें त्या मानी मुलीला फार दु ख होत असे नानाकरिता ती नवे कपडे शिववून घेत असे त्याचे कपडे स्वच्छ धुतले जावे म्हणून काळजी घेत असे पण नानानी अंगावर कुठचाहि कपडा घातला की तो वाईट दिसू लागत असे नानाशीं ती स्वतः बोलण्याचा प्रयत्न करायची पण त्याना तिच्याशीहि बोलता येत नसे फार झाले म्हणजे ते तिच्या पाटीवरून हात फिरवीत आणि तिला खाऊला म्हणून पैसा देत त्यामुळे ती फार हिरमुसली होई आणि ते लपविण्याकरिता आपले नाना किती चागले आहेत ते आम्हा सगळ्याना उत्साहाने सागत असे ती नानाना मुद्दाम आपल्याकरिता काहीं तरी वस्तु आणायला सागायची आणि 'नानानी आणली' असे म्हणत सगळ्याना सागत हिंडायची

एकदा मजल्यावरच्या दोनचार बायकाना तिनें नानाविषयी थट्टेखोर-पणें बोलताना ऐकलें तेव्हा ती अगदीं बिथरून गेली. त्या बायकाना ओरडून म्हणाली, "माझे नाना चागले आहेत तुम्ही सगळ्या खोट बोलता ते फार चागले आहेत "

आणि आपल्या घरात जाऊन ती दार बद करून बसली. माझ्या बायकोने किती तरी वेळ ठोकलें तेव्हा तिनें दार उघडलें.

तिनें डोळे नुकतेच पुसले होते आणि पुन्हा त्यात पाणी जमा होत होतें.

"काय झाल ग ?"

"काहीं नाहीं, जरा रडू आल म्हणून एकीकडे जाऊन बसलें. आता बर वाटल आहे मला"

हसऱ्या चेहऱ्याने असे बोलत असताना तिच्या डोळयातून मग आणखीनच पाणी आले आणि ती एकदम घरात पळून गेली.

माझी बायको तिच्या मागोमाग जात म्हणाली, "एवढीशी मुलगी तू आपल्याला वाईट वाटल तर दुसऱ्याजवळ बोलाव म्हणजे मन हलक होत"

पण ती हाताच्या चौकटीत तोड लपवून गप्प पडून होती प्रयासानें हुदका आवरीत होती.

ते पाहून तिच्या आणखी जवळ जाण्याचें धैर्य माझ्या बायकोला झालें नाहीं

भीमामावशीनी त्या बायकाना मात्र मग चापलें

सध्याकाळीं नाना घरी आले तेव्हा धावत पुढे जाऊन सुधाने त्याना मिठी मारली नानानी तिला थोपटल्यासारखे केले आणि मग त्याच्याहि डोळ्यात अश्रू उभे राहिले काही तरी दोनचार तोडकीमोडकी वाक्यें ते तिच्याशी बोलले. पण तिचें दु:ख त्याना समजू शकलें नाहीं

त्या दिवसापासून मी रोज सध्याकाळी मुद्दाम नानाशी पधरा मिनिटें काहीं तरी बोलत असे त्यामुळे सुधेला फार आनद होई तिचे डोळे मला सागत, 'मला समजलें' मी देखील डोळ्यानीच तिला सागायचा, 'मला पण समजले'

चाळींतल्या इतर बिऱ्हाडकरूच्या मानानें नानाचें उत्पन्न फारच कमी होते त्याना बढती कधींच मिळाली नव्हती आणि आपल्या जागेवर ते टिकून राहिले होते ते त्याच्या हेडक्लार्कच्या दयाळूपणामुळे तो हेडक्लार्क गेला तेव्हा त्याचीं बरींच वर्षें नोकरी झाली होती. आणि म्हणून ते नतरहि टिकून राहिले शिवाय बायकोच्या आजारीपणात त्याना हजार-एक रुपये कर्जच झाले होते त्यामुळे त्याची परिस्थिति नेहमीं ओढ-घस्तीची असे सुधाची कपड्यालत्त्याची, दागदागिन्याची हौसमौज त्यामुळें कधींच होत नसे इतर मुलीच्या नटण्याथटण्याकडे पाहून तिला

हिरमुसली झालेली मीं पाहिली होती पण माझें बारीक लक्ष असल्यामुळेच मला ते कळलें एरवीं तिची वागणूक अगदी निर्मळ असे कुणी नवे कपडे किंवा दागिने घातले की ती त्या मुलीचे कौतुक करीत असे आपल्याला नाहीं म्हणून तिने कधी वाकडें तोंड केले नाहीं अगर कोणापुढे तोंड वेंगाडले नाहीं कोणी कापडचोपड देऊं केले तरी ती ते घेत नसे ती हसून म्हणायची, "नको हो मला आणि आता कीं नाहीं नाना मला लवकरच घेणार आहेत छानपैकी कापड ते आणल्यावर मीं तुम्हाला दाखवीन ह "

अखेर कधीं तरी नानाच्या बरोबर जाऊन ती कापड खरेदी करायची आणि मग इतक्या आनंदाने ती ते सगळ्याना दाखवीत असे उड्या मारीत सगळ्याकडे ती जायची म्हणायची, "कित्ती कित्ती छान आहे!" आणि मिटक्या मारायची पुन्हा ती लहान मुलगी व्हायची आणि सगळे तिच्या कापडाचें तोंड भरून कौतुक करायचे मला फार आनंद व्हायचा आणि वाईट पण वाटायच फार फार वाटायच कीं तिला काहीं तरी द्याव पण ती माझ्याकडून देखील काहीं घेत नसे एकदा मी तिच्यावर खूप चिडलो म्हटलें " तू फार शहाणी झाली आहेस लोकाच्या प्रेमाची तुला किंमत वाटत नाहीं तुला जर एवढी किंमत वाटत नाहीं तर आम्हाला तरी काय गरज पडली आहे ?"

मोठ्या माणसावर रागवावे तसे मी तिच्यावर रागावलो आणि ती लहान मुलासारखी कावरीबावरी झाली अगदीं गोरीमोरी झाली वाटले कीं आता ही रडू लागणार—आणि मग मी तिला पोटाशीं धरून तिची समजूत काढीन

पण तिने आपले रडणे आवरले ती एकदम रडवें हसून म्हणाली, "एवढे जर रागावणार असाल अण्णा, तर मी आपल कापड घेते तुमच ह्याचा आता चागला फ्रॉक शिवीन ह मी आणि तो घालून तुम्हाला पहिल्याने दाखवीन "

एखाद्या लहान मुलाची समजूत करावी तसे ती माझ्याशीं बोलत होती. आणि माझें मलाच वाटू लागले कीं मी अगदीं लहान पोरा-

सारखा तिच्यावर रागावत होतों असा राग आलाय् मला माझा—आणि तिचा पण मी तेथून निघून गेलो आणि मग तिला काहीं द्यायचा मला धीर झाला नाहीं

सुधेचे वागणे असे प्रौढपणाचें असले तरी मुलात ती मिसळू शकत असे खेळताना ती लपलेली असली आणि तिला शोधून काढलें म्हणजे ती एवढ्या मोठ्याने किंचाळायची! अगदीं घाबरीघुबरी व्हायची ती. आणि मग स्वत.लाच हसायची. पण इतक्या पोरकटपणानें ती क्वचितच वागायची ती खेळायची देखील मोठ्या माणसासारखी बाकीच्या मुलाना तिच्याविषयीं आदर वाटायचा आपलें घर चालवून ती नेहमीं खऱ्याखुऱ्या भातुकलीचा खेळ खेळत असे त्या खेळात भाग घ्यायला सगळीं मुले फार उत्सुक असत आईने सागितलेलें एकहि काम न ऐकणारीं मुलें तिच्या घरातलीं कामे उत्साहानें करीत असत. ह्यामुळे पोराच्या आया त्याच्यावर फार चिडत पण पोरानीं तिच्या घरीं राबायचें सोडलें नाहीं तिनें दटावलें, समजावून सागितलें, म्हणजे पोराना तें पटत असे तिचें तीं मुकाट्यानें ऐकत असत.

सगळीं मुलें तिला काकूबाई म्हणत असत पहिल्यानें कुचेष्टेनें हें नाव पडले पण नतर त्यातली कुचेष्टा नाहींशी झाली आणि तें एक लाडके नाव झालें तिला काकूबाई म्हणण्यात आपण तिची थट्टा करीत आहोत असे मुलाना वाटत नसे आणि त्या नावानें आपली थट्टा होत आहे असे सुधेलाहि वाटत नसे तें नाव मोठ्या माणसाच्याहि फार परिचयाचे झाले होतें तीं देखील पुष्कळदा तिला त्या नावानें हाक मारीत

कोणालाच त्याचे काहीं वाटत नसे पण मला मात्र त्याची फार चीड यायची ह्याबद्दल मी खूप बडबडत असे आणि बायकोनें तिला 'काकूबाई' म्हटले कीं तिच्यावर कावून तिला अगदी नकोनकोसे करीत असें.

शेवटीं बायको चिडून म्हणायची, "अस लहान पोरासारख काय करता अगदीं! सुधा आहे तुमची लाडकी, तर बसा तिला पोटाशीं घेऊन. पण आम्हाला त्याचा सासुरवास नको"

असे तिनें म्हटले म्हणजे मला उगीचच चोरट्यासारखे व्हायचें आणि मी तिच्यावर अधिकच चिडायचो अखेर ती चक्क तासभर शेजारी जाऊन बसायची

युद्ध सुरू झाले आणि नाना देवलानी पेन्शन घेतलें आधीच पगार थोडा, त्यामुळे पेन्शन फारच थोडे बसलें एवढ्या थोड्या रकमेत एरवी भागणे देखील कठीण होते पण महागाई वाढू लागली तसतसे नाना अगदीं डबघाईस आले घरात दोनच माणसे, पण सकाळ सध्याकाळ भात तर सोडाच, पण भाकरी तोडात पडणे मुष्कील होऊ लागलें. भाडे थकू लागले बिलवाले खेटे घालू लागले बरे, नानाना चार पैसे कुठून मिळवून आणायची अक्कल नव्हती ते डोके दाबून धरीत आणि गॅलरींतून घरात व घरातून गॅलरींत जात

नानाच्या अगावर ठिकठिकाणीं शिवलेले शर्ट दिसू लागले सुधेला नवे म्हणून ठेवून दिलेले फ्रॉक वापरायला काढावे लागले आणि तेहि फाटून गेले

बिलवाले येऊन काहीं बोलले कीं पोर अगदी गोरीमोरी होई तिचा चेहरा ओढलेला दिसू लागला तिचें हसणे ऐकू येईनासे झालें लोकानी बिलवाल्याची बोलणीं ऐकली असतील, आपल्याला ते काहीं तरी म्हणतील म्हणून ती घराबाहेर पडेनाशी झाली. अगात घालायला चागले कपडे नाहींत म्हणून ती कुठे समारभाला जाईनाशी झाली पोर कुढू लागली. एक दिवस तर तिने शाळा सोडून दिली पुस्तके विकून टाकली. घरातच ती बसून राहायची

चाळींतल्या माणसाना हे जाणवत होतें सकाळ-सध्याकाळ तिच्याकडे काहीं ना काहीं तीं पाठवीत पण असे काहीं घरीं आलें कीं ती गोरीमोरी व्हायची. वस्तु आणणाऱ्या माणसाला ती रडेल म्हणून भीति वाटायची आणि दाराबाहेर पडले कीं तिचा हुदका ऐकू यायचा रिकाम्या भाड्यात काहीं नाहीं तर मूठभर भुईमुगाचे दाणे भरून ती तें परत करायची कोणी कापड देऊ केलें, सिनेमाला चल म्हटलें, तर ती नको म्हणायची. पळून जायची

महागाईने बाकीच्यानींहि ओढघस्तीला आणले होते जो तो आपल्या विवचनेत गर्क असे आता पूर्वीसारखीं माणसे हसत बोलत नसत. मजूर-व्यापाऱ्याची चगळ होत होती पण आमचा मध्यम वर्ग खचत चालला होता चटकन् एखादी वस्तु कोणाला उचलून देईन असे लोकाना वाटेनासे झालें पूर्वीचा चागुलपणा आटत चालला माणसे एकमेकाना परकी झाली गरिबाविषयी दया वाटण्याऐवजी भीति वाटू लागली या गोष्टींची झळ सुधेलाहि लागली सतत तिच्याकडे वस्तू पाटवणे लोकाना जमेनासे झालें माणसे ह्या गोष्टीचा कटाळा करू लागली त्याची आपुलकी आटली तिच्याविषयींचे कौतुक ओसरले सुधेला हें जाणवायचें आणि ती स्वत ला अधिकच घरात कोडून घ्यायची. ती पोर खगू लागली

(गरिबीचा महिमा हा असा आहे)

त्या पोरीकरिता माझा जीव तिळतिळ तुटायचा तिची दैना मला बघवेना तिच्या मदतीला धावावे असे वाटायचें माझ्याजवळ काहीं मोठे डबोले साठवलेले नव्हते पण आमचे दोन माणसाचें ठाकठीक चालले होते सुधेला काहीं उचलून द्यायचें म्हटले तरी देण्यासारखी परिस्थिति होती आणि तसा प्रसग पडला असता तर मीं वाटणीला आलेला अर्धा घास सगळा तिच्या तोंडातच घातला असता

पण ती पोर फार मानी होती कोणाकडून काहीं घ्यायला ती तयार नसे आणि एवढीशी चिमुरडी पोर ती, पण तिला काहीं द्यायचें म्हणजे भीति वाटायची तिच्याशी मोकळेपणाने बोलायचे म्हटले तर जीभ अडखळायची एकदा मीं नानाच्या हातात दहाची नोट कोबली होती बावळटासारखे नाना ती घेऊन घरात गेले पण थोड्याच वळानें घाबऱ्याघुबऱ्या माझ्याकडे आले भाबावल्यासारखे माझ्याकडे पाहात राहिले. त्याना काहीं तरी बोलायचें होते पण बोलता येईना. शेवटीं त्यानी ती नोट माझ्या पुढ्यात टाकली आणि ल्गबगीनें ते निघून गेले.

असे होत होते त्यामुळे मी फार कावायचो. बायकोला सागायचो, "तू सुधेला सगळ समजावून साग. हें तुझच काम आहे. बायका-

बायकात हें जमत पण तू मुल्खाची अडाणी. तुला काहीं म्हटल्या काहीं जमायच नाहीं ”

बायको चिडून म्हणायची, “तुम्हाला सगळे समजते तर तुम्हीच जाऊन काय तें करा ”

मग मी बायकोवर अधिकच कावायचों. अखेर ती रडू लागायची आणि मग मी फडाफडा स्वत च्याच तोडात मारून घ्यायचों बायको डोळे पुसून माझा हात धरीत म्हणायची, “आता पन्नाशी आली म्हणून म्हातारचळ लागला की काय ?”

काहीं नाहीं तर मी आपला सुधेच्या घरात जाऊन बसत असे रोज तास दोन तास मी बसायचो मी गेलो म्हणजे सुधा पहिल्या पहिल्यानें घरात जाऊन बसायची बाहेर म्हणून ती येतच नसे पण हळुहळू ती बाहेर येऊ लागली माझ्या शेजारी बसू लागली. गप्पागोष्टी करू लागली मी तिच्याकडून केसरी वाचून घेत असे. तिला गमतीदार गोष्टी सागत असे माझ्या गोष्टी काहीं मोठ्या गमतीदार नसत म्हणा पण ती चतुर पोर बळेंच हसून तें सगळे साजरे करायची फार उशिरा हें मला उमगलें, तेव्हा मीं रागानें तिला चापटी मारीत म्हटले, “पोरी, मला फसवतेस काय तू ? खोट खोट हसतेस काय ?”

ह्यावर ती केवढ्यानें किंचाळली लपलेली असताना तिला पकडलें म्हणजे जशी किंचाळायची तशी किंचाळली आणि मग पोरीने लाजून माझ्या माडीवर डोके टाकले

तिला थोपटताना एवढे धन्य वाटले मला घरी जाऊन मीं ते बायकोला पुन्हा पुन्हा सागितलें शेवटीं ती कटाळून म्हणाली, “कितीदा सागायच ते मेल ”

इतका रागावलों मी तिच्यावर त्या दिवशीं रात्रीं मी जेवलोच नाहीं आणि रात्रीं ती बिछान्यात रडत होती तर मी उलट्या बाजूला तोड करून झोपल्याचें सोग घेऊन गप्प पडून राहिलो

त्यानतर सुधा आपल्या मनातलें माझ्याजवळ बोलायची. ती मला म्हणायची “का हो, इतकी महागाई झाली अण्णा ? कशाला हीं मेलीं

युद्ध होतात ?"

"सगळे गरीब लोक आता काय करीत असतील हो ?"

केसरीतल्या दुष्काळाच्या हकीकती वाचून तिला रडू यायचें ती म्हणायची, "मी नाहीं केसरी वाचणार मला रडू येते "

आणि एकदा ती म्हणाली, "अण्णा—मला कुठे नोकरी मिळेल का हो ?"

नतर तिच्या लक्षात आलें की आपण काहीं तरी बोललों आणि ती घरात पळून जायला लागली पण मीं तिला तेव्हा अडवलें आणि म्हटलें, "वेडे पोरी ! एवढीशी तू आणि इतक दु ख कशाला सहन करतेस ? कोणीं सागितलय् तुला हा भार वहायला ? आमच्यावर तुझा काहींच विश्वास नाहीं का ? आम्ही कोणीच नव्हत का तुझे ?"

ती बराच वेळ माझ्याकडे पाहात राहिली माझे हात तिने घट्ट दाबून धरले आणि मग ती पळून गेली

नाना गॅलरीतून आत येत म्हणाले, "काय म्हणालात ? काय झाल तिच ?"

आणि क्षणभर गोंधळल्यासारखे उभे राहून ते बाहेर गेले इतकी चीड आली मला तेव्हा त्या माणसाची !

त्यानतर सुधा अबोल झाली माझ्याशीं देखील ती बोलेना पोर मनात झुरत होती आणि इकडे माझाहि जीव कालवत होता

नतर एकदा आमच्याकडे हळदीकुकू झालें आणि सुधाला अर्थात् आमच्या हिने बोलावलें

सध्याकाळीं घरीं आल्यावर मीं विचारलें, "काय ? सुधा आली होती का हळदीकुकवाला ?"

बायको म्हणाली, "दोनदा बोलावण पाठवल, पण पोर आली नाहीं आणि ह्या धावपळींत की नाहीं, मला तिच्याकडे जायला वेळ झाला नाहीं "

तें ऐकून मी खूप चिडलो बायकोवर खेकसून म्हटलें, "एवढी कसली नट्टयापट्टयात गुतली होतीस ? त्या एवढ्याशा पोरीच कुणी नाहीं तिची आठवण देखील नाहीं झाली तुला ? असा किती वेळ लागला

असता जाऊन यायला ?"

बायको न रागावता हसून म्हणाली, "एवढ आहे तर दत्तक तरी घ्याव पोरीला!"

पण तिचें पुढे न ऐकता मी सरळ सुधाच्या घरात गेलो मला पाहून ती एकदम आत पळाली आणि दाराआड तिने तोड लपवले पण मी तिच्या मागोमाग गेलो आणि बळेच तिचे तोड माझ्याकडे फिरवीत म्हटलें, "काय झाल ग सुधा? मला नाहीं का सागायच?"

पोरगी लटलटा कापत होती भाबावून माझ्याकडे पाहात होती मग तिची नजर माझ्या नजरेला भिडली आणि एकदम तिला सगळे काय ते समजले कसला तरी बाध फुटला तिने एकदम मिठी मला मारली आणि मोठमोठ्याने अगदी ओक्साबोक्शी ती रडू लागली

मला मिठी मारून तशी ती रडत होती तेव्हा मला फार वाईट वाटत होतें. आणि फार बरें वाटत होते घट्ट पोटाशी धरून मी तिच्या पाठीवरून हात फिरवीत होतो आणि तिला रडू देत होतो

थोड्या वेळानें मीं तिला थोपटीत विचारलें, "काय झाल बाळ? मला नाहीं का सागायचे?"

हुदक्यानी तुटलेल्या शब्दात ती म्हणाली, "अण्णा—अण्णा! मला घालायला चागला फ्राक नाहीं हो—मला दागिने नाहींत, काहींच नाहीं मला तुम्ही टाकू नका हो अण्णा"

"वेडे पोरी! तुला का कधीं मी टाकीन? उगी आता रडू नको पूस डोळे आधीं" आणि माझ्या धोतराच्या सोग्याने मीं तिचे डोळे पुसले तेवढ्यात तेथे आलेली माझी बायको म्हणाली, "तिचे पुसलेत, पण स्वत.चे नाहीं का पुसायचे?"

तेव्हापासून सुधा आमची झाली आणि दोन वर्षांनीं तिचे अण्णा वारले तेव्हा मुळीं ती आमच्या घरीच राहायला लागली.

♠ ♠ ♠

## ७. खेळण्याची कहाणी

ती खोली लहानशी चौकोनी होती  तिची गुळगुळीत फरशी फिक्कट हिरवी होती आणि तिच्या नितळ भिंती फिक्कट निळ्या होत्या  खोलीच्या दरवाज्यावरच्या निळ्या पडद्यावर गुलाबी फुले होतीं  वारा आला की तो पडदा जरा रुळत होता, जरा झुलत होता  गुलाबी फुलें देठातून जरा लवायची, वायुलहरी पडद्यावर क्षणभर उमटायच्या, पुन्हा पुसल्या जायच्या  पडद्यातून गुलाबी डूब दिलेला उजेड झिरपत होता

खोलीची खिडकी अर्धवट मिटलेली होती, त्यामुळे खोलीत काळसर उजेड पसरला होता  खिडकीजवळ तो जरा फटफटीत होता  पडद्याजवळ तो जरा उजळून गुलाबी होत होता  कोपऱ्या-कोपऱ्यातून त्याचा काळसरपणा अधिक दाट होत होता  आणि पलंगाला चढलेली पॉलिशची तुकतुकीत धुंदी त्या उजेडात अधिकच खुलत होती

खिडकीच्या फटीतून उन्हाची एक पट्टी फरशीवर पडलेली होती, आणि वरच्या शटरमधून दोन कवडसे जरा पुढे ठिबकले होते  ते पाहून असे वाटत होते, की कोणी तिरळ्या डोळ्याचा खोटा बागुलबुवा नाकावर बोट ठेवून सांगतो आहे, 'शू ऽ ऽ ऽ त्! चुप राहा म्हणतो ना!'

त्या दटावण्यानेंच कीं काय, सगळे आवाज, सगळी वर्दळ, सगळी धादल, खोलीबाहेरच थबकली होती  अपारदर्शक काचेंतून दिसणाऱ्या माणसाच्या चेहऱ्यासारखे त्या खोलीत येणारे आवाज भासत होते  पावलांचे आघात, बोलण्यातले चढउतार, कपबशाची किणकिण, ह्या

साऱ्या आवाजावर कोणी स्तब्धतेचें रेशमी आवरण टाकलें होतें आणि धक्काबुक्की करीत धावणाऱ्या घटनाची मिरवणूक कुठच्या तरी दूरच्या रस्त्यावरून चालली आहे, असे तेथे वाटत होते

फरशीच्या रेषाच्या अक्षाश-रेखाशानी मोजावें असे ते छोटे अलग विश्व होते आणि त्या विश्वाचा राजा असलेले बाळ पॉलिश केलेल्या पलगावर झोपलें होते —मऊ गादीवर, नाजुक मच्छरदाणीत, जगात नव्याने प्रवेश करणारा एक जीव जगापासून अलग, सुरक्षित असा ठेवण्यात आला होता

आरोग्याच्या नियमाच्या चौकटींत वाढणारे बाळ, बाळसे घेऊन पुष्ट झालें होतें त्याच्या हातापायाना मासल वळ्या पडल्या होत्या फुगीर गालाच्या उचवट्यात नाक बुडून गेलें होते नुकत्याच कुठे डोळ्यावर भुवया कोरल्या जात होत्या आणि चेहऱ्यावर मानवी भाव उमटू पाहात होते श्वास नाकपुड्यात अडत होता बेबी टपोरलेलीच होती आईच्या कुशीतून बाहेर लोटले गलेले पाहुणे शरीर अजून नव्या वातावरणात रुळलें नव्हते अनेक तासाच्या दीर्घ निद्रेतले जागृति हे एक स्वप्नमय मध्यन्तर होते

बाळ दचकलें हातपाय झटकले गेले झोप चाळवली डोळे उघडले, मिटले, पुन्हा उघडले बाळाने एक लाबलचक दतहीन वेडीवाकडी जाभई दिली वर सरकलेल्या गालात डोळे जरा बुडाले. मान जरा वाकडी झाली वळलेल्या मुठी जरा हलल्या जागृतीचे मध्यन्तर सुरू झालें.

प्रथमच तोडावर रडण्याच्या सुरकुत्या पडल्या तेवढ्यात नवखे डोळे कशावर तरी केंद्रित झाले रगाचा एखादा तुकडा, प्रकाशाचा एखादा कपटा मग उगारलेल्या मुठी तशाच हवेत थाबल्या आपटण्याकरिता उचललेले पाय आपसुख खाली टेकले आणि हसण्याकरिता तोड वेडें-वाकडे उघडले. हात हलवीत, पाय आपटीत, मान वळवीत आणि डोळे फिरवीत बाळ जगाची ओळख करून घेऊ लागलें. काळ आणि गति, रग आणि आकृति, ह्याचे सस्कार एका मनावर होऊ लागले.

चोखण्याकरिता मूठ तोडाजवळ गेली डोळ्याजवळ अडली, नाका-

जवळ आपटली, हनुवटीखाली अडकली मग ती तोंडात गेली. 'चुक्–चुक्' चोखण्याचा आवाज झाला पण तेवढ्यात तोंडातली मूठ बाहेर पडली त्रिनभुवयाच्या डोळ्यांनीं आश्चर्य व्यक्त केले तोंडातून हुंकार निघाला

तेवढ्यात लपवून ठेवलेल्या बाहेरच्या जगातली एक चिमणी, फुटक्या शटरमधून आत आली खिडकीच्या कडेवर बसून चिवचिवली. बाळाचें डोकें मागे कललें डोळे कपाळात गेले उचललेली मूठ हवेंतल्या हवेंत थबकली मग चिमणी दिसली आणि तेवढ्यात चिमणी हरवली पुन्हा चिवचिवाट ऐकू आला कपाटावर बसलेली चिमणी पुन्हा दिसली चिमणीने इकडे पाहिले, तिकडे पाहिलें, चिवचिवाट करून बहुधा नापसती व्यक्त केली, आणि फुटक्या शटरमधून ती भुर्रकन बाहेर उडून गेली

बाहेरच्या जगाचा एवढाच सपर्क बाळाला झाला एक माशीदेखील मच्छरदाणीभोवतीं जरा गुणगुणली आणि मग कुठे तरी निघून गेली. आणि बाळाकरिता निर्माण केलेले एक निराळेच जग बाळाचें लक्ष वेधून घेऊ लागलें बाळाभोवतीं विखुरलेले, चिमुकलें खेळण्याचें विश्व !

कचकड्याच्या खेळण्याचा निर्जीव नाजुकपणा, प्लास्टिकच्या खेळण्याची रेखीव तकतकीत ऐट, लाकडी खेळण्याच्या साध्या सरळ बाह्य रेषा, पत्र्याच्या खेळण्याचे धारदार कगोरे आणि बोथट, बनावट, रबरी खेळाची मऊ गोल घडण, चिंध्याच्या चिमणीचा ऐसपैस अनिश्चित बाधा ! लहान आणि मोटी, भडक रगाचीं आणि फिक्या वर्णाचीं, स्थिर, डोलतीं आणि फिरतीं, इसापनीतीच्या, परीकथेंतल्या, अरबी गोष्टींच्या आणि अडाणी कल्पनेच्या, अशा विविध विश्वातून अवतरलेलीं, बोलकी आणि मुकीं, वात्रट आणि मूर्ख, नखरेल आणि साधीं, अशीं अनेक खेळणीं बाळाचे लक्ष वेधून घेऊ पाहात होतीं. सजीवतेचा आभास निर्माण करणारें तें निर्जीव विश्व बाळाला खुणावीत होतें त्याच्या कानात कांहीं कुजबुजायला उत्सुक झालें होतें कुठचें गुपित

सागणार होते तें बाळाला? त्या विविध आकृतींच्या आणि रगाच्या लिपीत काय लिहिलेलें होतें बरे? त्या वस्तूना घडवणाऱ्या हातानीं अभावितपणे त्यात कुठच्या कथेचें सूत्र ओवलें होतें? त्या नकलेंत कुठच्या अस्सलाची भेसळ झाली होती?

बाळाच्या जवळच एक प्लास्टिकचा बुवा उभा होता त्याला हातहि नव्हते आणि पायहि नव्हते फक्त एक भला मोठा गोळा आणि त्यावर चिकटलेला दुसरा छोटा गरगरीत गोळा पुष्कळ मोठे पोट आणि अगदीं छोटे डोके डोक्याचा गरगरीत आकारच त्याच्या मठ्ठपणाची खात्री पटवीत होता त्या ‘ प्राथमिक माणसा ’चे तोंड वासलेले होते, त्याच्या मूर्ख अहमन्य नाकाचें टोक हवेंत उडवलेलें होते आणि त्याचे गरगरीत गोळे मूढ आश्चर्यानें विस्फारलेले होते—बुब्बुळे थेट कपाळात गेलेली होतीं आपल्या बुडाच्या जडपणामुळेच तो उभा होता किती धक्के लागले तरी तो हलायचा, डुलायचा, पण पडायचा नाही निव्वळ अस्तित्व तेथे साकार होऊन उभे होते बाळाचा हात लागून त्याचा तोल जात होता, पण तें पडत नव्हते बाळाच्या नजरेसमोर ते जोरजोरात डुलत होते,—सारखे डुलत होते त्याच्या डुलण्याने खोक्यात उभी असलेली एक नाजुक बाहुली पडली आणि तिने आपले डोळे मिटून घेतले ती झोपली म्हणजे डोळे मिटायची, उभी असली कीं उघडायची ह्या दोनच अवस्था तिला माहीत होत्या

आणि जवळच एक कोंबडी उभी होती आपले पख तिनें लाडिकपणानें जरा विलग केले होते आपल्या नाजुक चोचीला तिनें लिप्स्टिक लावली होती कोंबडी खरी, पण फोर्टमध्ये फिरणाऱ्या स्मार्ट पोरीची ऐट तिच्या कारागिरानें तिला बहाल केली होती आणि कळ दाबली कीं ती एक अडे घालायची, पुन्हा कळ दाबली कीं दुसरें, मग तिसरे अडीं घालणारे ते यत्र! लक्ष वेधून घेणारा तो गिरेबाजपणा! बाळाच्या भोवतीं उभे केलेले ते निरुपद्रवी खेळण्याचें विश्व!

ह्या दोन्ही वस्तूच्या मागे असलेला एक उच्च, गलेलठ्ठ माणूस आपल्या आकारानेंच लक्ष खेचून घेत होता त्याचें पोट खालीं लोंबलें

होतें आणि त्यावर त्याचे खिशाचें जाकीट घट्ट बसलें होतें लठ्ठपणामुळे त्याची मानच अदृश्य झाली होती त्याच्या ठाशीव हनुवटीखाली चरबीचा फुगा आला होता जिवणी रुदावून आणि तिचा एक कोपरा चढवून तो हावरे हास्य करीत होता त्यामुळे त्याच्या गालावर तृप्तीची सूज आली होती त्याचे मोठाले डोळे निष्ठुरपणे लकाकत होते, आणि त्यातल्या जरा बारीक झालेल्या एकातून धूर्तपणा डोकावत होता त्याच्या टक्कल पडलेल्या डोक्यात एक भेग होती तिच्यातून आत टाकलेले पैसे तो पोटात साठवीत असे पण त्याला उलटापालटा करून किती हलवला तरी ते लवकर बाहेर पडत नसत ते खुळखुळत मात्र आणि असे वाटे की तो आपला एक डोळा पुरा मिचकावून अधिकच मोठ्याने हसत आहे खुळखुळणाऱ्या पैशाचे ते हावरे हास्य काय सागत होते बाळाला ? काय सुचवीत होते ?

त्या लठ्ठ माणसाच्या भोवतीं अनेक रबरी बाहुल्या होत्या मऊ, बोटचेपीं अगे होतीं त्याचीं टणकपणा कसला तो नव्हताच त्याच्यात त्याच्या घडणींत दुबळेपणा व्यक्त करणारी गोलाई होती रेखीव, निराळे असे व्यक्तिमत्व कुठल्याच बाहुलीच्या चेहऱ्यावर नव्हतें आपल्या पायावर उभे रहाणे त्याना फार कठीण जाई कोणी दाबलें कीं त्या दबत आणि एक बारीकसा तक्रारवजा आवाज करीत त्यात तक्रारीपेक्षा कारुण्यच अधिक असे )

पलीकडे पत्र्याचे सहा शिपाई बदुका रोखून रागेत उभे होते एकाच रगाचे, एकाच आकाराचे, एकाच चेहऱ्याचे—एकाच साच्यात घडवलेले त्याच्या चेहऱ्यावर भाव तो कसला नव्हताच त्याच्या घडणींत मार्दव मुळीं नव्हतेंच ते वेगवेगळे होते, तरी एकाच शिस्तींत जखडले गेले होते त्याना एकच गोष्ट माहीत होती—बदूक रोखायची आणि गोळी झाडायची का तें त्याना माहीत नव्हतें असा प्रश्न इतराना अगर स्वतःला विचारायची त्याना इच्छाच होत नव्हती.

दोन लठ्ठ निळे बॅडवाले तगड्या फाकून एकमेकाकडे पाहात मजेंत उभे होते एक आपल्या गळ्यात अडकवलेला पडघम मोठ्या उत्साहानें

वाजवीत होता ज्या जोरानें त्याच्या एका हातातली काठी खाली पडघमा-कडे येत होती, त्यावरून त्याचा उत्साह ध्यानात येत होता मान वाकडी करून आणि आपले गुलाबी गाल वर चढवून तो खूप खुषीने हसत होता दुसरा बिगुल वाजवण्यात बिल्कुल गढून गेला होता चैन होती बेट्याची!

उशाकडे एक पोलिसशिपाई हात आडवा धरून उभा होता आणि त्याला न जुमानता पुढे गेलेली एक मोटरसायकल पलंगाच्या कठड्यावर आपटून कोलमडून पडली होती तिचे मागचे चाक अधांतरी होते तेथे रक्ताच्या चिळकांड्या उडाल्या नव्हत्या, किंकाळ्या ऐकू येत नव्हत्या, पण चाकाचें ते शून्य मधूनच किंचित् पुढेमागे होत होते—जरा हलत होते

दुसऱ्या बाजूला एका टेबलावर चहापान चालले होते टेबलाभोवतीं तीन खुर्च्यांवर बाबा बाहुली, आई बाहुली आणि बेबी बाहुली बसलीं होतीं. मात्र चहापानाऐवजी भांडणच तेथे रंगलें होते

बेबी बाहुलीनें रागाने पाय फेंगाडले होते आणि हात रुंदावले होते. तिने मान मोठ्या टसक्यात उडवली होती, आणि त्यामुळे तिच्या डोक्यावरची हॅट मागे सरकली होती छे! ती बाबाचें पण ऐकणार नव्हती, आणि आईचें पण ऐकणार नव्हती मोठ्या माणसांचा जुलूम आता ती मुळींच सहन करणार नव्हती आपल्या मनाला वाटेल तसे ती वागणार होती बाबानीदेखील हात वर केले होते, मान उंचावली होती आणि त्याचे डोळे वटारल्यासारखे दिसत होते खूप रागावले असावेत ते आणि त्यानी आवाजदेखील चढवला असावा फारच शहाणी व्हायला लागली आहेत हीं पोरं अलीकडे! आईबापाची काहीं किंमतच वाटत नाहीं त्याना पण सांगून ठेवतोय्, मी असले लाड चालू देणार नाहीं ’

गमत अशी कीं बेबीपेक्षा मोठे असलेले बाबा तिच्यासारखेच पोरकट दिसत होते, आणि आई खुर्चीवर हात जुळवून मान खाली घालून बसून राहिली होती. डोळे वर करून हळूच दोघाच्याकडे पाहात होती

जरा दूर टोपपदरी लुगडे नेसलेली लाकडी आजी ठोकळ्यासारखी उभी होती. जुन्या वळणाचा सगळा थाटमाट होता तिचा. पावडर स्नोची

जिव्हाळा तिच्या चेहऱ्यावर नव्हती डोक्यावरून घट्ट पदर घेऊन आणि छातीशी हात जुळवून ती रुक्ष, आतुरलेल्या नजरेने ह्या सर्वांकडे पाहात होती असे नवराबायकोने शेजारी शेजारी बसून टेबलावर चहा पिणे तिला बिल्कुल पसत नसावें आणि आपल्या नातीवर तिच्या बापान असे खेकसावे ह्याचा तिला फारच राग येत असावा 'काहीं झाल तरी लेकराची जात त्याच वागण का अस मनावर घ्यायच ?'

आणखी पुष्कळ प्रकारचीं खेळणी बाळाच्या भोवती, टेबलावर आणि कपाटात ठेवलेली होती टिनच्या टबमध्ये एक कचकड्याचे बाळ अघोळ करीत होते, आणि मोठ्या खुषीत येऊन त्याने एक पाय वर उचलला होता एक रबराचें गुळगुळीत कुत्र्याचे पिल्लू पुढचे पाय फेगाडून आणि तुटक्या शेपटीचे टोक उभारून मोठ्या मजेने उभे होतें त्याने आपले मोठाले कान हवेत उडवले होते आणि ते चक्क हसत होते की ! दातबीत काही नव्हते त्याला, तरी ते बेटे हसत होते ! कसला बरें आनद होत होता त्याला ? आपण असे छोटे छानसे कुत्र्याचे पिल्लू आहोत, ह्याचीच त्या बेट्याला मौज वाटत असावी ! एक कचकड्याची गाय मागे वळून पाहात होती, आणि तिच्या मागे वासरू नसूनहि आहेसे वाटत होते एक घोडेस्वार भरधाव कुठे तरी जात होता घोड्याचे जुळलेले मागचे पाय मागे वाकले होते आणि पुढचे पुढे फेकलेले होते, त्याच्या बाधेसूद शरीराची आकर्षक कमान झाली होती आणि त्या डौलदार कमानींत त्याची सगळी गतिमानता साठवलेली होती स्वाराचे पाय घोड्याच्या कुशीत रुतले होते, एकजीव झाले होते आणि स्वार स्वत वाकून, शरीर आक्रसून बसला होता त्याची नजर समोर रोखलेली होती एकाच प्रेरणेने ते दोघे उद्युक्त झाले होते एकाच गतीने ते जात होते कुठे जात होते ते ? कुठे ?

ऐसपैस, अनिश्चित आकाराची ती चिंध्याची चिमणी कलडून निर्जीवपणे पडली होती बुडकुले चुलीवर चढलें होते एक विदूषक उच्च काठीवर शरीराचा त्रिकोण करून चढत होता प्लास्टिकच्या पारदर्शक गोलकात अनेक घोडेस्वार उभे होते, आणि कळ फिरवली की गरगरा फिरत होते. त्याच त्याच मार्गाने पुन्हा पुन्हा जात होते. आपण एका

गोलकात अडकलो आहोत ह्याची त्याना जाणीव नव्हती आणि क्षितीहि नव्हती. तिनक्याच ईर्षेने, त्याच रगणातून ते पुन्हा पुन्हा फिरत होते एक बाहुली हात पसरून आपल्या लकाकणाऱ्या डोळ्यानी विचारीत होती, 'कमा आहे माझा फ्रॉक?' मातीचा कामसू दिसणारा बैल गरीबपणे कुठे तरी चालला होता लग्न मोठ्या, विविध आकाराच्या, रगीबेरगी आणि अनेकढगी खेळण्याचें ते निर्जीव जग, सध्याकाळच्या प्रकाशात सजीव झाल्यासारखे वाटत होते असे वाटत होतें की त्याची हालचाल सुरू झाली आहे त्याचा कोलाहल ऐकू येत आहे जडतेच्या बधनातून मुक्त होऊन ते सुखदु खाच्या फेऱ्यात सापडत आहे

अगठा चोखीत बाळ पडलें होते पाय हलत होते मान गरगरा फिरत होती डोळे टकाटका पाहात होते तोडातून हुकार बाहेर पडत होते बाळ खेळण्याकडे पाहात होतें खेळण्याचे तें सुरक्षित, निरुपद्रवी विश्व काय सागत होते बाळाला? त्या विश्वाच्या रगीबेरगी पटात कुठच्या आकृती रेखलेल्या दिसत होत्या बाळाला?

सध्या बाळाला काहींच समजत नव्हते ज्यामुळे समजतें तें मनच मुळीं अजून आकार धारण करीत होते त्या विश्वाची भाषा त्याला हळू-हळू समजू लागणार होती त्याचा आशय अर्धामुर्धा पुढे केव्हा तरी उमजणार होता सध्या बाळ खूप खूप झोपणार होतें. जागृति हें जीवनातलें स्वप्नमय मध्यतरच होते

पण बाळ एकदम पाय झाडू लागले, हात जोरजोरात हलवू लागले. त्याच्या नितळ निर्व्याज चेहऱ्यावर रडण्याच्या सुरकुत्या पडल्या बाळाला काहीं तरी समजले होतें. बाळाला भूक लागली होती बाळानें मोठ्यानें टाहो फोडला

बाळ स्वतःच्या भाषेंत बोललें. खेळणीं ज्या भाषेत बोलत होतीं त्याच भाषेत बोललें,—नव्हे, खिडकीबाहेरच्या जगाच्या भाषेत बोललें. आणि त्या टाहोने बद खिडकीच्या त्या छोट्याशा खोलींतल्या शात, सुरक्षित वातावरणाच्या ठिकऱ्या ठिकऱ्या उडवल्या.

♠ ♠ ♠

# ८. सरळ रेषा

पोस्टमननें कडी वाजवली आणि मग 'म्हसकर' असे ओरडून त्यानें दाराच्या फटींतून एक पत्र आत सरकवलें

भितीजवळ बसून अगाला झोके देत आणि जानवें ओढीत सुरावर अभ्यास करणाऱ्या विनूचें लक्ष चटकन् त्या चौकोनी पाकिटाकडे गेलें अभ्यास थांबवायला नाहीं तरी तो निमित्तच शोधत होता उठून पत्र उचलण्याकरिता त्यानें हालचाल केली आणि एकदम त्याचे काळे भित्रे डोळे अप्पाच्याकडे वळले तो थबकला पुन्हा मुकाट्याने पुस्तक वाचू लागला

बैठकीवर माडी मोडून काहींतरी लिहीत बसलेल्या म्हसकर मास्तरानी तो आवाज ऐकला की नाही ते कळण्यास मार्ग नव्हता त्याचें लिहिणें मान वर न करता तसेच चालू होतें त्याची किडकिडीत, फासळ्या दाखविणारी पाठ त्यानीं तशीच पोलादाच्या कावीसारखी ताठ ठेवली होती त्याच्या निपटलेल्या चेहऱ्यावरचा तोच तो रुक्ष भाव कायम होता त्याच्या कपाळाच्या मध्यभागी असलेल्या दोन उभ्या रेषा तशाच उठून दिसत होत्या

लगबगीनें अनुताई बैठकीच्या खोलीच्या दाराशीं आल्या म्हसकर मास्तराना तसे बसलेले पाहून त्यानीं खोलीत टाकलेलें पाऊल मागे घेतलें तशाच त्या उंबऱ्याशीं घोटाळत उभ्या राहिल्या. वाकून दाराकडे पाहू लागल्या.

अप्पांना ऐकू जावें अशा बेतानें त्या म्हणाल्या, "विन्या ! पत्र का टाकलेन् पोस्टमननें ?"

विनू अंगाचे झोके थांबवीत म्हणाला, "होय काकी ! आत्ताच आलें पत्र " आणि अनुताईंनी डोळ्यांनी केलेली खूण पाहून तो घाबरत म्हणाला, "अप्पा ! पत्र आलय् ! आणून देऊं का मी ?"

अप्पांचें लिहिणें तसेंच मान वर न करतां चालू राहिलें अनुताईंना आणि विनूला माहीत होतें की अप्पांनी मनांत आणलें असतें तर मांडी-देखील न फिरवतां ते तसेंच संध्याकाळपर्यंत लिहीत बसले असते

अनुताईंच्या चेहऱ्यावर उत्सुकता नुसती ओथंबली होती त्यांना वाटत होतें की झडप घालून ते पत्र उचलावें आणि विनूला वाचायला सांगावें ते पत्र आपल्या लाडक्या लेकाचें असेल ह्याची त्यांना खात्री वाटत होती सूनबाईला दिवस गेले होते एव्हांना ती बाळंत व्हायला हवी होती पत्र आलें तेव्हां बहुधा सगळें नीट झालें असावें मुंबईत काय मोठाले डॉक्टर असतात पण कांही झालें तरी पहिली खेप चांगल्या उफाड्याच्या पोरी देखील

अनुताईंनीं अमंगळ विचार दूर लोटले जागच्या जागींच देवीला नमस्कार केला तसें सगळें ठीक झालें असणारच पण पत्र वाचून एकदां मनाची खात्री करून घेतली असती की बरें झालें असतें शिवाय नातू का नात ते कळायला त्यांचा जीव नुसता आतुर झाला होता नात काय नातू काय—पहिलें कोणीहि असलें तरी चालतें पण आपल्याला नातू होणार ह्याची अनुताईंना खात्री वाटत होती देवीला त्यांनी तसा नवस केला होता आणि देवीनें स्वप्नांत येऊन त्यांना आशीर्वाद दिला होता की, तुझ्या मांडीवर नातू खेळेल

अनुताई उभ्या उभ्याच नातवाला मांडीवर घेऊन खेळवूं लागल्या त्याच्या टाळूच्या खळगींत त्यांनीं चांगलें सध्येच्या पळीभर तेल जिरवलें. सूनबाईला त्या म्हणाल्या, 'सूनबाई ! ह्याला अमळ धर बरें मी बाळाच्या अंघोळीचें पाणी काढते अगं ! असें का हिसकफिसक करायचें मुलाला ? आतां एवढ्या थोरल्या वाढलेल्या मुली तुम्ही '

डोळ्यात जीव आणून अनुताई आपल्या यजमानाचे लिहिणे संपण्याची वाट पाहात होत्या त्याच्या ताठ पाठीच्या उठून दिसणाऱ्या फासळ्या अनुताईना क्षणभर भुताच्या बोटासारख्या दिसल्या आणि ती बोटे त्याचा गळा आवळू लागली अनुताईनी मनातली ती अमगळ कल्पना काढून टाकली इडापिडा टाळणाऱ्या देवीला पुन्हा एकदा नमस्कार केला आणि हिरमुसल्या नजरेने माघारे फिरून जड पावलानीं त्या कामाला लागल्या

चुलीला फुकर घालतानाच त्याच्या मनातले असमाधान एकदम पेटले त्या स्वत शीं म्हणाल्या, 'काहीं झाले तरी मी आता ऐकायची नाहीं मी जाणार मुलाचा भरला ससार एकदा डोळ्यानीं पाहिल्याशिवाय आता माझे समाधान व्हायचें नाहीं ' पुन्हा 'नाहीं व्हायचें' ह्या अर्थी त्यानी मानेला एक झटका दिला

आपले लिहिणे सपल्यावर अप्पानी वर पाहिलें आणि ते विनूला म्हणाले, "काय रे, ही काय अभ्यास करायची रीत झाली ? तुमचें लक्ष असे सतरा ठिकाणी कसे जाते ? पत्र आले असलें तर त्याचें काय करायचें ते मी पाहीन पण तुझे लक्ष पुस्तकावरच राहिले पाहिजे पोटात दोन दिवस जरी अन्न नसले आणि समोर जरी माणसे बासुदी-पुरी खात असली तरी पुस्तकावरचें लक्ष कणभर देखील ढळता कामा नये."

म्हसकर मास्तराचा हा आवडता दृष्टात होता ह्या दृष्टाताशीं त्याच्या जीवनातला एक प्रसग निगडित होता आणि गतवर्षांची अनेक पुटे जरी त्या प्रसगावर चढली असली तरी तो प्रसग मास्तराच्या आयुष्याची दिशा ठरवीत होता

आता विनू जसा मास्तराचा आश्रित होता तसेच मास्तर आपल्या मोठ्या बहिणीकडे लहानपणीं राहात असत तिथें मास्तराची एकदर आबाळच व्हायची आणि भुकेच्या वयात मुलाना दुपारीं खायला लागते हे त्याच्या बहिणीला कधींच उमगलें नाहीं. दुपारीं सारीं मुलें डबे उघडून खाऊ लागली की मास्तराच्या पोटात आग उठे निर्धारानें उठून ते दूर जात असत पण एक दिवस काय झाले कोण जाणे ! मास्तर

चटकन् एका मुलाला म्हणाले, "काय आणले आहेस रे आज फराळाला? मला बघू थोडे "

त्या मुलानें अप्पाच्या हातावर पोळी-भाजी ठेवली आणि मास्तराच्या कोवळ्या वाढत्या शरीराला भूक भागल्याचा विलक्षण आनंद मिळाला. पानावर साचलेला धुरळा पावसानें धुतला जावा तसे त्याच्या मनात त्या वेळीं झाले आणि मग त्याची लालचावलेली जीभ त्याना सारखी त्या मुलाकडे दुपारच्या वेळीं ओढून नेऊ लागली त्याच्याशीं लाचारीनें वागायला लावू लागली. आणि त्याच्या ह्या वागणुकीचा परिणाम त्या मुलाच्या मनावर होऊन तो त्याना रागवू लागला त्याची वेळीं अवेळीं थट्टा करू लागला मास्तराना हे लागायचें, बोचायचे पण दुपारी मलूल करणारी भूक पुन्हा त्याना हात पसरायला लावायची त्याची इच्छा नसताना त्याच्या तोंडावरून आशाळभूतपणा ओघळायचा

असे होत असताना एक दिवस त्या मुलाला मास्तराची थट्टा करायचा नवा मार्ग सुचला त्याना पोळी देण्याकरिता त्याने हात पुढे केला आणि जेव्हा त्यानीं अधाशीपणाने आपलाहि हात पुढे केला, तेव्हा हात मागे घेत कुत्र्याला झिडकारावे तसे त्या मुलाने केलें, 'हुडुत् !'

सारीं मुलें खदखदून हसलीं 'हुडुत् हुडुत्' म्हणून ओरडू लागली.

मास्तराची कानशिलें शरमेने नुसतीं लाल झाली दु:खाने त्याच्या डोळ्यात पाणी उभे राहिलें पोरानीं दगड मारल्यावर जसे कुत्रे केकाटत पळत सुटते तसे ते पळत सुटले दूरच्या झाडाला विळखा घालून ते किती तरी वेळ खदखदून रडत होते आणि त्या झाडाशीं तसे एकाकी बसून रडत असताना त्यानीं असा दुर्धर निश्चय केला कीं आपल्या मनातली सगळीं उत्सुकता सगळी बाल्यसुलभ हौस चेचून, चिरडून, नामशेष करून टाकायची आपल्याला काहीं हवें अशी इच्छा मनात उभी राहिली कीं ती उभ्या झाडासारखी जाळून टाकायची. ऋषिमुनींनीं जसा आपल्या मनावर विजय मिळवला तसा आपणहि मिळवायचें त्यानी ठरवले आणि ह्या निश्चयाच्या नशेंत त्यानी आपल्या मनाचा खून पाडून टाकला.

त्यानतर दोन दिवस ते जेवलेच नाहींत भुकेच्या वेदना होत होत्या. वेदनांचा आनद होत होता आनदाची नशा चढत होती ती नशा त्याना जन्मभर पुरली होती आपल्या इच्छाची होळी करीत ते सतत पुढे चालत राहिले होते त्या वणव्याच्या झगझगीत प्रकाशात आणि तप्त वातावरणात ते ऐहिक जगाच्या पलीकडे पोहोचले होते

आता देखील मनातली सारी उत्सुकता मेल्यावर त्यानीं ते पत्र उचलले, निर्विकारपणे वाचले आणि घरात जाऊन ते जेवायला बसले. खाल्लेल्या प्रत्येक घासाला ते प्रश्न विचारीत होते, 'अरे, तुझ्यात अशी काय मोठी गोडी आहे की माणसाला तुझा मोह पडावा? उ ! चव चव म्हणतात ती हीच ना?' आणि ह्या प्रश्नामुळे अन्नाचा तोंडात कोळसा झाला म्हणजे ते तो घास गिळीत होते

आपल्या बायकोच्या तोंडावरची पत्रातला मजकूर जाणण्याची उत्सुकता त्याना दिसत होती आणि म्हणूनच ते त्याच्याविषयीं कांहीं बोलत नव्हते

आपल्या बायकोची त्याना अपरपार दया येत होती. त्याच्या इतक्या वर्षांच्या सहवासाने देखील तिच्या साऱ्या इच्छा मेल्या नव्हत्या तिची कपड्यालत्त्याची, दाग-दागिन्याची, मौज करण्याची सारी हौस त्यानीं आज इतक्या वर्षात मारून टाकली होती. आता फक्त मुलावरची माया शिल्लक राहिली होती तिथे तिचें मन अजून अडकले होते, घोटाळत होतें ही शेवटली अडचण होती ती एकदा ओलांडली कीं अनुताई त्याच्यासारख्याच मुक्त झाल्या असत्या ज्या शुभ्र तेजानें भरलेल्या पलीकडच्या अवस्थेत मास्तरांचें मन जाऊन पोहोचलें होतें तेथे मग अनुताई देखील जाऊन पोहोंचल्या असत्या सगळ्याच माणसानीं त्या अवस्थेला जाऊन पोहोचावें अशी मास्तराची तळमळ होती.

अनुताई बराच वेळ उत्सुकतेनें मास्तराच्या चेहऱ्याकडे पाहात होत्या. पण मास्तराचा मुद्रेवरचा निर्विकारपणा जराहि ढळला नाहीं अनुताई चिडल्या, हिरमुसल्या झाल्या. आणि मग जो एक मनाला मूढ करणारा, सधिप्रकाशासारखा कळाहीन हतबुद्धपणा आता त्याच्या दीर्घ परिचयाचा

झाला होता, तो त्याचें मन झाकाळू लागला पण नाही त्या हा कोडमारा सहन करणार नव्हत्या काहीं झाले तरी त्यानी तोड वळविल्यामुळे मास्तराना त्याच्या चेहऱ्यावर हा नतर झालेला फरक जाणवला नाहीं तो परिचयाचा मूढ भाव तेवढा दिसला

त्यामुळे ते सतोषाने म्हणाले, "चिरजिवाचे पत्र आले आहे सूनबाई बाळत झाली मुलगा झाला तुम्हाला फार आग्रहाचें बोलावणे आहे "

अनुताईंचा जीव अगदी उडून गेला 'अहो राधाबाई ! ऐकलेत का? सूनबाई बाळत झाली, मुलगा झाला नाहीं, बसत नाही आता सगुणाकाकूना जाऊन सागून येते त्या रोज मला विचारतात 'नातवाला त्यानी न्हाऊमाखू घातले आपल्या बागड्या मोडून त्यानी त्याला साखळी केली त्याच्या जिवाची लगबग झाली

आशाळभूतपणे त्या म्हणाल्या, "मग आता तरी पाठवा मला दिनूकडे इतकी वर्षे राग मनात धरलात आता तरी विसरा काही झाले तरी आपलेच लेकरू ना बरें तें मला घेऊन तुम्हीच चला मुबईला नाहीं तरी मला कोण नेणार आहे मुबईस?"

त्या आशेनें आणि त्या मायेनें म्हसकर मास्तर चकित झाले इतके दिवस आपण ओतलेले पाणी पालथ्या घड्यावरच पडलें होते तर. त्याची बायको अजून आसक्तीतच गुरफटलेली दिसत होती असो, इतके जर तिचें मन दुबळे होने तर त्यावर काहीं इलाज नव्हता तसाच तिच्या नशिबाचा लेख असावा पण तिच्याकरिता मास्तर आपल्या मार्गावरून ढळणार नव्हते ज्या एका निरुद सरळ रेषेवरून ते चालत आले होते, तिच्यावरून ते चालत राहणार होते जें एक लोकसेवेचें व्रत त्यानी अगीकारले होते, त्याचा स्वीकार करायला आपला मुलगा तयार नाहीं असे जेव्हा त्याना आढळलें, तेव्हा त्यानीं त्याचा सबध तोडून टाकला होता तो पुन्हा जोडावा असे अजून काहींच झाले नव्हते

ते म्हणाले, "पुन्हा पुन्हा कशाला तो विषय काढतेस? तें माझ्या हातून होणे नाहीं "

"पण नातवाच्या बारशाला देखील नाही का जायचे मीं?" अनुताई धास्तावून म्हणाल्या

म्हसकर मास्तर काहींच बोलले नाहींत

तेव्हा मात्र अनुताईचा सताप एकदम उतू गेला त्या म्हणाल्या, "का हो? काय चुकले माझ्या मुलाचें? त्याने का चोरी केली का दरवडा घातला? तुमच्यासारखी जन्मभर मास्तरकी करून तो कोपराने माती खणत राहिला नाहीं हाच ना त्याचा गुन्हा? काहीं वाईट नाही झाले त्यात माझा जन्म हा असा गेला तो तरी ह्यातून सुटला हे बरे झाले"

म्हसकर मास्तर काहींच बोलले नाहींत आपल्या बायकोच्या हृदयात एवढा उमाळा असावा ह्याचें त्याना आश्चर्य वाटलें आणि तिनें तो असा व्यक्त करावा ह्याचा त्याना राग येत होता अग लटलट कापू लागेल असे वाटत होते आणि नेहमी विलक्षण थड असणारे आपले मन असे अनावर का होत आहे ह्याचे त्याना आश्चर्य वाटले मोठ्या कष्टाने त्यानीं ओठावरचे शब्द मागे परतवले

आपल्या नवऱ्याला तसे थडपणे बसलेले पाहून अनुताइचें मस्तक भणभणले साऱ्या आयुष्यभर पोटात भरून ठेवलेला सताप भडाभडा त्या ओकून टाकू लागल्या त्या म्हणाल्या, "अहो, तुम्हाला काहीं दया-माया आहे की नाहीं? जन्मभर माझा असा हा जगावेगळा ससार झाला अगावर एक फुटका मणी घातलात नाहीं, की नेसायला एक झळझुळीतसे पातळ दिलेत नाहीं होसेनें हळदीकुकू करीन म्हटलें तर कपाळाला आठ्या घातल्यात अहो, अहेवपणी देखील डोइत फूल घालायची मला चोरी झाली हसायचें कसे तें मुळीं मी ह्या घरात आल्यापासून विसरलें काय, काय मिळवलेंत माझा असा हा छळ करून? आणि आता नातू झाला तर त्याला माडीवर घेऊ देईनात तुम्ही त्यापेक्षा तो वरवटा घेऊन का नाहीं कपाळात घालीत माझ्या?" अनुताईना भडभडून आलें आणि त्या रडू लागल्या

म्हसकर मास्तराचे अग लटलट कापू लागले आपल्या बायकोने

आपल्या ससाराचें हें असे चित्र काढावें हे त्याना रुचले नाहीं नेहमी थंड असणारे त्याचे मन दुखावले, चवताळून उठलें असे का व्हावें हें त्याना कळेना आणि ते कळून घेण्याच्या मन स्थितींतहि ते नव्हते ते घोगऱ्या आवाजात ओरडले, "बस्स ! फार झाले मीं काय तुमच्यावर अमके करा अगर करू नका अशी जबरदस्ती थोडीच केली आहे? तुम्हाला मुलाकडे जायचें तर आत्ता ह्या पावली निघा मी मात्र येणार नाहीं. कदापि येणार नाहीं"

अनुताई आणखीनच तापल्या त्या ओरडल्या, "कशाला उगीच हें परवानगीचें नाटक करता? मी जर आज गेले तर तुम्ही मला पुन्हा घरात घेणार नाहीं ह्या दारात बसून जरी उबऱ्यावर डोके फोडून घेतलें तरी तुम्हाला पाझर फुटायचा नाहीं मग तेव्हा कुठे जायचें मीं? जन्मभर तुमच्याशी ससार केला. मग आता या म्हातारवयात दुसऱ्या कुणाच्या तोंडाकडे पाहू?"

म्हसकर मास्तरना ह्यापुढे ऐकून घेणे अशक्य झाले ते घोगऱ्या आवळलेल्या आवाजात म्हणाले, "बस बस, फार झाले अति झालें" आणि अर्ध्या जेवणावर आपोष्णी घेऊन ते उठले

ते उठले तशी विनूहि मुकाट्याने उठला त्या प्रसंगामुळे त्याची जेवणावरची वासनाच उडाली

अनुताई तशाच हतबुद्धपणे मटकन् बसल्या आणि समोरच्या भिंतींतून वाट शोधू लागल्या सतापाचे त्याना कढ येत होते किती भयाण, एकाकी आयुष्य होते त्याचें. त्याचा मुलगा आणि त्याचा ससार एवढाच त्यातला ओलावा होता. आणि आता तो नाहीं, हा कोंडमारा आता त्या सहन करणार नव्हत्या आपल्या मुलाला त्या भेटून येणार होत्या. त्याचा ससार एकदा डोळ्यानीं पाहणार होत्या. आणि मग परत आल्यावर मास्तरानीं घरात घेतले नसते तर त्या उंबरठ्यात डोकें आपटून जीव देणार होत्या

जायचें असे त्यानीं ठरवले खरें, पण कसे जायचें हें त्याना कळेना. सोबत कुणाची घ्यायची? प्रवास खर्चाला पैसे कुठून आणायचे? सारा

जन्म दुसऱ्याच्या बुद्धीनें वागलेल्या त्या बाईला आता स्वत:च्या बुद्धीनें कसे वागावें ते समजेना विचाराने माथे फिरून गेले

त्या एकदम ओरडल्या, "विन्या—"

विनू पुढे झाला

"काड आण बाहेरच्या खोलीतून"

विनूने काड आणलें

"हां, लिही"

"काय लिहू?"

"म्हणावे, की हे काहीं मला धाडीत नाहीत तेव्हा तूच ये आणि मला म्हातारीला घेऊन जा चार दिवसाची रजा काढ तेवढ्याकरिता मला बाबा काहीं एकट्याने जाणें जमायचें नाहीं माझ्या ससाराचे हे असे झाले आता तुझा ससार सुखाचा चालला आहे तो पाहवासा वाटतोय् थकत चालल्यें म्हणावे आता ही एवढी शेवटली इच्छा आहे आईची जर काहीं माया असली तर ये आणि घेऊन जा"

विनूने मजकूर जुळवून लिहिला लिहून झाल्यावर अनुताई म्हणाल्या, "जा, आता पोस्टात नेऊन टाक"

विनू म्हणाला, "होय, आता शाळेत जाताना टाकतो पोस्ट वाटेतच आहे"

"पेटू दे एकदा ती शाळा नाव काढू नको तिचें माझ्यासमोर मसणवट होईल त्या शाळेची. सवाष्णीचा तळतळून दिलेला शाप आहे हा तो कधीहि खोटा नाहीं व्हायचा" अनुताई एकदम उसळल्या

विनू भेदरला आणि एकदम तेथून पळत सुटला.

पत्र लिहिण्याचा एवढा मोठा निश्चय तडीस नेल्यावर अनुताईंना एकदम खचल्यासारखे झाले पुढे काय होणार त्याचें त्याना फार भय वाटू लागलें आपलें सारेच चुकलें असे पोटातून जाणवू लागलें त्याना असेहि वाटू लागलें की आपला मुलगा कसचा येतो आपल्याला न्यायला? त्याला मुळीं रजा मिळायचीच नाहीं शिवाय बायको ह्या अशा स्थितींत त्याला सोडायची नाहीं आणि कोणीं सांगावें, त्याच्या पोटात आईविषयीं

एवढी माया राहिली आहे की नाहीं ते? माणूस डोळ्यासमोर नसले म्हणजे माया आटते

असा एकेक विचार त्याचें मन खचवू लागला तशाच हतबुद्धपणे त्या समोरच्या भितीत वाट शोधत बसून राहिल्या

म्हसकर मास्तर आचवून बाहेर आले तरी त्याचें माथे भडकलेलेंच होते त्याचें अंग थरथरत होते त्याची नेहेमींची शांत स्थिर वृत्ति त्यांना सोडून गेली होती त्यांना वाटत होते की शिरा ताणून मोठ्याने बायको-वर ओरडावे तिला हात धरून फरफटत आणावे आणि या घराबाहेर ढकलून द्यावें आणि त्याच वेळीं त्यांना तिची भीति वाटत होती स्वयं-पाकघरात जायला ते धजत नव्हते इतके दिवस आपल्या सहवासात राहून बायकोने अशा ऐहिक इच्छांना चिकटून राहावें ह्याचे त्यांना नवल वाटत होते चीड येत होती जीवितभर आपण जे उदात्त ध्येय उराशी बाळगलें त्याचे तिला काहींच मोल वाटत नाही ह्याचा त्यांना विस्मय वाटत होता संताप येत होता

मास्तरानीं आपले मन निग्रहाने आवरलें आपल्या मनोवृत्तीची हेलकावे खाणारी कांडी नेहमीच्या ठराविक बिंदूवर आणून ठेवली. मनाचें उष्णतामान शून्यावर आणलें शांतपणें त्यांनी कपडे केले आणि ते शाळेला जायला निघाले

सकाळची वेळ असूनहि उन्ह चांगले कडक पडले होतें त्या उन्हात जरा चालल्यावर मास्तरांना एकदम थकल्यासारखे वाटलें त्यांच्या टोपीं-तून घामाच्या धारा सारख्या ओघळू लागल्या तांड नुसते घामाने निथळू लागलें भुवयांतून घामाच्या धारा चष्म्याच्या कांचावर उतरल्या आणि सारे धुरकट भुरकट दिसू लागलें. एकाएकी मास्तरांना वाटलें की, आपल्याला चक्कर येणार

मास्तर रस्त्याच्या कडेला अमळ सावलीत उभे राहिले ते मनाशी म्हणाले, 'हां! आता म्हातारपण आले आता असे व्हायचेच मघाशीं मनावरचा ताबा उडाला तो देखील म्हणूनच पण असे हातपाय गाळून चालायचें नाहीं. कुडींत प्राण आहे तोपर्यंत न थांबता काम करीत राहिले

पाहिजे मग आहेच केवढी तरी मोठी विश्रांति कधी न सपणारी!'
आपल्या विनोदामुळे त्याच्या चेहऱ्यावर क्वचित् झळकणारे नि सत्त्व हास्य उमटले

तेथून त्याना शाळेची टोलेजग इमारत दिसत होती ती इमारत पाहून त्याचें हृदय एकदम भरून आले ज्या एका शुभ्र, उग्र, तेजोमय वातावरणात वावरण्याची त्याच्या मनाची ओढ होती, त्यात त्यानी एकदम प्रवेश केला तेथे साऱ्या ऐहिक इच्छा व काळज्या वितळून गेल्या. आणि एक दिव्य, गूढ श्रेय तेवढे त्याच्या हृदयसपुटीत शिल्लक राहिलें

पस्तीस वर्षापूर्वी शिक्षण पुरे झाल्यावर मोठी सरकारी नोकरी मिळण्यासारखी असूनहि, त्यानी तिचा मोह सोडला होता आणि अज्ञानात व दारिद्र्यात खितपत पडलेल्या आपल्या हजारो, लाखो देशबाधवाना शिक्षणाने शहाणे करून सोडण्याचें महान् व्रत त्यानी अगीकारले होते आगरकर-चिपळूणकराचा ध्येयवाद त्यानी आचरणात आणला होता ती ज्योत तेवत ठेवली होती ह्या गावात शाळा सुरू करताना आलेल्या साऱ्या अडचणी त्याना आठवल्या त्या वेळीं दोन खणी जागेत चाललेले ते वर्ग ती एवढीशी मुलाची सख्या. महिन्याअखेरी मास्तराच्या हातावर पडणारा तो दहा रुपये पगार त्या अडचणी, ते अपमान, त्या अवहेलना, तो इतराचा वारवार झालेला निरुत्साह त्या साऱ्या हालअपेष्टाच्या आठवणीनी मास्तराच्या अगावर रोमाच उभे राहिले

त्या अडचणी आता सपल्या होत्या मुलाची सख्या वाढली होती. सस्थेला आर्थिक सुस्थिति प्राप्त झाली होती शाळेची भव्य इमारत उभी राहिली होती सगळ्या सस्थापकानीं आपापले पगार वाढवून घेतले होते

आणि असे झालें ह्यातच काहीं तरी चुकले असे मास्तराना वाटत होते त्यानी आपला पगार मुळींच वाढवून घेतला नव्हता शाळेत सगळ्यात कमींत कमी पगार त्यानाच मिळत होता त्याना वाटे कीं इतरानींहि असाच कमी पगार घ्यावा आपल्यासारखे दारिद्र्याचे भूषण अगावर बाळगावें. त्या हालअपेष्टा त्याना पुन्हा अनुभवायच्या होत्या.

शाळेची आणखी एक इमारत त्याना उभारायची होती आणि मग आणखी एक

पण अलीकडे सगळे बदललें होते शाळेचे इतर संस्थापक आपल्या ध्येयवादाला विसरत होते पैशाचा आणि मानमान्यतेचा त्याना लोभ सुटला होता आणि शाळेत नवीन शिकवायला म्हणून आलेली पोरे तर मोकळ्या वेळात पत्ते कुटीत असत, टिंगलटवाळींत वेळ घालवीत शिक्षकाच्या खोलीतल्या हशागप्पानी शेजारच्या वर्गांना त्रास होई. त्या खोलींत सारखा विडी-सिगारेटचा वास भरून राहिलेला असे

हें सगळे म्हसकर मास्तराना बंद करायचे होते आता ते म्हातारे झाले होते त्याना कोणी मानत नव्हते त्याच्या मागे त्याची टवाळी देखील होत असे पण म्हणून खचून जाण्यात अर्थ नव्हता. आता तर निकराचा प्रयत्न करायला हवा होता नुकतीच त्यानीं एका फाजील, तरण्या मास्तरच्या तोंडात चपराक मारली होती आणखी असेच

म्हसकर मास्तरनी आपले मन आवरले त्याचें उष्णतामान शून्यावर आणून ठेवले त्यानी निश्चय केला कीं, त्या दिवशीं संध्याकाळीं भरणाऱ्या संस्थेच्या कार्यकारी मंडळाच्या सभेत आपण निकरानें आपली बाजू मांडायची, ही अधोगति थांबवायची

दिवसभर मास्तरानीं आपलें काम केलें शिस्त राखली सगळ्याना कामाला लावले सगळे त्याच्याशीं परकेपणानें वागत. लहान मुलाच्या तळहातावर ठेवलेल्या बर्फाच्या खड्यासारखें सगळ्याना त्याचें अस्तित्व वाटायचें. पण म्हसकर मास्तरना तें जाणवलें असले तरी त्यानी ते दाखवलें नाहीं

संध्याकाळीं आपलें मन अधिकच कठोर करीत ते सभेला गेले त्याचे संस्थापक सहकारी तेथे बसले होते मास्तर गेल्यावर त्याची आपसातील कुजबुज एकदम थांबली सगळ्यानी चोरटेपणानें मास्तराकडे पाहिलें ते ज्याच्या शेजारी बसले त्या गृहस्थानी अंग चोरलें. अस्वस्थ हालचाली केल्या. शाळेचे प्रिन्सिपॉल असलेल्या वागळे मास्तरनीं आपलें नेहमींचें लाचार, गोंडा घोळणारें हास्य केलें आपल्या

ल्ह शरीराच्या बेडौल हालचाली केल्या त्याच्या टोपीची घडीची रेघ नेहमीप्रमाणेच कपाळाच्या एका बाजूला सरकलेली होती.

ठरलेले मामुली कामकाज संपल्यावर म्हसकर मास्तर आपलें म्हणणे माडणार होते पण तेवढ्यात एक सभासद भितीकडे पाहात म्हणाले, "आपल्या संस्थेच्या नियमाप्रमाणें पचावन्नाव्या वर्षी प्रत्येकाने रिटायर व्हायचे आहे ह्या नियमाप्रमाणे एक तारखेपासून म्हसकर मास्तर निवृत्त होतील त्यानीं संस्थेकरिता केलेल्या कार्यांचा गौरव करणारा एकादा ठराव आपण केला पाहिजे "

"हा माझे तर असे मत आहे की त्याना ह्या नि स्वार्थी कार्या-बद्दल फूल नाहीं फुलाची पाकळीं म्हणून संस्थेने हजार रुपये द्यावे " प्रिन्सिपॉल वागळे अघळपघळपणे म्हणाले त्यानी टोपीच्या घडीची रेघ कपाळाच्या मध्यभागीं आणली आणि मग पुन्हा ती बाजूला सरकवली

म्हसकर मास्तर थक्क झाले गागरून खचून गेले शाळेचा आणि आपला संबंध कधी तुटेल असे त्याना स्वप्नातहि वाटले नव्हते तो संबंध तुटल्यावर ते जगणार होते तरी कशाकरिता ? ते म्हणाले, "पण बिनपगारी काम करायला मी तयार आहे, मग शाळेत राहायला काहीं हरकत आहे का ?"

"पण तुम्ही तरी किती काम कराल आता ? 'I leave it to young men' प्रिन्सिपॉल वागळे फारच मनमोकळेपणाने हसले

ते भिंतीकडे पाहात बोलणारे गृहस्थ म्हणाले, "आणि हें तरी नियमात बसेल की नाही कोण जाणे, कारण म्हसकर मास्तर जरी राहिले, तरी त्याच्या हातातील अधिकार सगळे काढून घ्यावे लागतील हें त्याना कितपत रुचेल "

"कसे रुचेल हो हें कोणाला ? उद्या जर मला कोणी असे सांगितले तर मी ते मिनिटभरहि सहन करणार नाहीं तावडतोब उठून चालायला लागेन मात्र आपण म्हसकर मास्तराना हजार रुपये "

त्या अर्थशून्य बोलण्याकडे लक्ष न देता म्हसकर मास्तरानी सगळयाच्या चेहऱ्याकडे पाहिलें सगळयानीच त्याची नजर चुकवली आणि तरी

त्याच्या डोळ्यातील निळ्या पोलादी पात्यासारखी कठोर चमक म्हसकर मास्तराना दिसल्यावाचून राहिली नाही त्याच्यापैकी कोणालाच हा हाल-अपेष्टानाच सुख मानणारा कडक मनुष्य नको होता म्हसकर मास्तर हे उमजले

खुर्ची फर्रकन् मागे सरकवून ते उभे राहिले आणि म्हणाले, "पुरे झाले काय समजायचे ते मी समजलों तुम्हाला मी नको आहे आणि म्हणून मीं गेले पाहिजे पण लक्षात ठेवा की ही संस्था मी वाटवली माझ्या आयुष्याचें खतपाणी करून वाढवली तुम्ही सगळ्यानीं अग-चुकारपणा केलात, पण मी केला नाहीं तुम्हा सगळ्याना लोभ सुटला, पण मला मात्र तो कधीच सुटला नाही आता तुम्हाला माझी अडचण व्हायला लागली आहे ठीक आहे तसे असेल तर मला गेलेंच पाहिजे पण माझ काय तुम्हाला घालवता येणार नाहीं तें येथेच राहील ते तुमच्यावर पाहरा करील तुमच्या मनाला कधी स्वस्थपणा लाभू देणार नाहीं ते हजार रुपये मला नकोत ह्या भिकाऱ्याचे ते तुमच्या संस्थेला दान समजा आणि माझा जो काय चार हजार रुपये फंड आहे तो देखील मी शाळेला देऊन टाकतो "

"विचार करा म्हसकर, असलें काही करू नका उतारवयात चार पैसे हवेत हाताशी " प्रिन्सिपॉल वागळे एकदम बोलून गेले

म्हसकर तिरस्काराने म्हणाले, "लोकसेवेशिवाय मला दुसरे काहीच साठवायचे आणि दाखवायचे नाहीं जसा मी भणंग ह्या शाळेत आलो तसाच ही सोडून बाहेर पडणार आहे "

आणि म्हसकर निघून गेले सगळ्याच्या हृदयाना शरमेचें आणि भीतीचे कापरे भरवून गेले ज्या एका सरळ रेषेवरून ते आयुष्याचा मार्ग चालत आले होते ती त्यानी आकाशाला नेऊन भिडवली होती

म्हसकर शाळेतून बाहेर पडले तेव्हा त्याच्या मनातली सगळी भीति, सगळीं खळबळ नाहीशी झाली होती बोलायला सुरुवात करण्यापूर्वी त्याच्या मनात जो गोंधळ उडालेला होता तो आता नष्ट झाला सगळे कसे स्वच्छ आणि स्पष्ट झाले होतें. जीवनाचा जो मार्ग त्यानीं चोखाळला

होता, त्यावरून न ढळता कसे पुढे जायचें ते त्याच्या मनोदेवतेनेच त्याना सागितलें होते लोभी सहकारी आणि सुखाला लालचावलेली बायको त्याना अडवू शकत नव्हती ह्यापुढे ज्या आणखी हालअपेष्टा ते सहन करणार होते त्याच्या नुसत्या कल्पनेने त्याच्या अगावर सुखाचे रोमाच उभे राहिले

घरी येऊन त्यानी शातपणे हातपाय धुतले

इकडे अनुताई तशाच मूढपणें समोरच्या भितीत वाट शोधीत बसल्या होत्या आशानिराशेच्या हेलकाव्यानीं आणि शकाकुशकाच्या भिरभिरण्याने त्याचा जीव कासावीस झाला होता आपल्या हेकेखोर नवऱ्याच्या इच्छेविरुद्ध जाण्याचे त्यानी आयुष्यात पहिल्यानेच धाडस केले होते आणि आपल्या धाडसानेच त्या भेदरून गेल्या होत्या अज्ञात शकाकुशकानी त्याच्या मनाला असख्य भोके पाडली आपल्या मुलाला ह्यानी घरातच घेतले नाहीं तर? त्याला काहीं तरी फडाफडा बोलले आणि मग तो निघून गेला तर? आपण जायला निघालो आणि हे वाटेत उभे राहिले तर? आपण मुलाबरोबर बाहेर पडल्यावर ही उनाड बाई म्हणून गावातले लोक दगड मारीत तर मागून धावायचे नाहींत?— वेड्याच्या पाठी लागतात तसे आणि एकदा आपण गेलो म्हणजे ह्या घरात पुन्हा आपल्याला पाऊल टाकता यायचें नाहीं ह्याच्या पायाशीच सगळा जन्म घालवला, मरताना ह्यानीच माडी दिली कीं आयुष्याचें सार्थक होईल. नयेच जाऊ आता काय थोडे दिवस राहिले आहेत हालअपेष्टा काय व्हायच्या त्या थोडेच दिवस होतील हा जन्म असाच जायचा होता म्हणून समजायचे

पण माणसाने आशा तरी किती सोडायची? मन किती मारायचे? एवढेसुद्धा सुख माझ्या नशिबीं नसावे? एवढासुद्धा मला अधिकार नाही?

नातवाला न्हाऊमाखू घालायला त्याचा जीव अधीर झाला होता .

त्यानी राधाकाकूना आपल्या मनातलें सागितलें सगुणाबाईना सागितलें पण त्यामुळे मनातला गोंधळ वाढला मात्र.

म्हसकर मास्तरानीं विनूला अनुताईच्या समोर बोलावून घेतलें.

आणि खाकरून आवाज स्वच्छ करीत ते म्हणाले, "हें पाहा विनू, आजपर्यंत आम्ही तुला आश्रय दिला, पण आम्ही येथून जाणार, तेव्हा तू आपली दुसरी कुठ तरी सोय बघ थोडे दिवसापुरती "

काय होतेय् ते विनूला समजेना त्याचे ओठ थरथरले त्याला भीति वाटली हुदका आला स्वत चे पुढे कसे होईल म्हणून नव्हे, तर निराळ्याच कारणाकरिता आणि तो एकदम त्याच्यासमोरून पळून गेला खूप दूर पळून गेला

अनुताई शकेने आणि अस्फुट आशेने हे ऐकत होत्या म्हसकर मास्तर म्हणाले, "माझी शाळेतली नोकरी सपली आता आपण येथून जायचे उद्या नाहीं तर परवा हे गाव सोडून जायचे बरोबर काही फारसे घ्यायचे नाहीं "

अनुताई आशेने उद्गारल्या, "मग आता आपण दिनूकडे जाऊन राहू या निदान थोडे दिवस तरी राहून येऊ या आता शाळेचे हे सपलें आता त्याच्यावर कसला राग धरायचा? काय तुमचे काम करायचें होते ते सपले आता म्हातारपणाचे दिवस तरी सुखाने—"

म्हसकर मास्तर म्हणाले, "वेड्या आहात तुम्ही माझे काम हे कधीच सपायचें नाही एक सपले पण दुसरे सुरू होणार आहे इथे जे काय थोडे कमावलें ते शाळेच्या हवालीं केलें फडबिड सगळा देऊन टाकला आता माझ्याजवळ कपर्दिकहि उरली नाहीं "

"काय? सगळे देऊन टाकले? उतारवय झालें आता चार पैसे नको का गाठीं? माणसाला कधी तरी आयुष्यात सुख नको का लाभायला? द्यायचें द्यायचें म्हणजे किती द्यायचे? मन मारायचे मारायचें म्हणजे किती मारायचें? कसला आसुरी आनद होतो तुम्हाला असले करण्यात?" अनुताईचा आवाज रडवा झाला त्या पुढे म्हणाल्या, "आता माझे ऐका आपण दोघे दिनूकडे जाऊ म्हातारपणीं तरी विसावा घेऊ "

"माझ्याबरोबर यायला तो तयार झाला नाहीं त्यालाहि पैशाचा लोभ सुटला त्याचें तोड मी पाहणार नाहीं माझ्याजवळ राहयचे असेल तर तुम्हालाहि पाहता यायचें नाहीं आता दुसऱ्या गावात जाऊन पुन्हा

मी शाळा काढीन पुन्हा अर्धपोटीं राहायचे पुन्हा एकाच धडुतावर दिवस काढायचे पुन्हा साऱ्या हालअपेष्टा सहन करायच्या "

म्हसकर मास्तर सद्गदित झाले ज्या एका शुभ्र, उग्र, तेजोमय वातावरणात त्याचें मन रमत असे, त्याच्याशी ते एकरूप झाले होते त्याना शुद्धबुद्ध कसली राहिली नव्हती आनदातिशयाने ते सद्गदित झाले होते

त्याचें बोलणे ऐकून अनुताईची कबरच खचली वैतागाने त्या म्हणाल्या, "तुम्हाला तुमचे तेवढे सगळे दिसते पण आइचे आतडे तुटते ते कसे दिसत नाही? दगडाविटाच्या शाळा बाधाव्याशा वाटतात पण सख्ख्या मुलाची माया कशी वाटत नाहीं? कुठच्या भुतान झपाटल्य् तुम्हाला? नाहीं माझी ताकत नाहीं हे आता सहन करायची! मला मारून टाका, हवी तर कोयतीने मान तोडा, पण हा वनवास नको पुन्हा"

म्हसकर मास्तर'ना त्याचे बोलणें ऐकूहि गेले नाहीं आपल्या त्या उच्च वातावरणातून ते अनुताईच्याकडे पाहात होते आपल्याशिवाय सगळे चुकले आहेत ह्याची त्याना पूर्ण खात्री वाटत होती आणि साऱ्याच चुकणाऱ्या माणसाविषयी त्याना परमेश्वरी करुणा वाटत होती

त्याच्या मख्ख चेहऱ्याकडे अनुताईनी पाहिले आणि वैतागानें त्या तेथून निघून गेल्या मागील दारी गेल्या अळवाच्या खाचेजवळ उभ्या राहिल्या विहिरीच्या कडेशीं उभ्या राहिल्या

काय करावें ते त्याना समजत नव्हते मनाची ही ओढाताण त्याना असह्य झाली होती पाखराने पख फडफडवीत उडायचा प्रयत्न करावा आणि खाली कोसळावें तसे त्याच्या आयुष्यातल्या उरल्यासुरल्या मनोरथाचे होत होते एकदम त्याच्या मनात विलक्षण खिन्नता पसरली इतकी वर्षे ज्या हालअपेष्टा आपण सहन केल्या त्या आपल्या नशिबातच आहेत अशी त्याची खात्री पटली पुढल्या हालअपेष्टाचा डोगर त्या वेध् लागल्या त्यापलीकडे आणखी एक डोगर होताच

त्या रडव्या स्वरात म्हणाल्या, "नाहीं रे हें सहन होत आता दिनू थकलें मी. सभाळ आता आपल्या म्हाताऱ्या आईला."

तेवढ्यात दिनू कुठूनसा म्हणाला, 'हा बघ, आई, मी आलो, तुला न्यायला आलोय् '

अनुताईनीं अधिऱ्या नजरेने इकडे तिकडे पाहिले पण दिनू तेथे नव्हता नुसता भासच होता तो समोर विहीर होती मागे घर होते त्यांनी एक पाऊल पुढे टाकले असते तर मरण आले असते मरण म्हणजे काय असते ? जगण्याहून ते कसे वेगळे असते ?

अनुताईनी पाय मागे घेतला पण तो पुढेच पडला पडताना अनुताईना अशी चमत्कारिक शका आली की, आपण पाय चुकून पुढे टाकला, की मुद्दाम टाकला त्रयस्थपणे ही चमत्कारिक शका त्यांनी स्वत ला विचारली

आणि मग—!



# १०. आमची सोनी गाय

आमच्या गोदवल्याला बाबानी जमीन घेतली आणि घर बाधले तेव्हा मुबईहून मोठ्या हौसेने एक गाय नेली तिचे नाव बाळगी गावी नेल्यावर तिला एक पाडी झाली आणि मग दोन वर्षांतच ती गळ्याचा रोग होऊन मेली त्या वेळीं मी लहान होतों त्यामुळे बाळगीची मला आठवण नाहीं पण आमच्या घरातली माणसे बोलत त्यावरून ती मोठी सालस आणि गुणी गाय असावी विशेषत आमच्या आजीला तिच्या आठवणीचे उमाळे फार यायचे तिच्या म्हणण्याप्रमाणे ती गाय चागली ‘ टकलीइतकी ’ उच होती

मी भाबडेपणाने विचारायचो, “ कोणाच्या टकलीइतकी ? ”

पण आजीला तो प्रश्न बहुधा ऐकू जात नसे आणि गेलाच तर ती म्हणायची, “ अरे, टकलीइतकी म्हणजे काय ! होयत्या स्टॅडाएवढी ”

ती ज्या दिशेला हात करायची त्या दिशेला दोन-तीन स्टॅड होते त्यामुळे बाळगी कोणत्या स्टॅडइतकी उच होती, हा प्रश्न शिल्लक राहायचाच पण तो प्रश्न मी तिला विचारीत नसे कारण असले प्रश्न विचारून गोष्टीची रगत बिघडवायची नसते हे इतर लहान मुलाप्रमाणे मला देखील उपजत बुद्धीनेंच माहीत होते आजीची गोष्ट पुढे चालू राहावी म्हणून मी म्हणायचों, ‘ हु ’ आणि तरीहि ती चालू झाली नाहीं तर मी सूचकपणें विचारायचों, “ तिचा पायगुण चागला होता ना ग आजी ? ”

कारण आजीची ही गोष्ट मी अनेकदा ऐकली होती आणि ती पुढे काय सांगणार ते मला माहीत असे माझ्या या प्रश्नाची मात्रा बरोबर लागू पडायची आणि आजी ताक करायची थांबून आणि आवाज अगदीं कुजबुजता करून म्हणायची, "तिला ज्या वरसात घेतली ना, तेव्हा तुझ्या काकाचा पगार, बघ, पन्नासानी वाढला!"

ह्या गोष्टीचें महत्त्व माझ्या मनावर ठसावें म्हणून आजी अमळ थांबायची आणि मग हसून म्हणायची, "ते सगळे पन्नासच्या पन्नास त्याने मला दिलेन् हो! आता तू बघू या चाकरी लागल्यावर काय करतोस तें!"

आजीला पैशाचा लोभ फार होता आणि मी चांगला मोठा पगारदार म्हणजे मामलतदार होऊन माझा पहिला पगार तिला द्यावा, अशी तिची महत्त्वाकांक्षा होती

आजीने असे म्हटलें म्हणजे मी लबाडीने खिदीखिदी हसायचो कारण माझे पगाराचे पैसे कोणालाच द्यायचा माझा विचार नव्हता आणि मी तर मोठेपणी फाटका मामलतदार न होता बालिष्टर होणार होतो बाबा वकील, तर मी बॅरिस्टर!

आजी मग पुन्हा मूळ विषयाला हात घालून म्हणायची, "काय बाबा त्या गाईचे एकेक गुण म्हणून सांगू! कध्धी म्हणून तिने अंगणातल्या वाळवणात तोंड घातलं नाहीं कधी चोरून दुसऱ्याच्या शेतात शिरली नाहीं, का कधीं कोणाला मारलन् नाहीं आम्ही बायकामाणसेसुद्धा तिला दावें लावीत असू आता तुझी काकू इतकी भित्री ना, पण तीसुद्धा तिच्यापुढे खाणे नेऊन ठेवायची"

काकू जर तेथे त्या वेळीं काम करीत असली तर आजीला ऐकू जाणार नाहीं अशा बेताने फणकारायची, "भित्री म्हणजे काय?—जनावर मारकुट असलं तर नको का भ्यायला? की घ्यायचीं आहेत हाड मोडून?"

आजी पुढे म्हणायची, "आणि एकदा बघ बाळगीला अंगणात बांधली होती तेव्हा तू रांगत रांगत तिच्या पोटाखाली जाऊन बसलास"

माझ्या दृष्टीने गोष्टीचा हा उत्कर्षबिंदु असे त्यामुळे मी विचारायचो, "केवढा होतो ग मी तेव्हा ?"

"असशील मेल्या हाताएवढा " आजी लोणी आलें की नाहीं ते बरणीत वाकून पाहात म्हणायची

मी अविश्वासाने म्हणायचो, "काहीं तरीच !"

कारण मी एवढा कधी लहान असेन आणि रागत गाईच्या पोटाखाली जाऊन बसण्याचा मूर्खपणा करीत असेन हे मला तेव्हा खरेच वाटत नसे पण हा विचार करीत बसायला तेव्हा मला जास्त सवड नसे मी गाईच्या पोटाखाली बसलेला असताना आजीची गोष्ट थाबली की भीतीने आणि उत्कठेने मी अगदी गल्बरून जात असे मला वाटायचे, की या वेळीं देखील मी गाईच्या पोटाखाली बसलेला आहे आणि गाय माझ्या अगावर पाय देणार की नाहीं हे केवळ आजीच्या शब्दावर अवलबून आहे मी उत्कठेने म्हणायचो, "ह पुढे साग ना आजी "

"अरे सागायचें काय ? तू तिथे किती वेळ होतास हें परमेश्वर जाणे. पण आम्ही येऊन तुला उचलीपर्यंत गाईने जागचा पाय हलवला‍न् नाही आम्ही येऊन तुला उचलले तेव्हा गाय बाजूला सरली "

आजीने असे म्हटल्यावर माझा जीव भाड्यात पडायचा ह्याच वेळीं बहुधा आजी दोरीची रवीला गाठ मारीत असायची, आणि आता लोणी किती मिळते ह्याचा मी विचार करू लागायचा पण तसला विचार माझ्या मनात देखील नाहीं हे दाखविण्याकरिता मी उसन्या उत्सुकतने विचारायचा, "आणि बाळगी दूध ग किती द्यायची आजी ?"

असा प्रश्न विचारल्यावर आजी अमळ थाबायची आणि मग जवळच्याच एका चरवीकडे बोट दाखवून म्हणायची, "होयती चरवी आहे ना, ती अगदीं भरून दूध द्यायची ती अरे, म्हैस कसले देते इतकें दूध "

आजीने असे म्हटले की माझी आई जर तिथे त्या वेळीं काम करीत असली तर तिला राहवायचे नाहीं खरे फटकळपणें बोलण्याची तिला सवय होती ती म्हणायची, "बाळगीने तेवढी चरवी भरून दूध दिलेले मीं काहीं पाहिलेले नाही "

आजी म्हणायची, "तू पाहिलें असशील कसे ? बाळगी व्यायली तेव्हां मुळीं तू माहेरीं गेली होतीस बाळंतपणाला "

आई भांडखोरपणें म्हणायची, "हो, पण दोन महिन्यानीच मी आलें आणि इथेंच नव्हते का चांगली तीन महिने रोज सकाळ-संध्याकाळ मीं पाहिलेले आहे बाळगीचे दूध "

मग आजीला देखील जोर चढायचा आणि ती म्हणायची, "दुधाचा रोजचा वापर माझा दूध तापवायची मीच आणि विरजण लावायची पण मीच ह्याच चरवीतून रोज लक्ष्मण दूध काढायचा आणि चरवी भरलेली असायची कधी बोटभर गळ्याच्याखाली "

आई मग भांडण वाढू न देण्याच्या उद्देशाने जरा खालच्या आवाजात म्हणायची, "मीच लक्ष्मणच्या हातून चरवी घेत असे पण पाऊण चरवीच्या वर काहीं कधी दूध नसायचे "

मग आजी तरातरा उठून म्हणायची, "होय ती चरवी दूध काढायला असायची आणि तीहि इतकी भरलेली असायची."

इतके झाल्यावर आई पण चरवी पाण्याने भरायची आणि ती आजीपुढे ठेवून म्हणायची, "हें इतके दूध असायचें बाळगीचे "

आजी चरवीत बोट घालून किती पाणी आहे तें पाहायची आणि म्हणायची, "आणखी दोन भांडीं तरी दूध असायचें तिचें तुलाच बाळंतीण म्हणून अर्धा शेर आधी प्यायला देत असे मी "

मग आई पण चिडून म्हणायची, "कधीं कोण जाणे अर्धा शेर दूध प्यायल्ये ते सकाळीं धाकट्या कपभर आणि संध्याकाळीं तितकेच. आणि कपसुद्धा गळ्याबरोबर भरलेला नसायचा "

ह्या भांडणात आपला काहींच भाग नाहीं ह्याचें वाईट वाटून की काय, काकू म्हणायची, "मला जेव्हां सासूबाई दूध द्यायला सांगायच्या तेव्हां मी आपली अगदीं कप भरून देत असे "

आजी आशेनें म्हणायची, "आणि तूच नसस का ग रोज दूध देत तिला लक्ष्मी ?"

बाबा अगर काका घरात येऊन हे भांडण तेवढ्यात आवरलें नाहीं

तर त्याचें पर्यवसान काकूनें रडण्यात, आईने खोलीत स्वतःला कोंडून घेण्यात आणि आजीने उंबरठ्यावर डोके आपटून घेण्यात होत असे आणि त्या भानगडीत मला लोणी द्यायची कोणालाच आठवण राहात नसे

सांगायचें काय, की बाळगी गाईचे आमच्या घरात इतके दांडगे महत्त्व होते आमचा येशा गुराखी तर सांगायचा, की आम्ही गावाहून मुंबईला गेलो की बाळगी गाईच्या डोळ्यातून निदान दोनचार दिवस तरी सारखे पाणी गळत असायचे

ह्या बाळगी गाईची जी पाडी होती तिचे नाव सोनी बाळगीच्या अगच्या ज्या गुणाचे मी वर्णन ऐकत असे त्याच्या अगदीं विरुद्ध गुण सोनीच्या अंगी होते ती खुजी होती बाळगी जर टकलीभर उंच होती, तर हिची उंची कंबरेइतकीच होती तिची शिंगे बोटभर देखील नव्हतीं आणि ती हात लावला की हलत असत त्यामुळे ती भुंडी दिसायची तिच्या चेहऱ्यावरचें मुर्दाडपणाचें पाणी कोणालाहि ओळखू येत असे आजीचीं वाळवणे ती खात असे इतकेंच नव्हे, तर स्वयंपाकघरात शिरून वाढलेलीं पाने देखील संधि मिळाल्यास फस्त करीत असे दुसऱ्याच्या शेतात जाऊन पिके खाणें ही तिची नेहमींची सवय कितीहि उंच वारंग असला तरी एका उडीसरशीं ती पलीकडे जात असे आणि कधीं कोणालाहि न सापडता परत येत असे तिच्या पायीं येशा गुराख्यानें इतक्या शिव्या खाल्ल्या होत्या की तिला रोज मोठ्या बाबूच्या काठीनें धोपटणे हे तो आपले परमकर्तव्य समजत असे, आणि त्यात मींदेखील सहभागी व्हावे अशी त्याची इच्छा असे सोनीचा बाप हा अगदीं मोठा द्वाड होता, आणि त्याने अनेक गाड्या मोडून अगर उलटून टाकल्या होत्या अशी खास माहिती त्याने मला पुरवली होती 'तुझ्यावर पटकी का येत नाहीं?' असा प्रश्न तो रोज सोनी गाईला विचारायचा बैलाशीं आणि टोणग्याशीं देखील टेपा द्यायला सोनी गाय तयार असे तिला शिंगे नसलीं तरी गनिमी काव्यानें तिनें अनेक माणसाना लोळविलें होतें आणि तिच्या वयाला पाच वर्षे झालीं होतीं तरी ती अजून व्यायली नव्हती

ह्या सोनी गाईबद्दल आमच्या घरांत दोन पक्ष होते, आणि त्यांचे मतभेद फार तीव्र स्वरूपाचे होते माझे बाबा स्वभावानेंच आशावादी व दयाळू त्यामुळे सोनी गाय विटेल अशी त्यांना आशा वाटायची आणि तिला विकून हालांत टाकावें असे त्यांना वाटत नसे बाबांना वाटायचें तसेंच अर्थात् आईला व मला वाटायचें ह्याच्या उलट आमचे काका स्वभावाने व्यवहारी व निराश वृत्तीचे होते त्यांचें म्हणणे असे, की सोनी गाय भाकड आहे असा लोकांना संशय येण्यापूर्वींच तिला विकून टाकावें काकू अर्थात् अपरिहार्यपणे काकांच्या पक्षाची होती आणि आजीचा कल देखील त्यांच्याच बाजूला होता ह्या दोन पक्षांचे सोनी गाईवरून जोराचे वादविवाद होत असत

त्या दिवशी बाबा खोबरे खात खात अंगणांत फेऱ्या घालीत होते आणि त्यांच्या मागोमाग कर्तव्यबुद्धीनें मी देखील फेऱ्या घालीत होतों. त्यांनीं आपले हात पाठीमागे बांधले की मी देखील तसे करायचो आणि ते गाणें गुणगुणूं लागले, की मला देखील गाणे गुणगुणणें अवश्य वाटायचें मध्येंच बाबा एकदम थांबले तसा मी देखील थांबलो. बाबांनीं गळ्यांत लोढणे बांधलेल्या सोनी गाईकडे पाहिलें, तेव्हां मीं देखील तिकडे पाहिलें सोनी आपलीं गळ्यातले लोढणे फरफटावीत चरत होती तें लोढणे पायांत आले की अडखळत होती ते पाहून मला गंमत वाटली व हसूं येऊं लागलें

पण तेवढ्यांत बाबा एकदम रागावून म्हणाले, "कोणी बांधलें ते तिच्या गळ्यांत? कांहीं माणुसकी आहे की नाहीं या लोकांना? येशा! कुठे आहे तो येशा? ये गुलामा इकडे मीच तुझ्या गळ्यांत बांधतो ते लोढणे, म्हणजे कळेल त्याने कसा त्रास होतो ते"

मीं माझी हसण्याची चुकी दुरुस्त केली आणि वाईट चेहरा करून पडवींत उभ्या असलेल्या आईला दरडावून म्हणालो, "कुठे आहे तो येशा? तूं पाठवला असशील त्याला कुठें तरी कामाला"

तेवढ्यांत काका बाहेर आले आणि म्हणाले, "काय झालें? मींच सांगितलें त्या येशाला लोढणें बांधायला रोज ती गाय लोकांच्या शेतांतलें

जाऊन खाते आणि रोज लोकाच्या तक्रारी येतात ”

काका म्हणाले, “ती गाय राखायची म्हणजे सोपे काम नाहीं, बाबा ती केव्हा डोळा चुकवून जाते ते कळत देखील नाहीं ”

“अशी कशी डोळा चुकवून जाईल ती? हाच हरामखोर इकडे-तिकडे जात असेल आणि ती चोरी करीत असली तर तिला बाधून ठेवा पण ह काय हे? Inhuman सगळे ” बाबा तावातावाने म्हणाले आणि ते लोढणे सोडायला पुढे सरसावले मी देखील त्वेषाने त्याच्या मागोमाग पुढे सरसावलो आणि जाता जाता काकाच्याकडे रागाने पाहायला विसरलो नाही सुदैवाने त्याचे माझ्याकडे लक्ष नव्हते

काका बाबाच्या बरोबर पुढे सरकत म्हणाले, “माझे ऐका तुम्ही ती गाय विकून टाकू या आपण फुकटचे खाते आणि परत रोज लोकाच्या तक्रारी ”

बाबा म्हणाले, “पण गळ्यात ओडके बाधायचे म्हणजे काय? Inhuman सगळे ”

सोनी गाईने गरिबीनें मुडी खाली घातली आणि बाबा तिच्या गळ्या तलें आडके सोडून टाकू लागले, पण ते त्याना सोडता येईना तेव्हा काका पुढे झाले आणि त्यानी ते ओडके सोडले आपण काहीं तरी भयकर inhuman केले असे बहुधा त्याच्या मनाला खात असावें मीं देखील तेवढ्यात सोनी गाईच्या अगाला हात लावून घेतला मग बाबानीं आपल्या हातातला खोबऱ्याचा तुकडा तिच्या तोडात दिला आणि मग आम्ही सगळे घराकडे परतलो आम्ही अगणाजवळ येतो न येतो इतक्यात काका एकदम हवेत उडालेले मला दिसले मग दुसऱ्या क्षणाला ते जमिनीवर झोपलेले आहेत असे आढळून आलें आणि सोनी गाय उडारत दूर निघून गेली सोनी गाईनें काकाना टेप मारली हें आमच्या ध्यानात यायला थोडा वेळ लागला

बाबा वाकून काकाना हात देत म्हणाले, “काय रे? लागल का? उठवतय् ना?”

“अगबाई!” असे म्हणून काकू लगालगा पुढे झाली.

"काय झाल गो" असे म्हणत आजी स्वयपाकघरातून बाहेर आली. काकाचा हात धरून त्याना बाबानी त्याच्या खोलीत नेले मी काकाचा दुसरा हात धरण्याचा प्रयत्न केला, पण त्यानी मला झटकून टाकलें त्याना नेता नेता बाबा म्हणत होते, "काय हल्कट गाय आहे तरी, मला कल्पना नव्हती! काय डोकेबिके फिरले आहे की काय तिचें?"

काका म्हणाले, "मी आधीपासून सागतोय् घातकी जनावर आहे ते चागल्यातले नव्हे आता ते माझ्या घरात नको ताबडतोब काढून टाकायची व्यवस्था करा"

काकू पुटपुटू लागली, "मेली गाय ती काय? तिचें कशाला एवढे कौतुक? माणसापेक्षा का जनावर जास्त आहे?" आणि ती लगबगीनें तेलाची बाटली घेऊन काकाच्या खोलीत गेली

आई आपली मुकाट्याने कामाला लागली

आजी तरातरा पटवींत येऊन म्हणाली, "ओवाळलेली आहे मेली गाय ओसाड राडेची येशा, बाधून घाल तिला—आणि गवताची काडी नको टाकू तिच्यापुढे एक गुण धड असेल तर शप्पथ. वाळवणे खाते "

आणि येशा अर्थात् आपली मोठी बाबूची काठी सरसावीत सोनी गाईच्या मागावर निघाला

सध्याकाळीं बाबा येशाला म्हणाले, "घाल तिच्यापुढे एक गवताची पेडी आणि कोणी घेणार असले तर तशी चौकशी कर काढून टाकू या ती गाय"

त्यानतर सोनी गाय विकून टाकायची असे नक्की ठरलें आणि गिऱ्हाइकाचा जोरानें शोध सुरू झाला पण सोनी गाईचे गुण आस-पासच्या चारपाच गावात माहीत असल्यामुळे तिला गिऱ्हाईक मिळणे फार कठीण होते असे आठपधरा दिवस गेले आणि मग एके दिवशीं येशा गभीर चेहरा करून बाबाच्याकडे आला आणि म्हणाला, "गाय आज दोन दीस हबारते"

बाबानी तीच बातमी तितक्याच गभीरपणें काकाना सागितली. मग

आजी देखील खाजगी स्वरात म्हणाली कीं रात्रीं तिने गाईचें हंबरणें ऐकले होते

गाय हंबरते हे सत्य मला पुष्कळ दिवस माहीत होते त्यामुळे त्या गोष्टीचें आताच ह्या मोठ्या माणसाना महत्त्व का वाटावें तें मला कळेना मी प्राजलपणे आईला माझी शका विचारली तेव्हा आईने आधी उडवाउडवी केली पण मीं जेव्हा तिचा पिच्छाच पुरवला तेव्हा ती खेकसली, "नसत्या मेल्याच्या चौकशा ! जा, खेळायला जा बाहेर "

त्यानतर सोनीला दाव्याने बाधून घेऊन आणि बाबाच्याकडून दोन रुपये मागून घेऊन येशा कुठे तरी गेला आणि चार तासानीं परत आला तेव्हापासून सोनीला विकायच्या गोष्टी एकदम बद झाल्या आजी शिल्लक राहिलेलें अन्न मुद्दाम सोनीपुढे टाकू लागली आणि येशाला तिच्यापुढे पेडी टाकायची पुन्हा पुन्हा आठवण करू लागली बाबा सोनीच्या पाठीवरून ममतेने हात फिरवू लागले आणि कधीं विनोद न करणारे काका देखील मला हसत हसत म्हणाले, "काय रे ? खरवस खाणार तू एकदरींत, अ ?"

बाबा जोरात म्हणू लागले, "तरी मी म्हणत होतो की इतक्यात तिला विकायची नाहीं म्हणून यदा ती वीत देणार असे वाटतच होतें मला "

आणि बाबाचें सगळेच कसे बरोबर असते ह्याचा मला अधिकच अचबा वाटू लागला

त्यानतर आम्ही जेव्हा पुन्हा गोदवल्याला राहायला गेलों, तेव्हा सोनीचें पोट पुष्कळच मोठे झाले होतें आजी तिच्यावरून मधूनमधून मीठमोहऱ्या ओवाळून टाकीत असे आणि तिने तिच्या गळ्यात दृष्टीचा दोरा बाधला होता बाबानीं येशाला तिच्याकरिता खाण्याचे पोतें आणायला सागितलें. आणि रोज तिला घमेलेंभर खाणें मिळू लागलें. काका हसण्याचा प्रयत्न करीत म्हणाले, "दूध देईल तेव्हा खरी !"

त्यावर बाबा म्हणाले, "खात्रीने दूध देणार ती ती लहान आहे ह्यावर जाऊ नको. अशीं जनावरेंसुद्धा चागलें दूध देतात." आणि

मग तिच्या पृष्ठभागाकडे पाहून ती किती दिवसानीं विईल त्याचा अदाज करू लागले

आई कौतुकाने म्हणाली, "केवढे पोट झाले आहे मेलीचे! आता खोड होऊ दे चागला"

काकू म्हणाली, "खोड झालेला चागला का?"

तिच्या अज्ञानाला सगळेच हसले मी देखील हसलो तेव्हा ती फणकाऱ्याने म्हणाली, "मला नाहीं ह्यातली काहीं माहिती मी आपली शहरात वाढलेली"

काका तिला समजावून सागण्याच्या उद्देशाने म्हणाले, "अग, खोड झाला म्हणजे गाडीला, नागराला चालतो"

काकू म्हणाली, "पण पाडी झाली म्हणजे ती दूध नाहीं का देत?"

ह्यावर काकाना काहीं उत्तर देता येईना ते म्हणाले, "तुला काहीं समजत नाहीं"

आणि आम्ही सगळे पुन्हा हसलो काकू फणकाऱ्याने निघून गेली

सोनीला पाडा होणार ह्याबद्दल मला अर्थात् मुळींच शका वाटत नव्हती त्याचें नाव काय ठेवायचें तें मी आणि येशा ह्यानीं खूप विचारविनिमय करून ठरवले देखील, आणि मी तर स्वत च खोड होऊन अगणात उडारलो आजीची वाळवणें उडवली, कुपणावरून उडी मारण्याच्या प्रयत्नात पाय मुरगळून घेतला आणि दोन गवताच्या काड्या देखील चघळून खाल्ल्या शेवटी आई बसलेली असताना तिच्या डोक्याशीं टक्कर देण्याचा जेव्हा मी प्रयत्न केला तेव्हा मला भरपूर मार मिळाला आणि खोड होणे तितकेसे सुखकारक नाहीं हे माझ्या ध्यानात आलें त्यानतर मात्र मी खरवस किती खायचा त्याचा हिशेब करू लागलों आणि माझ्या अपेक्षा कधीं विनवणीच्या स्वरूपात तर कधी धमकीच्या स्वरूपात बाबाच्यासमोर आजीला सागू लागलो हेतु हा की बाबाच्याहि कानावरून त्या गेलेल्या असाव्या म्हणजे अखेर हट्ट करताना बाजू बळकट होईल

आता आईचा पक्ष वरचढ होता त्यामुळें ती आजीच्या देखत बाबाना

विचारायची, "एवढी चरवीभर तरी दूध देईल, नाहीं का सोनी?"

बाबा शिक्यातलें रताळें खात म्हणत, "हो, खाणे नीट घातलें तर सहज चरवीभर देईल"

आजी हसत म्हणायची "बघू या आता"

आपली गाय कमी दूध देईल असे म्हणून अपशकुन करायला तिचें मन घेत नसे आणि सोनीने जास्त दूध दिलें तर ते तिला हवेंच होतें कारण मग चार घरीं तिला ताक देता आलें असते. चार बायानीं तिला 'आजी आजी' म्हणून चार वेळा हाक मारली असती

आई मग आणखीच जोरानें म्हणायची, "मारकुटी जनावरें म्हणे जास्त दूध देतात, खरें का?"

मग काकू रागारागानें म्हणायची, "मेलीचे गुणच वाईट. इकडे उधळले तसे तिकडे उधळील. आचळाला हात घाल् दिलान् तरी पुरे"

बाबा गाणे गुणगुणत रताळे घेऊन बाहेर जायचे मीहि त्याच्या मागोमाग बाहेर जात असे आणि बाहेर जाताना सगळया बायकाकडे एकदा तुच्छतेनें बघायला विसरत नसे.

अखेर सोनी एकदाची व्यायली पण ती व्यायची ती शनिवारीं त्यामुळें आजी पुटपुटू लागली, "शनिवारच कुठे गावला मेलीला—उद्या चागला रविवार होता तर? आता तिला घरात ठेवायचें तर वाईटच. बरे विकायची तरी कशी? काहीं झालें तरी घरची पाडी. आता निदान भटाला बोलावून शाती तरी करायला हवी."

शिवाय सोनीला झाली होती पाडी त्यामुळे माझी दारुण निराशा झाली

काकू काहींशा आनदानें म्हणाली, "पाडीच झाली ना अखेर?"

बाबा नेहमींच्या आशावादानें म्हणाले "अरे पहिली पाडीच झालेली बरी. म्हणजे पुढची दुधाची व्यवस्था होते." आणि त्यानीं सोनीच्या कासेला हात घालून पाहिला.

सोनी आपल्या वासराला चाटीत होती, आणि तिच्यापुढें ठेवलेली पातेलेंभर खिचडी फस्त करीत होती. इवारून अधिक मागत होती.

आजी आपल्या विशेष ज्ञानाच्या अभिमानानें सोनीला काय काय घालायचें आणि तिचें कसे कसे करायचें तें सांगत होती आणि येशाला तर क्षणाचीहि उसंत नव्हती बालड्या-घमेली घेऊन तो सारखा धावतच होता

तेवढ्यात आजीनें सुनांना म्हटलें, "दुधाला चरवी तेवढी घासून ठेवा ग "

तेव्हां आई लगबगीनें पुढे झाली आणि तिनें ती मोठी चरवी लख-लखीत घासून ओटीवर आणून ठेवली

काका चरवी घेऊन गोठ्यांत गेले तेव्हां बाबा लगबगीने त्यांच्या मागोमाग जाऊन म्हणाले, "गोठ्यांत दूध काढू नका बुवा सगळें कोंडलेलें असतें चांगली अंगणांत मोकळ्यावर आणून तिचें दूध काढा, म्हणजे त्या जनावराला देखील बरें वाटतें "

आजी म्हणाली, "उघड्यावर दूध काढू नका रे गाईला दृष्ट लागेल " आणि मग आपल्या माहेरच्या एका गाईचें चरवीभर दूध एकदां असेंच बाहेर काढल्यावर तिच्या आंचळांतून नासके रक्त कसे यायला लागलें ते तिनें रसभरितपणें सांगितलें.

पण बाबा म्हणाले, "कांहीं दृष्ट पडायची नाहीं. आणा त्या गाईला बाहेर "

त्यामुळें माझा बाबांच्याविषयींचा आदर अधिकच वाढला आईनें देखील आदरानें बाबांच्याकडे पाहिलें. आपलें कोणी ऐकत नाहीं असे पाहून आजी स्वयंपाकघरांत गेली आणि मग तेथे न राहवल्यामुळे पुन्हां बाहेर आली

काकांनीं गाईला आणून अंगणांत बांधलें त्यांच्या मागोमाग येशा वासराला घेऊन आला सोनी मागे वळून हंबारत होती. आपल्याला वासरूं झालें ह्याचा तिला अभिमान वाटत होता आणि येशानें वासराला हात लावल्यामुळे काळजी वाटत होती येशानें तिच्यापुढे वासरूं ठेवलें तेव्हां ती त्याला चाटून साफ करूं लागली

मग येशानें खाण्याचें घमेलें आणलें आणि सोनीपुढे ठेवलें. सोनी

अधाशीपणें खाणें खायला जुडली मग बाबानीं वासरू सोडायला सागितलें वासरू बावळटासारखे इकडे तिकडे बघायला लागलें आचूळ शोधायला लागलें मला हसू आलें पण प्रसगाचें गाभीर्य ओळखून मी गप्प राहिलों येशा पुन्हा उत्साहाने पुढे झाला आणि त्यानें सोनीचा आचूळ वासराच्या तोंडात देण्याचा प्रयत्न केला येशाचा हात आचळाला लागताच सोनी दोन हात हवेंत उडाली आणि तिने लाथा झटकल्या एक येशाच्या हातावर बसली आणि दुसरी वासराच्या तोंडावर

पडवींतून अगणात उतरलेल्या आई आणि काकू चटकन् पुन्हा पडवींत गेल्या मी देखील दोन पावलें मागे सरकलों काका हातात चरवी घेऊन दूध काढायला पुढे सरकत होते ते जागच्या जागीं थाबले आणि मग माझ्याकडे चिडून पाहात म्हणाले, "तू घरात हो बरें. ती गाय आहे आधींच बुजरी आणि त्यात तुमची तिच्या तोंडासमोर गर्दी कशाला?"

मी आज्ञाधारकपणें दोन पावलें मागें सरकलो आणि मग पुन्हा तितकाच पुढें सरकलों.

काका चरवी घेऊन पुढें सरसावू लागले तशीं काकू म्हणाली, "तुम्ही नका दूध काढू द्वाड गाय आहे ती येशा काढील दूध"

येशाला तेंच हवें होतें तो चटकन् पुढे सरत म्हणाला, "द्या काका चरवी. मी काढतो दूध"

"थाब रे तू वासरू धर मग मी दूध काढतों" काका म्हणाले

काकू म्हणाली, "कध्धीं मेलें तें ऐकायचें नाहीं तरी परवाच गाईने मारलें होतें म्हणून ठीक आहे"

"आता तुम्ही गप्प राहाल का जरा?" काका कपाळावर आठ्या चढवीत म्हणाले.

"मी आपली घरातच जातें कशी." असे फुणफुणत काकू घरात गेली मग तिनें आपल्या मुलाला घरात बोलावून घेतलें आणि त्याला रागानें थोपटून ती निजवू लागली.

त्यामुळे आपणहि आपल्या मुलावर रागवावें असे आईला वाटू लागलें आणि मला ती म्हणाली, "तू पुढे पुढे कशाला रे धावतो आहेस? माझ्याजवळ येऊन बस बरें"

मीं अर्थातच आईचे ऐकले नाहीं

एवढ्या वेळात वासरू पुन्हा लुचण्याचा प्रयत्न करू लागले होतें आणि सोनीच्या मधूनमधून उचलल्या जाणाऱ्या लाथेची त्याला भीति वाटेनाशी झाली होती

बाबा म्हणाले, "पान्हावली असेल ती आता नाहीं लाथ झाडायची."

काका म्हणाले, "इतक्यात कशी पान्हावेल ती? थोडा वेळ नको का जायला?"

बाबा चरवी घेण्याकरिता हात पुढे करीत म्हणाले, "आण इकडे मी दाखवतो पान्हावली आहे की नाहीं ते"

बाबाना सगळ्याच गोष्टीची घाई असायची

मग काका पुढे झाले, त्यानीं हळूच आचळाना हात लावला येशाने वासराला मागे ओढलें सोनी चपापल्यासारखी अग आखडून उभी राहिली, आणि काकानी आचूळ ओढताच ती पुन्हा दोन हात उडाली, आणि तिनें लाथाचा भडिमार सुरू केला. चरवीला केवढा तरी मोठा पोचा आला आणि ती दूर जाऊन पडली. काकाच्या दडावर लाथ बसली आपला दड घट्ट धरून ते उठले आणि पडवींत जाऊन उभे राहिले आपला हात चोळीत ते म्हणाले, "अवलक्षणीच आहे ती गाय"

काकू बाहेर येऊन म्हणाली, "लागलें ना अखेर? तरी मीं सागितले होतें—" पण काकाचा नूर पाहून तिचें वक्तव्य थाबलें आणि ती पुन्हा घरात गेली.

मग बाबानीं उत्साहानें चरवी उचलली आणि ते दूध काढायला पुढें सरसावले. रागानें ते म्हणाले, "पाहतो हा तू कशी दूध देत नाहींस तें! इतके दिवस माझ्या पदरचें खाल्लेस त्याची काहीं चाड बाळग."

काका म्हणाले, "जपून ह."

आई मला ओरडली, "तू रे कशाला पुढे सरतो आहेस आणखी ?"

बाबानीं आचळाला हात घातला आणि पुन्हा सोनीनें सडासड लाथा झाडल्या बाबानी पुन्हा हात घातला आणि पुन्हा सोनी हवेंत उडाली.

तेव्हा येशा म्हणाला, "अशी दूध द्यायची नाय ती तिला बाधून घालायला हवी "

बाबानीं पहिल्यानें ही inhuman कल्पना मान्य केली नाहीं पण सोनीच्या लाथा थाबेनात, तेव्हा आपल्यालाच ही कल्पना पहिल्यानें सुचली अशा थाटात ते म्हणाले, "घाल रे बाधून हिला फारच मस्ती आली आहे तिला "

मग येशाने उत्साहानें गाईचे पाय बाधले आणि पडवीच्या कडेला लाकूड बाधून त्याने तिला डाबून टाकलें. बाबाच्या हातातील चरवी घेऊन तो दूध काढायला बसला आता सोनीला लाथा उडवता येत नव्हत्या, पण तिला पान्हा चोरता येत होता येशानें आचूळ जोरजोरात ओढले, पण त्यातून दूध म्हणून पडेना

येशा उठून म्हणाला, "डाबिस गाय हाय ती पान्हत नाय अजिबात "

त्यानतर गाईने पान्हवावें म्हणून अनेक उपाय करण्यात आले तिची पुन्हा एकदा दृष्ट काढण्यात आली तिच्यापुढे खाण्याचें आणखी एक घमेलें ठेवण्यात आलें तें तिनें ताबडतोब खाऊन टाकलें आणि हबारून ती आणखी मागू लागली बाबानीं पुढे होऊन तिची मान खाजवली, तेव्हा तिनें सुखावून ती खूप वर केली आणि मग बाबाचा खाजवणारा हात आपल्या खरखरीत जिभेनें चाटला वासरू सोडलें तेव्हा तिनें त्याला लुचू दिलें पण तिच्या कासेला हात घातला कीं दुधाचा थेब काहीं तिच्यातून बाहेर पडत नव्हता

असे सारे उपाय थकले तेव्हा बाबानीं हातात काठी घेतली.

काका म्हणाले, "नको रे मारू तिला आजच व्यायली आहे ती "

आजी म्हणाली, "चागली घरची पाडी पहिल्यादाच व्यायली आहे. तिला काठी लावू नको. आज नाहीं दूध दिलेंन् तर उद्या देईल."

पण बाबानीं संतापून काठीची एक हुपट तिच्या पाठींत घातलीच त्यासरशीं सोनी वाकली आणि काय आश्चर्य! इतका वेळ न पान्हावणारी सोनी एकदम पान्हावली दुधाच्या धारा भाड्यात पडल्याचा आवाज आला

मी पुढे सरकलों बाबाच्याविषयीं मला अधिकच आदर वाटू लागला

पण थोड्याच वेळात येशा म्हणाला, "सपलें दूध" चरवीत भाडेभर दूध असेल नसेल.

बाबानीं काकाकडे पाहिलें आणि काकानीं बाबाकडे पाहिलें

येशा चरवी आजीपुढे ठेवीत चेष्टेच्या स्वरात म्हणाला, "आजी, दूध"

आजीनें दूध किती आहे हें पाहण्याकरिता चरवींत बोट घातलें पण दूध बोटाला लागेना अखेर सगळाच हात तिनें चरवींत घातला तेव्हा तळाचें दूध हाताला लागलें ती ओरडली, "मेल्यानो, हें गाईचें दूध कीं माजरीचें?"

इकडे माझीं खरवसाचीं स्वप्ने नासत होतीं आणि तिकडे सोनी हंबारून आणखी खाणें मागत होती



## १०. गढूळ पाणी

धुरकट आकाश! भुरका प्रकाश! पावसाच्या तुटक्या बारीक धारा!

पावसाळी हवेचें मेलेले कबूतर पख पसरून जगाच्या उकिरड्यावर पडले होतें वाऱ्याचें नाक चोदलें होतें सगळ्या घराना डोकेदुखीनें पछाडलें होतें पागोळ्या गाळीत भकास मुद्रेने तीं आपली रडकथा सागत होतीं. आणि दिव्याचे खाब ह्या रडकथा मख्खपणे ऐकत होते. नव्हे, ऐकल्याचा बहाणा करीत होते

इमारतीच्या बाधकामाकरिता आणलेले मोठाले दगड ओले झाल्यामुळें गागरल्यासारखे दिसत होते रस्ता चिडला होता ओलेंचिंब झालेलें एक व्हिक्टोरियाचें घोडे कान फिरवून व पाय फेगाडून भेदरल्यासारखे उभे राहिलें होतें जणु एखादा विजेचा झटका त्याला मिळाला होता

आणि पावसाच्या धारा कातरणारी विजेची छोटी कात्री मधून मधून चमकत होती.

पावसाळी हवेच्या भिजलेल्या गोणत्यात भरून कोणी तरी जगाला दूर नेऊन सोडीत होतें—माजरीच्या पिलाप्रमाणें

त्या भिजलेल्या गोणत्यात माणसें चाचपडत होतीं बाहेर भटकणाऱ्या मनाची पिछेहाट होऊन तीं एकलेपणाच्या तटबदीत वेढली गेलीं होतीं प्रत्येक जण स्वतःच्या जीविताच्या गाण्याचें पालुपद (refrain) पुन्हा पुन्हा ऐकत होता गभीर, उदासवाण्या, प्रेमळ, हसऱ्या, संतप्त अशा विविध स्वराची समिश्र सुरावट ज्याला त्याला ऐकू येत होती ह्या सुरा-

वटीचा प्रवाह म्हणजेच आपलें जीवित ह्याची जाणीव होत होती आणि ती जाणीव विलक्षण विचित्र वाटत होती

कारण प्रत्येकाला आपल्या जीविताच्या गाण्याचे स्वर परके वाटत होते जो स्वर कोमल आहे असे वाटत होते तो तीव्र लागला होता अनपेक्षितपणें एखादा नवा स्वर उमटत होता स्वत.ला काव्यात्मक समजणाऱ्या माणसाना आढळून येत होते की, आपण दुबळे आणि चिरचिऱ्या स्वभावाचे आहोत स्वत'ला कणखर समजणाऱ्या माणसाना जाणीव होत होती की, आपण मूर्ख आहोत आनदी माणसाना आपण उथळ असल्याचा शोध लागत होता आणि शहाण्या माणसाना आपण निष्क्रिय असल्याचा सुगावा लागत होता

प्रत्येक जण स्वतःलाच परका झाला होता आणि इतराना आपण किती परके आहोत ह्या जाणिवेनें घाबरून गेला होता, चिडखोर झाला होता आणि भीत भीत त्या सुरावटीच्या प्रवाहात स्वत.चें प्रतिबिंब पाहात होता पण गमत अशी की, त्या प्रवाहात स्वत.चें प्रतिबिंब दिसण्याऐवजीं निबिड अरण्यात दबकत दबकत वावरणारी हिंस्र श्वापदे दिसत होतीं आणि जास्त वाकून पाहण्याचा प्रयत्न केला म्हणजे खोल गर्तेंत पडून स्वतःच्या ठिकऱ्या उडत होत्या

मान वाकवून, रेनकोटच्या खिशात हात खुपसून चद्रकात चालला होता. बुटात पाणी रिपरिपत होतें. पाय वळत होते आगठ्याचा नखाजवळचा भाग ठणकत होता. नुकत्याच घेतलेल्या बेचव चहाशीं पोट तक्रार करीत होते रेनकोटच्या भारानें खादे दुखत होते. मान ताठरल्यासारखी झाली होती. आणि सारें अग शहारल्यासारखे होऊन राहिलें होतें—टाचण्याच्या घरासारखे.

अस्वस्थता! अस्वस्थता! अस्वस्थता त्याचें जीवन व्यापून राहिली होती. त्याला चोहों बाजूनीं ओरबाडत होती. तेंच त्याच्या जीवनाचें पालुपद होतें. शाळेंत असताना कविता पाठ म्हणण्याची पाळी होऊन जाईपर्यंत वाटणारी अस्वस्थता, आपल्याला अभ्यास येतो पण आपण पतग पकडण्याकरिता कौलावर चढत नाहीं म्हणून वाटणारी अस्वस्थता,

काव्य वाचताना आपण तन्मय होत नाहीं म्हणून वाटणारी अस्वस्थता आणि सुमतीच्या सहवासात आपण पागल बनलों म्हणून वाटणारी अस्वस्थता आपण दुसऱ्याचें कुत्सित बोलणें मुकाट्याने सहन केलें म्हणून वाटणारी अस्वस्थता आणि आपण दुसऱ्याशी उर्मटपणाने वागलो म्हणून वाटणारी अस्वस्थता आपली इच्छाशक्ति तीव्र झाली तर विवेक कमी होईल म्हणून वाटणारी अस्वस्थता !

आणि आपण नेहमी इतके अस्वस्थ का असतो म्हणून वाटणारी अस्वस्थता !

चद्रकात ह्या अस्वस्थतेला विलक्षण कटाळला होता तिच्यापासून त्याला कुठे तरी दूर पळून जायचें होतें आत्ता ! या क्षणाला ! पण सावलीप्रमाणे ती त्याच्याबरोबर सारखी असायची झोप लागली आणि नेणिवेच्या अधारात तो गेला म्हणजे काय ती लुप्त व्हायची, पण जागृति आली आणि जाणिवेचा पहिला कवडसा पडला की ती सावली पुन्हा त्याच्या पाठीस लागायची

तिला चुकवण्याकरिता तो सिनेमाला गेला होता त्यानें तात्त्विक चर्चेचा कीस काढला होता तो प्रेमात सापडला होता सिनेमाच्या कैफात, चर्चेच्या तर्ककठोर धारेवर, प्रीतीच्या पवित्र एकातात देखील ही सटवी त्याच्या मागोमाग होतीच

तिच्या त्या एकनिष्ठेमुळे पातिव्रत्य ही किती भयकर गोष्ट आहे ह्याची त्याला कल्पना आली !

स्वत.च्या ह्या विनोदामुळे देखील तो अस्वस्थपणे हसला कारण हा विनोद आपल्या दुबळेपणातून निर्माण झाला आहे कीं काय, अशी त्याला शका आली.

त्याच्या ध्यानात आलें होतें की, ही अस्वस्थता म्हणजे खरोखरच आपल्या व्यक्तिमत्त्वाची सावली आहे इथें तो परत अस्वस्थ झाला. व्यक्तिमत्त्व म्हणजे काय ? कालपथावरून मार्गक्रमण करणाऱ्या माणसाला दर क्षणाला नवें व्यक्तिमत्त्व प्राप्त होत नाहीं काय ?

तीव्र उद्वेगाची काडी त्याच्या मनात पेटली, आणि तिनें ही

विचारक्रिया जाळून टाकली खिन्नपणाची राख तेवढी शिल्लक राहिली. पण त्याला माहीत होते की, त्या राखेच्या कणाकणात अस्वस्थतेचा वडवानल ठिणगीच्या रूपानें आहे

अर्धपोटी मजुरासारखा पाऊस निरुत्साहानें राबत होता वाऱ्याने आपला हात हळूच पावसात धरला आणि चटकन् मागे घेतला सराईत वेश्येप्रमाणें विजेनें सवय म्हणून डोळा मोडला पर्जन्याने आपल्या गडगडत्या हातगाडीवरून आणखी ढग आणले आणि आकाशातल्या मेघराशीवर ओतले पावसानें जरा जोर केल्याचा बहाणा केला, आणि परत ठराविक गतीनें काम सुरू केले वर्षानुवर्षें आकाशातलें हें भले मोठे कोठार तो रिते करीत आला होता

चद्रकात देखील वर्षानुवर्षें विचाराच्या बादलीनें मनातले गढूळ पाणी उपसत राहिला होता पण तेच तेच पाणी परत आत वाहून जात होतें आणि साचत होतें माणसाचें जीवित म्हणजे असा मूर्ख पोरखेळच असतो आणि पोराप्रमाणे अजाण असलेली माणसे नित्य नव्या उत्साहानें तो खेळ खेळत असतात पण कधीं कधीं त्या खेळाची अर्थहीनता ध्यानात येते आणि मग उत्साह जिरतो ज्ञानाच्या रेताडातून माणूस प्रवास करायला लागतो

चद्रकातनें एक सिगरेटचे पाकीट विकत घेतलें त्यानें आठ आणे इराण्याच्या अगावर भिरकावले अगदी ऐटीनें! आपल्या चेहऱ्यावरचा तेव्हाचा भाव चद्रकातला दिसला आणि तो दचकला एवढ्याशा कृतींत एवढा अहकार ओतणारा हा चद्रकात कोण होता? अजून आपली त्याच्याशीं भेट कशी झाली नव्हती? किती दिवस असा तो स्वैरपणानें वावरत होता?

त्याला बदिस्त करण्याचा निर्णय चद्रकातनें घेतला. इतक्यात तो इराणी म्हणाला, "ये आठ आना नहीं चलेगा साब दूसरा दो."

चद्रकातनें 'आ' म्हणून आश्चर्य व्यक्त केलें, तें आठ आण्याचें नाणें हातात घेऊन उगीचच पुन्हा पुन्हा निरखून पाहिलें आणि मग 'कसे फसवतात बुवा लोक' अशा आशयानें खांदे उडवून त्या इराण्याकडे पाहिलें.

इराण्यानें त्याच्या त्या कृतीला साद दिली नाहीं रुक्षपणानें गल्ल्यात हात घालून तो म्हणाला, "दूसरा देना साब"

चद्रकातनें पुन्हा खादे उडवून तोच आशय व्यक्त केला आणि त्या अर्थाचें तो बरेंच काहींसे पुटपुटला पण इराण्याने त्याच्याकडे अशा अर्थाचा दृष्टिक्षेप टाकला की, 'खोटे पैसे देणारे लोक नेहमीं असाच बहाणा करतात, ते मला माहीत आहे!'

त्यामुळें चद्रकात अधिकच बावचळला आणि खोटे आठ आणे चालवून आपल्याला मोठासा फायदा होणार नाहीं, आणि त्या फायद्याची आपल्याला आवश्यकता कशी नाहीं, वगैरे गोष्टी इराण्याला पटवून देऊ लागला

इराण्याने त्यानें दिलेले आठ आण्याचें दुसरे नाणें नीट पारखून घेतलें आणि दुसऱ्या गिऱ्हाइकाकडे लक्ष वळवलें

चद्रकात चिडला आणि परत आठ आणे देऊन त्यानें सिगरेटचें आणखी एक पाकीट मागितलें इराण्याने दुसऱ्या गिऱ्हाइकाचे काम केलें आणि मग आठ आणे पारखून घेऊन शातपणे चद्रकातला आणखी एक पाकीट दिलें

पूर्ण खजील होऊन चद्रकात बाहेर पडला आपण गावठीपणाची कमाल मर्यादा गाठली हें त्याच्या ध्यानात आले

आणि मग एकदम त्याला प्रश्न पडला की, हें कसे झालें? इतक्या मूर्खपणानें वागणारा हा चद्रकात कोण? तोहि आतापर्यंत असाच वावरत होता काय? असणारच! आपल्या प्रत्येक कृतींत, प्रत्येक संभाषणात हा चद्रकात आपले नाक खुपसत असला पाहिजे, मूर्खपणा करीत असला पाहिजे. आणि आपल्या तें अजून ध्यानात देखील येऊ नये ना?

धुरकट आकाश! भुरकट प्रकाश! पावसाच्या बारीक धारा कातरणारी विजेची कात्री! गागरलेले दगड! बावळटपणे आ वासणारी खिडकी आणि घराचें रडगाणे मख्खपणे ऐकणारे दिव्याचे खाब!

रस्त्याच्या धुरकटलेल्या आरशात सावल्याची सृष्टि जगाची कुचेष्टा करीत होती. आणि ते मख्ख खाब!

चद्रकात सतापानें बेभान झाला आपलें सारें बळ एकवटून त्यानें स्वत चें व्यक्तित्व दूर भिरकावून दिलें त्याच्या उडालेल्या ठिकऱ्याकडे कुतूहलाचा एक दृष्टिक्षेप टाकायला देखील न थाबता तो झपाझप पावलें टाकीत दूर निघून गेला

पावसानें मोठाल्या सरींची एक फैर झाडली दिवसाच्या गळ्यावरची पकड अधाराने घट्ट केली उजेड चाचपडत निघून जाऊ लागला. झाडे घाबरींघुबरीं झाली पावसाच्या धारा जमिनीवर आपटून पाण्याच्या ठिणग्या उडू लागल्या पावसाच्या धुमश्चक्रींत वारा घुसला उलट-सुलट धावणाऱ्या सरींच्या रस्त्याला थपडा बसल्या विजेच्या दर चमके-सरशीं सारी सृष्टि चपापू लागली जणु एखाद्या बदफैली स्त्रीला तिच्या पतीनें जारासमवेत पकडलें होते पण पर्जन्याच्या क्षोभामुळे घाबरल्याचा कितीहि बहाणा सृष्टीने केला, तरी आपली छिनाल वृत्ति ती सोडणार नव्हती.

चद्रकात हताश झाला माणसाची इच्छाशक्ति आणि त्याच्या मूलभूत प्रवृत्ति ह्याच्यात उदीरमाजराचा खेळ चाल्लेला असतो, त्यातून कधीं कोणाला निसटता येत नाहीं, हें त्याच्या ध्यानात आलें

चद्रकातचा वेग मदावला आणि हळूहळू तो स्टेशनवर येऊन पोहोंचला चोहों बाजूनी पावसानें झोडपले जाणारें स्टेशन, एखाद्या हल्लयानीं जेरीला आलेल्या किल्ल्यासारखे दिसत होते चद्रकात स्टेशनवर पोहोचला आणि अगावरच्या रेनकोटच्या ओझ्याबरोबर मना-वरच्या थकव्याचा भारहि कमी करण्याचा त्याने प्रयत्न केला

तेवढ्यात निथळती गाडी स्टेशनात आली आणि सेकड क्लासच्या सीलबद डब्यात त्यानें प्रवेश केला खिडक्याचीं तावदानें खालीं ओढलेली होतीं आणि त्याच्यावर थेंबाचीं मोहोळे बसली होतीं. एका मुलानें तीं मोहोळे पुसून टाकण्याकरिता आतल्या बाजूनें काचेवरून हात फिरवला आणि फसला बिचारा. पुन्हा पुन्हा त्याने तसे केलें आणि त्याच्याकडे पाहून एक मारवाडी चिचुद्रीच्या आवाजात हसू लागला. तें हसणें ऐकून चद्रकाताच्या अगावर शहारे आले आणि तेवढ्यात त्याला

वाटलें कीं, हें हास्य आपल्या परिचयाचें आहे आपण अगदीं जवळून पुन्हा पुन्हा ते ऐकलेलें आहे कुठे बरें ? कधीं बरें ?

एक सतरा वर्षांचा पोरगा पाय फेगाडून आणि मान मागे टाकून फाजील आरामशीरपणे बसला होता आपल्या बालिश चेहऱ्यावर तारुण्याचा उर्मटपणा आणण्याचा प्रयत्न तो करीत होता आणि आपल्या फाटक्या आवाजात शक्य तेवढा वजनदारपणा आणण्याचा प्रयत्न करीत तो चालू राजकीय परिस्थितीवर अधिकारपूर्वक मतप्रदर्शन करीत होता.

चद्रकातच्या ताबडतोब ध्यानात आले की, मॉडर्न रिव्ह्यूतली सपादकीय स्फुटे त्याने वाचलीं होती चद्रकातला त्याची कीव आली आणि असेहि वाटलें की, ह्याची मानगूट पकडून ह्याला बाहेर भिरकावून द्यावें

पलीकडल्या बाजूला एक ख्रिश्चन मनुष्य तीन मोठालीं कुत्री घेऊन बसला होता तीं कुत्रीं सारखीं चू चू करीत होतीं त्याच्या अगावर उड्या मारीत होतीं दूर जाण्याकरिता ओढ घेत होतीं आणि तो माणूस सारखा त्याना आवरत होता त्याची उडालेली धादल पाहून बाकीचीं माणसे हसत होतीं पण ते समजत असूनहि त्या कुत्र्याना सारखे आवरत असताना तो मधून मधून त्याचे कौतुकहि करीत होता

खरे म्हटलें म्हणजे त्यानें त्या कुत्र्याच्या पेकाटात एक एक लाथ मारून त्याना गुपचुप बाकाखाली बसायला लावायला पाहिजे होतें

विजेच्या दिव्याचा घुसमटलेला प्रकाश तिथे चाचपडत होता. आणि खिडकीवरच्या थेबात त्या प्रकाशाचीं शकलें शकले झालीं होतीं पख्याची भुणभुण सारखी चालू होती आणि तोंड अर्धवट उघडे ठेवून झोपीं गेलेल्या एका म्हाताऱ्या पारश्याची मान गाडीच्या हिसक्यागणीक अजागळपणे लटलटत होती

एक लाडावलेलें हट्टी आणि हलकट पोर आपले पाय सारखे हलवीत होतें व आपल्या बुटाची माती समोरच्या माणसाच्या कपड्यांना लावीत होतें. रागानें त्या मुलाकडे पाहण्यापलीकडे काहींहि करणें त्या माणसाला शक्य नव्हतें.

एक किरकिरा तरुण सरकारवर टीका करीत होता. रस्ता अमक्या

ठिकाणींच ओलाडल्य पाहिजे ह्या निर्बंधामुळें माणसाच्या मूलभूत हक्काची होणारी पायमल्ली त्याला सहन होत नव्हती आणि थोड्या वेळानें रस्त्यात थुकणाऱ्या लोकाच्या गलिच्छ सवयीविरुद्ध व्याख्यान द्यायला त्यानें सुरुवात केली.

त्या तरुणाच्या बोलण्यातल्या विसगतीचे तर चद्रकातला हसू आलेंच, पण ज्या त्या गोष्टीवर थुकणाऱ्या त्याच्या गलिच्छ मनाची त्याला अधिकच शिसारी आली

चद्रकाताच्या मनाच्या एकाग्रतेची सुई एकदम हलली. आगगाडीचा आवाज त्याला फार मोठ्याने ऐकायला येऊ लागला वरवर जाणाऱ्या सिगरेटच्या धुराच्या निळ्या सर्पानीं त्याचें मन वेधून घेतले. कलती मान करून भुणभुणणाऱ्या पख्याचा आवाज तो आगगाडीच्या आवाजापासून वेगळा काढू लागला पावसाच्या तिरप्या धाराचा कोन किती अशाचा असेल, ह्याची त्याला पचाईत पडली

थोडा वेळ त्याच्या मनाच्या एकाग्रतेची सुई अशी थरथरत राहिली. आणि मग एक विचित्र जाणीव त्याला फार उत्कटतेनें झाली त्याला वाटलें कीं, हा सेकड क्लासचा डबा नसून हें आपल्या मनाचें दर्शनी दालन आहे आणि त्यात साऱ्या तिरस्करणीय व्यक्ती आरामात निर्लज्जपणें बसून राहिल्या आहेत

चद्रकात चिडून त्याना म्हणाला, "चालते व्हा सगळेजण येथून. एकदम चालते व्हा" पण तीं सगळीं माणसे त्याच्याकडे बोटे दाखवून आपापसात हसू लागली तेव्हा भाबावून चद्रकातनें स्वत कडे पाहिलें. आणि त्याच्या ध्यानात आलें की, आपण म्हणजे तो किरकिरा तरुण आहोंत तो ओशाळला आणि मनाच्या आतल्या बाजूला पळून गेला.

तिथें एका कोंदटलेल्या, धुरानें भरलेल्या दालनात एक सुदर उमदा राजपुत्र बसलेला त्याला आढळला त्यानें नीट निरखून पाहिलें, तेव्हा त्याच्या ध्यानात आलें कीं, साखळदडानीं त्या राजपुत्राला जखडून टाकण्यात आलेलें आहे आणि—आणि त्याची जीभ छाटून टाकण्यात आली आहे.

मोठ्या कष्टाने त्या राजपुत्रानें चद्रकातला खुणानीं सागितलें की, "हा राजवाडा माझा आहे आणि बाहेर बसलेल्या दुष्ट माणसानीं तो बळकावला आहे व माझी अशी अवस्था केली आहे"

चद्रकात त्याला सहानुभूति दाखविणार होता. परतु तितक्यात त्याच्या ध्यानात आलें की, पुन्हा पुन्हा पाय हलवून त्या हट्टी, हलकट पोराप्रमाणे आपण त्या राजपुत्राच्या कपड्याना घाण लावीत आहोत. यामुळे तो अधिकच घाबरला आणि पळत सुटला

पळता पळता त्याने एका निबिड अरण्यात प्रवेश केला तिथे एक मूर्ख आळशी अस्वल डुलत डुलत नाकासमोर चाललें होतें मध्येंच एकदम ते चवताळल्यासारखे झालें आपल्या पजानीं त्यानें सारें अग ओरबाडून काढले आणि मग रागाने गुरगुरत ते आधळेपणानें पुढें पुढे जाऊ लागलें

तेवढ्यात एका चवताळलेल्या जखमी वाघानें सतापानें एक लाकूडच कडकडा चावले अगदीं त्याच्याजवळच चार फुलपाखरें पिवळ्या फुला-भोवतीं कोलमडत कोलमडत उडत होतीं

एका मोहोळातल्या मधमाशा सारख्या अस्वस्थपणें बसत होत्या आणि उठत होत्या

तेवढ्यात जोराचा पाऊस आला सारें जलमय झालें ओल्या थड, बुळबुळीत जलचराचें अस्तित्व जाणवू लागलें आणि गारव्याने सुस्ती आली

ओल्या चकचकत्या चिखलातून एक गाडूळ कष्टानें सरकत पुढे जात होतें, लाब लाब होत होतें त्याला काठीनें डिवचलें चिवडलें तरी तें पुढे सरकतच राहिलें त्याच्यावर रागानें प्रहार केला तसे त्याचे दोन तुकडे झाले आणि ते स्वतत्रपणे सरकू लागले.

चद्रकाताला वाटलें, 'चेतना चेतना' म्हणतात ती हीच. ती कधीं नष्ट व्हायची नाहीं. तिचें पुढे सरकणें कधीं थाबायचे नाहीं.

बऱ्याच वेळानें स्टेशन आलें चद्रकात खालीं उतरला आता पाऊस थाबला होता ढग जागोजाग फाटले होते, कापुसले होते. सध्याकाळचा

पिवळा आजारी प्रकाश निपचित पडला होता

जनावरानें प्रेत हुगावें तसा ओला वारा त्याला हुगीत होता पाण्याचे ओहोळ सुरकुतले होते रस्ता अर्धवट सुकला होता उदासीन झालेल्या प्रेमिकासारखा तो दिसत होता गळून पडलेलीं पानें विमनस्कपणें इकडे तिकडे सरकत होतीं

सारें वातावरण आवरलेल्या हुदक्यासारखे झालें होते सध्याकाळची म्हातारी आपल्या पिवळया केसट्या पिजारून शिळया प्रकाशाचे शितकण खात होती

आणि तें गाढूळ पुढे पुढे सरकत होते निर्बुद्धपणे, अपरिहार्यपणे!

कोरडा हुदका आवरीत चद्रकात घरीं आला सुमतीनें टपाल त्याच्या-पुढे टाकले आणि ती चटकन् चहा घेऊन आली

त्या पत्रातली ठराविक वाक्यें त्याच्या मनात घोळू लागलीं—'आनद झाला', 'दिलगीर आहें', 'राग मानू नये', 'खुशाली कळवावी', 'संकोच मानू नये'

बस्स, इतकच एक माणूस दुसऱ्या माणसाला सागू शकतो आणि ठराविक शब्दाच्या ह्या नाण्यावर जगाचा वाढता व्यवहार चालू शकतो

तें गाढूळ! ती सध्याकाळची म्हातारी! तो दाबलेला हुदका!

त्याने सुमतीला म्हटलें, "तू इथे बस आणि बोल"

सुमति बसली, पण बोलली मात्र नाहीं.

चद्रकात म्हणाला, "बोल ना"

ती हसली आणि म्हणाली, "चहा घ्या आधीं थड होईल ना"

"मला नको चहा" त्याने चहाचा कप ढकलला

"आज रागावण्याचा वार आहे वाटते?"

"तुला काहीं समजत नाहीं."

सुमतीनें मद गूढ हास्य केलें.

त्याच्या विचाराच्या गढूळ पाण्यात यायला तिनें नेहमींच नकार दिला होता त्यापासून ती नेहमीं अलिप्त राहिली होती. कधीं कधीं अगदीं निर्दयपणें.

चद्रकाताला वाटलें कीं, सुमतीचेंच अधिक बरोबर आहे आपण मात्र हें गढूळ पाणी उपसण्याच्या फोल प्रयत्नात आयुष्य वाया घालवणार

ढगाच्या नवीन फौजा आकाशात एकवटल्या उजेडाची अखेरची धुगधुगी सपली दिव्याचे ठिपके ठिकठिकाणीं तरगू लागले आणि रात्र प्रकाशाचे अश्रू ढाळत आहे असे वाटू लागलें

त्या अश्रूत आपले अश्रू मिळवावे असे चद्रकाताला वाटू लागलें. तें अपरिहार्यच होतें

सारेंच अपरिहार्य होते



## ११. आंधळें दळण

आजी आता ऐशीच्या घरात आल्या आहेत काळ आता त्याची कमरेतून घडी घालून त्याना नेण्याची तयारी करीत आहे आणि मूढपणानें मान हलवीत घराच्या एका अंधाऱ्या कोपऱ्यात अंगाची जुडी करून त्या त्याचीच वाट पाहात बसलेल्या असतात त्याच्या किलकिल्या डोळ्यात कधींमधीं सूर्याचा किरण पडून ते क्षीणपणानें लकाकतात पण त्या किरणात साठवलेलें बाह्य विश्वाचें प्रतिबिंब त्याच्या डोळ्यात कधीं उमटत नाहीं ह्या रूपरंगमयी सृष्टीचें आजींना दर्शन घडत नाहीं तो किरण तसाच परत फिरतो. दिवस असो रात्र असो, आजींच्या विश्वात सदैव अंधारच असतो !

हा अंधार आजचा नाही जवळजवळ जन्मापासूनचा आहे आजीनीं अथांग निळे आकाश कधीं पाहिलेंच नाहीं चमचमत्या चांदण्या कधीं निरखल्या नाहींत विद्युल्लतेच्या दीप्तीनें त्याचे डोळे कधीं दिपले नाहींत. खळाळणारे निर्झर, डोलणारीं पिके, पालवीचे लाल कोंब, मान मुरडून चोंचीनें पंख साफ करणारा पक्षी ह्यातलें काहींच कधींच त्याच्या नजरेस पडलें नाहीं त्याचें क्षितिज त्याच्या अंगाभोवतींच गुरफटलेलें होते. त्यामुळे आजीनी आयुष्यात प्रत्येक पाऊल शंकेनें आणि भयानें टाकलें होतें अविश्वास आणि भय ह्याच्या आसाभोवतीं त्याचें सारे जीवन फिरलें होतें

घराच्या एका अंधाऱ्या कोपऱ्यात त्या अंथरूण पसरून बसलेल्या

असतात त्याच्या उशाशीं असलेल्या एका भक्कम लाकडी पेटींत त्याची धनदौलत आहे—सोन्याचे सहले, चादीचीं भाडीं, कलदार रुपये, थोडीं नोटाचीं पुडकीं, एक पाघरायची शाल त्या पेटीला भले मोठे कुलूप लावलेलें आहे आणि त्या कुलुपाची चावी चादीच्या साखळींत अडकवून आजीनी ती साखळीं आपल्या गळयात घालून ठेवलेली आहे आजी मधून मधून ती चावी चाचपतात, पेटीवरून हात फिरवितात कुलूप तपासतात कोणी मोठे माणूस त्या पेटीच्या दिशेनें आलें कीं घाबऱ्या होतात लहान पोरे तेथे आली की त्याच्यावर खेकसतात पहिली तारीख केव्हा तें पुन्हा पुन्हा सगळयाना विचारीत असतात. आणि पहिल्या तारखेच्या दिवशी एक लाचार आशाळभूत हास्य करून मुलापुढे आपला थरथरता हात पसरतात. मुलानें पैसे हातात टाकले की ते चाचपून पाहतात मग त्याची मान अधिकच हलते, हात अधिकच थरथरतो हास्य अधिकच आशाळभूत होतें आपल्या कापऱ्या आवाजात त्या म्हणतात 'इतकेच ?'

मुलगा आणखी पैसे त्याच्या हातात टाकतो त्या वेळीं आजी आपल्या आधळ्या डोळयानीं भीतीनें स्वयपाकघराच्या दाराकडे पाहात असतात तेथे सून कपाळाला आठ्या घालून उभी आहे हें त्याना माहीत असतें ती फटकन् काहीं तरी दुरुत्तर करील अशी त्याना भीति वाटत असते तरी पण त्याना पैशाचा लोभ सोडवत नाहीं

मिळालेले पैसे हातात धरून त्या बसून राहतात ते पैसे मोजतात—चाचपतात त्याची मान अधिकच लटलटते हात अधिकच थरथरतो. कुठच्या तरी खोल आनदानें त्या सद्गदित होतात.

आपल्या नातेवाइकापैकीं तरुण पोराना चाकरी केव्हा लागते त्याची त्या वाट पाहात असतात. आणि चाकरी लागली की वडिलकीच्या अधिकारानें त्या पहिला पगार मागतात. मग तो पोरगा लाजेकाजेस्तव पाचदहा रुपये आजींच्या हातात टाकतो आजी समाधानानें ते पेटींत टाकतात.

असे त्यानीं केलें कीं सून घरात आदळआपट करायला लागते.

बडबडायला लागते पन्नाशीच्या घरात आलेला घिम्या स्वभावाचा मुलगा चिडून म्हणतो, "अग आई, तुला पैसे हवे असले तर माझ्याकडून मागून घे लोकांच्या पुढे काय हात पसरतेस ?"

सून घरातून फणकारते, "चार लोकाच्या समोर आम्हाला लाज आणायची दुसरें काय ?"

आजीची पाच वर्षांची नात नाचत म्हणते, "आजी भिकारी— आजी पैसे मागते "

तिच्या कुल्ल्यावर सणसणीत चापटी बसते ती रडते

तशीं तिची आई तिला खसकन् जवळ ओढून म्हणते, "माझ्या पोरीवर नका उगीच राग काढू "

इतकें झालें म्हणजे आजींच्या आंधळ्या डोळ्यातून पाणी येतें त्या आपलें अथरूण गोळा करतात आणि तें खाकोटीस मारून त्या चाच पडत थरथरत घराबाहेर पडतात गॅलरीत बसकण मारतात शेजाऱ्यापाजाऱ्याना सागतात, "मला आता मुलाच्या घरीं राहायचें नाहीं मला माझ्या बनूकडे पोहोंचवा. ती करील बापडी माझें."

चार लोक मजा पाहतात मुलगा आपली उघड्यावर आलेली अब्रू झाकण्याकरिता विनवण्या करून त्याना घरात घेऊन जातो.

असा हा आजींचा लोभ! असा हा आजींचा स्वभाव!

ऐशीं वर्षें—ऐशीं लाब वर्षें—घडामोडींनी भरलेला इतिहासाचा एक कालखड आजी कमीअधिक अधारात जगल्या एका लाबलचक अधाऱ्या बोळकडींतून आज ऐशीं वर्षें त्या चालत होत्या आणि अजून त्याना पुढे चालायचें होतें ह्या ऐशीं वर्षाच्या जीवितानें त्याना हें असे घडविलें होतें ऐशीं वर्षांत त्यानीं हें गाठीला बाधलें होतें

कोंकणातल्या एका डोंगराच्या कुशींत वसलेल्या एकलकोंडया गावात आजींचा जन्म झाला. एका दरिद्री ब्राह्मणाच्या पोटीं परमेश्वरानें हें आंधळें कन्यारत्न घातलें जन्मत त्याना किती दिसत होतें कोण जाणे पण जाणत्या वयात त्याना थोडेंसे धुरकट अस्पष्ट दिसत असे एवढे

खरे ! भित आणि दरवाजा ह्यातला फरक मोठ्या कष्टानें समजायचा चालते माणूस दिसेलच अशातला भरवसा नसे पहिल्यानें मुलगी आधळी, म्हणून आई ओक्साबोक्शीं रडत असे इतर माणसे सहानुभूति दाखवीत असत पण दारिद्याच्या धगीनें दु खाचा द्वेष झाला कारटी दळभद्री ठरू लागली पूर्वजन्मींचे कुठले पाप ह्या अवदसेच्या रूपानें पोटी आले असे उद्‌गार निघू लागले ह्या पोरीचें आता लग्न कसे होईल या काळजीनें पोटात धोडा उठू लागला (सहानुभूतीच्या मऊ पजातून थट्टेची नखे बाहेर येऊ लागली) अन्नपूर्णेचें आधळेपण हा पोराबाळाच्या करमणुकीचा विषय झाला कोणीहि मारून पळावें, कोणीहि निर्दय थट्टा करावी, असा प्रकार होऊ लागला

(एका मानवी आत्म्याची तडफड डोळस माणसाना दिसेनाशी झाली )

आणि त्यात दारिद्य ! कोंकणातलें दारिद्य ! अब्रूदार ब्राह्मणाच्या घरातलें दारिद्य ! सकाळीं अगदीं पातळ पेज तोड भाजत असताना खाऊन भूक विसरायची दुपारी आधण चुलीवर चढेलच अशी खात्री बाळगायची नाहीं परसातल्या फणसावर कुयरी आली तर तिची भाजीच एक दिवस खायची आणि मेजवानी झाली असे समजायचें भुकेच्या वयात भूक मारायला शिकायचें पानात पडेल तें आशाळभूतपणानें हळूहळू पुरवून खायचें झोपाळ्यावरच्या झोक्यापलीकडे हौसेमौजेची अपेक्षा करायची नाहीं. खेळायच्या वयात कामाला जुपून घ्यायचें. खेळण्याचा गुन्हा केला तर मार खायचा

त्यात अन्नपूर्णा मुलगी आणि शिवाय आधळी त्यामुळें तिची आबाळ जास्त होत असे तिला वाढताना हात आखडे खायच्या वेळीं तिला बोलवायचें राहून जाई

अशा परिस्थितींत अन्नपूर्णा वाढली तिचे डोळे अधू होते म्हणून कीं काय, परमेश्वरानें तिला अगकाठी मजबूत दिली होती मन कणखर दिलें होतें पातळ पेजेवर ती वाढली अपशब्द तिनें सोसले. ओरबाडून, चिमटे काढून अगर मारून स्वतःचें इतर मुलापासून संरक्षण करून घेण्याकरिता तिचे हात सदैव सज्ज असत. तिचे तिखट कान

नेहमीं सगळ्या गोष्टी ऐकत असत एकदा तिनें केळीच्या घडातली चार केळीं चोरून खाल्लीं दुसऱ्यादा झोपाळ्यावर राहिलेली एका मुलीची बाहुली तिने परकरात लपवून आणली आणि एका गाडग्यात ठेवून दिली नी बाहुली काढून ती खेळत असे—एकटीच आणि कोणाची चाहूल लागली म्हणजे पुन्हा ती गाडग्यात लपवून ठेवी. आपल्याला हव्या असलेल्या वस्तू मिळवायचा हा सोपा मार्ग अन्नपूर्णा फार लवकर शिकली आणि कधींच विसरली नाहीं. नव्हे, पुढे गरज संपली तरी ही सवय सुटली नाहीं

शिवाय आणखी एक गोष्ट ती शिकली आपल्याविरुद्ध कोणी बोललें, आपल्यावर कोणी रागावले की ती एकदम स्वत:च ओरडायला लागे कांगावा करी

असे दिवस गेले. अन्नपूर्णेच्या लग्नाची सगळ्याना विवचना लागली आणि मग अचानक एक दिवस ती सुटली चांगल्या सधन घराण्यातल्या एका वयस्क व कांहींशा तऱ्हेवाईक माणसाशीं तिचे लग्न जुळविण्यात आलें चलाखीनें तिचें आंधळेपणा झाकण्यात आलें मुलगी एकदाची उजवली मुलीच्या जन्म सार्थकी लागला

सासरी गेल्यावर अन्नपूर्णेचे व्यंग उघडे पडलें घरात एकच गोंधळ माजला अन्नपूर्णेचे आईबाप उद्धरले गेले, तिला ताबडतोब घरीं पाठ-वायचा विचार पक्का झाला पण तेवढ्यात घरातले वडीलधारे गृहस्थ म्हणाले, "आता काय? झालें तें झालें ती मुलगी आता आपल्या कुळातली झाली आता ती येथेच राहायची. तिला घराबाहेर काढून चारचौघात आपला बदलौकिक नको "

आणि मग (मागीलदारीं पोतेऱ्याचा बोळा पडावा तशी अन्नपूर्णा आपल्या सासरीं नांदू लागली.) सासुरवाशिणीचें जीवन आधींच कष्टाचे त्यात अन्नपूर्णा जवळ जवळ आंधळी. त्यामुळें सासूचें घालून पाडून बोलणें, जावाचें फिसफिसणें, पुरुषाचा विनोद ह्यानीं तिचें मन सारखे ओरबाडलें जाई माहेर असे दरिद्री कीं तेथून क्वचितच बोलावणें येई. आणि न्हाण आल्यावर पतीशी जेव्हा संबध आला तेव्हा नवोढेचें जसे

स्वागत व्हायचें तसे न होता तिला मानहानि आणि मारझोड सहन करावी लागली

अशा परिस्थितींत अन्नपूर्णा चिवटपणानें दिवस काढीत होती ती कोडगी झाली प्रेमाशिवाय, आपुलकीशिवाय जगायची तिला सवय झाली आधळेपणामुळे तीक्ष्ण झालेले तिचे कान चोरून मारून खाजगी बोलणी ऐकू लागले तिचे विकृत मन त्याचा विपरीत अर्थ करू लागले ती कागाळ्या करायची, लावालाव्या करायची, भाडणें लावून द्यायची एकाच्या आधारानें दुसऱ्याला कमीपणा आणायची कोणाचें चागलें होत असलें तर त्यात उणेपणा आणायची लोकाच्या वस्तू नाहींशा करायची, आपल्या पेटींत त्या भरून ठेवायची आणि फारच शोधाशोध झाली तर ती वस्तु कुठे तरी सापडल्याचा बहाणा करून परत करायची आणि मुख्य म्हणजे ती खायची ! त्या मोठ्या घरात जेव्हा सधि मिळेल तेव्हा खूप खायची पोटात दुखेल इतके खायची

घरात ढाढुळताना, वस्तू उचलताना ती कधीं कधीं पकडली जायची तेव्हा आपल्या आधळेपणाची सबब ती चटकन् पुढे करायची. आपल्याला नीट दिसलें नाहीं म्हणून म्हणायची. बोलणीं सोसायची. बळेच रडायची.

असे हें चालत असताना (अन्नपूर्णेच्या जीवनात निसर्गाने आपला सर्वश्रेष्ठ चमत्कार घडवला) अन्नपूर्णा गरोदर राहिली. ह्या पोतेऱ्याच्या बोळयात नवजीवनाचा संभव झाला अन्नपूर्णेची काति पालटली. तिच्या सदा हडहडलेल्या शरिरावर मूठभर तरी मास आलें. तिला ऐकाव्या लागणाऱ्या शब्दाची धार जरा कमी झाली थोडें का होईना, तिचें कोड-कौतुक झालें तिचें मन जरा वर उचललें गेलें. त्यात गूढ घडामोडी होऊ लागल्या तिच्या सगळ्या अपुऱ्या आकाक्षा आता एका घटनेवर केंद्रित झाल्या. तिच्या स्वार्थाचा विस्तार झाला.

सुदैवानें अन्नपूर्णेला मुलगा झाला आणि त्याच वेळेला निसर्गानें दुसरा चमत्कार घडवून आणला. अन्नपूर्णेला जास्त दिसू लागलें. असे म्हणतात कीं मुलगा झाला तशीं तिच्या डोळ्यातून सारखे घळघळा पाणी गळत राहिलें. आणि तें गळायचें थाबलें तेव्हा अन्नपूर्णेला आपला

मुलगा दिसला. मुलाचे नाकडोळे तिला निरखता आले न चाच-पडता त्याच्या गालाचा मुका घेता आला त्याच्या तोंडात आपला स्तन देता आला

अन्नपूर्णेचें सारें जीवनच पालटून गेलें इतके दिवस तिला विसर-लेल्या दैवानें तिच्यापुढे चादीचें ताट वाढून ठेवलें आपल्या मुलाच्या कोडकौतुकात ती गढून गेली स्वत.करिता जो क्षुद्रपणा ती करीत असे तो आता ती आपल्या मुलाकरिता करू लागली प्रेम आणि आपुलकी ह्याची आणि तिची ओळख पटली

मग देवानें तिला आणखी एक मुलगा दिला अन्नपूर्णेचें खुरटलेलें जीवन बहरू लागलें (वाळवटातल्या विहिरीला पाणी लागलें)

आणि मग दैवानें आणखी एक पलट खाल्ली तें पाणी जसे लागले तसेच जिरून गेलें अन्नपूर्णेचा वयस्क नवरा वारला अन्नपूर्णा विधवा झाली पुन्हा लाचारी तिच्या पदरीं आली मागील दारीं पडलेल्या पोतेऱ्याच्या बोळ्याचें जिणें तिच्या नशिबीं आलें तिला काहीं हौसमौज असू नये असा मुळीं समाजाचा दडकच होता आणि आता तिच्या पदरात दोन मुलगे होते त्या कोवळ्या पोराची अर्थातच आबाळ होऊ लागली लहान वयात त्याना जड कामे करायला लागू लागलीं त्यानीं खायला मागावें आणि त्याना काहीं मिळू नये असे होऊ लागलें त्यानीं नव्या कपड्याचा हट्ट धरला तर तो गुन्हा समजला जाऊ लागला कोणी मारलें-झोडलें तर त्याना कोणाकडे तक्रार नेता येत नसे त्याचा शाळेचा खर्च करणें हें घरच्या माणसाना मोठे संकट वाटू लागलें

हालअपेष्टा आणि अपमान सोशीत अन्नपूर्णा आपल्या मुलाना साभाळीत होती चोरून मारून त्याना खायला घालीत होती त्याच्या हातात अधून मधून एखादा पैसा ठेवीत होती त्याना शिकवावें कीं नाहीं ह्याबद्दल होणारे वादविवाद असहायपणे ऐकत होती. तिच्या स्वार्थाला नवा पीळ पडत होता तिचा हावरेपणा आणखी वाढत होता. तिला पैसा हवा होता सोनें हवें होतें, खायला हवें होतें. आपल्या अनिश्चित जीवनात स्थिरता येईल असे काहीं तरी हवें होतें.

ऐन उमेदीचीं पचवीस वर्षे अन्नपूर्णेनें अशा परिस्थितींत काढली. आणि कामात सोसाव्या लागणाऱ्या हालअपेष्टानीं तिच्यावर आणखी एक भयकर परिणाम केला आपल्या मुलाच्यावरचें तिचें प्रेम उडून गेलें त्याची काळजी करायची तिची शक्तीच सपून गेली तीं आपलीं मुले नव्हेत, त्याची चिता आपण करायलाच नको—असे तिला वाटायला लागलें आणि शिक्षणाकरिता जेव्हा मुलें वर्षानुवर्ष तिच्यापासून दूर राहू लागली तेव्हा हें प्रेम अधिकच आटलें मुलावरच्या प्रेमाचे तिला अधून मधून झटके येत तेवढेच, स्वत विषयींच्या विचारानीच तिचें मन व्यापून राहू लागलें अन्नपूर्णेच्या जीवनातले सगळे कोवळे अकुर देवाने खुडून खापलून टाकले

अखेर अन्नपूर्णेची दुर्दशा सपली तिचे मुलगे कर्तेसवरते झाले पैसा मिळवू लागले त्यानीं बिऱ्हाड थाटलें घरात खाण्यापिण्याची, दुधातुपाची रेलचेल झाली मुलाचीं लग्ने झाली त्याचे ससार उभे राहिले घरात नातवडे दुडदुड धावू लागली बोबडें बोलू लागलीं. ह्या नादत्या सुबत्तेच्या संसाराचीं सारीं सूत्रे आजींच्या हातात होतीं

पण हें सगळे फार उशिरा झाले आजीची उमेद सपल्यावर झालें (आजींच्या आत्म्याला इतकीं वर्षे उपाशी ठेवून आता त्याच्या कलेवराला दैवाने फुलानीं शृगारले ) आजींच्या बाबतीत जें काहीं करायचें तें विपरीतच असे जणु दैवानें ठरवलें होतें आजींचें जीवन हें उधळमाधळीच्या खात्यातच पडायचें होतें

हातात सत्ता आली तशीं आजींनीं आपल्या इतक्या दिवसाच्या वनवासाचा चमत्कारिक सूड घ्यायला सुरुवात केली वयस्क माणसाला शोभू नये इतकें त्या खात दुधातुपाचें गोडधोड सारखे घरात तयार होत असे रोज रात्रीं पोटात दुखतें म्हणून आजी सोडा खात, चूर्णे घेत, पण त्याचा हा खाण्याचा केविलवाणा लोभ संपला नाहीं दात पडले, तोंडाचें बोळकें झालें तरी त्याची हाव संपली नाहीं शिवाय नुसतें खाऊन त्याचें समाधान होत नसे चोरून मारून खायची त्याना हौस होती. म्हणून त्या एकट्यानें खात. कोणी बघत नाहीं असे पाहून

खात काहीं जरूर नसताना हळूच पदराखालीं जिन्नस घालून बाहेर पडत. कोणातरी नातेवाइकाकडे तो पोहोचवीत अगर घरातल्याच एखाद्या माणसाला एकीकडे घेऊन खाऊ घालीत मोठ्या मुलालाच एवढेतेवढे खायला देत

मुलगा कपाळाला आठ्या घालून म्हणे, "अग आई! मुलें कुठे आहेत? मुलाना बोलाव त्याना खाऊ दे त्याचे दिवस आहेत आता खाण्याचे"

आजी चोरट्या आवाजात म्हणत, "पोरे काय रोज खातात, तू एवढ खाऊन टाक" मग आवाज अधिकच हलका होई. "साजुक तूप घातलय् हो त्यात"

हसावें कीं रडावे तें मुलाला समजेना तो मुकाट्यानें खाई, कधींमधीं रागावून मुलाना हाक मारी

मग आजी कातावत, जळफळत

आणि आजी जसे कोणाला चोरूनमारून खायला देत, तसेच आपल्या सुनाना उपाशी ठेवण्यात आनद मानीत. त्याची एक सून अगानें चागली सुदृढ होती. चागला वेळणीभर पहिला-दुसरा भात ती जेवत असे, दोनतीन भाकऱ्या खाई आजींच्या पोटात दुखे चार लेकाना त्या पुन्हा पुन्हा सागत, "आमची शिता! चागला दोन मापाचा भात जेवते हो आता लहान का आहे? दोन मुलींची आई झाली, पण अजून काहीं तोंड आवरता नाहीं येत"

त्या भात मुद्दाम कमी करीत. वेळणीवर थोडाच काढून सुनेला वाढायला जात. पानात थोडा ढकलून म्हणत, "पुरे का ग?"

सुनेनें खाणें टाकले, अग टाकलें तेव्हा तिच्या नवऱ्यानें तिला पैसे दिले. निराळें दूध घेऊन प्यायला सागितलें. त्यावरून आजींच्या अगाचा सताप झाला. लहान पोरासारख्या त्या रडू लागल्या. त्यानीं स्वतःच्या तोंडात फडाफडा मारून घेतलें उबरठ्यावर डोकें आपटून घेतलें चार-चौघात कागावा केला

सून बिचारी लाजून मेल्यासारखी झाली. तिनें दूध घ्यायचें सोडलें.

घरची स्थिति एकदर चागली त्यामुळे सुनाना वाटे कीं, गडी ठेवावा, स्वयपाकीण ठेवावी पण आजींनी घरात गडी देखील ठेवू दिला नाहीं थोरल्या सुनेकडून त्या कपडे धुवून घेत धाकट्या सुनेकडून भाडी घासून घेत दुपारी सुना जरा लवडल्या तर काहीं तरी कामे काढीत

सुनानी लुगडीं घेतलीं तर स्वत करिताहि घ्यायला धावत कोण्या अनूला नाहीं तर बनूला एक लुगडे द्यायला हवें असा आग्रह धरीत सुनाच्या अगावर दागिने चढले कीं स्वत ला अगठीची हौस आहे असे म्हणत. उगीच भाडणें उकरून काढीत फडाफडा स्वत च्या तोडात मारीत. उबऱ्यावर डोकें आपटून घेत

त्याचीं नातवडे त्याच्या वाऱ्याला उभीं राहात नसत उलट त्याची धाकटी जाऊ त्याच्याकडे आश्रयाला होती तिलाच चिकटत ह्याचाच आजीना राग येई आपल्या जाऊबाईना त्या घालून पाडून बोलत मुलाना सोसासोसानें खायला देत मुलें दिलेलें खात, पण आजीच्या वाऱ्याला उभीं राहात नसत

आणि आजींचा पैशाचा लोभहि चमत्कारिकपणें व्यक्त होऊ लागला. मुलाच्या पुढे त्या हात पसरीत काय पैसे मिळतील ते कडोसरीला लावीत दाणेवाल्याकडून जास्त जिन्नस मागवीत आणि त्यातले काहीं कमी किंमतीला गरीब नातेवाइकाना विकीत घरीं तूप करीत आणि पोराबाळाना पानात न वाढता लोकाना विकीत नातवडाच्या हातात पै-पैसा असला तर त्याच्याकडून मागून घेत आणि पोरें विसरलीं कीं तो पेटींत टाकीत.

एकदा सून बाळत झाली तेव्हा त्यानीं मुलाला सागितलें, "मीच हिच्या अगाला लावतें बाईला पैसे द्यायचे ते आपले मलाच दे."

मुलगा काय बोलणार? तो गप्प बसला. आजींनीं सुनेच्या अगाला तेल फासटून चार दिवस धसकफसक केलें आणि मुलाकडून पैसे वसूल केले.

कोणी धाकटा नातेवाईक आला कीं त्या ताबडतोब हात पुढें पसरीत. सुनाना लाज आणीत.

इतकें करूनहि त्याचें समाधान होत नसे चोरटेपणा करायची त्याची हौस तशीच शिल्लक राही म्हणून त्या येताजाता, आसपास कोणी नसलें की मुलाच्या खिशात हात घालीत, रुपया दोन रुपये काढून घेत

आजी अशा पै-पैसा साठवीत खुर्द्याचे रुपये करून आणीत रुपयाच्या नोटा करीत नोटाचीं पुडकी पेटींत ठेवून देत अहोरात्र त्याना पैशाचा ध्यास असे तसे पाहिलें तर दोन मिळवत्या मुलाच्या संसारात त्याना कसलेंच उणें नव्हते पुढे कधीं उणे पडण्याची शक्यता नव्हती शिवाय त्यानीं मुलापुढे हात पसरला असता तर त्यानीं काहीं पाचपञ्चवीस रुपयाना नाहीं म्हटलें नसतें पण दारिद्र्याने निर्माण केलेली ही चमत्कारिक प्रेरणा होती ती त्याना स्वस्थ बसू देत नव्हती, मानापमानाचा, जनलज्जेचा विचार करू देत नव्हती ती त्याना सारखे सागत होती 'पेटींत पैसे टाक पेटींत पैसे साठव '

आजींच्या जीवितांचें हें पर्व पधरा वर्षे चाललें आणि मग सुनाचीं भाडणें होऊ लागलीं मुलाचें बिनसलें नाहीं तरी विशेष रहस्य राहिलें नाहीं. शेवटीं एका सुनेनें एकत्र राहण्याविरुद्ध बड पुकारलें तें एकत्र कुटुंब कोलमडून पडलें. आजी आतापर्यत सत्ताधारी होत्या त्या आता एका मुलाघरच्या आश्रित झाल्या त्याच वेळेला त्याच्या डोळ्यात मोती-बिदू वाढू लागले आणि त्यामुळे त्याची दृष्टि गेली ती मोतीबिदू काढले तरी काहीं आली नाहीं पुन्हा आधळेपण, पुन्हा लाचारी त्याच्या नशिबीं आली त्याची सून आता त्याना घालून पाडून बोलू लागली, मुलगा दुर्लक्ष करू लागला

कोपऱ्यातल्या अथरुणात बसून आजी दिवस ढकलू लागल्या त्याच्या-जवळची पेटी हीच काय ती मोलाची गोष्ट होती तिला त्या जपत. कोणी नाहीं असे पाहून पैसे मोजून पाहात त्या पैशात आपला जीव गुतवून ठेवीत

असे दिवस चालले असता एक दिवस त्याच्या इमारतींत चोरी

झाली कुलूप फोडून चोरानें पैसाअडका नेला. आजी घाबरून गेल्या त्याना काहीं सुचेना सारख्या त्या आपल्या मुलाला त्या चोराबद्दल विचारू लागल्या आपल्या पेटीची काळजी घेण्याबद्दल ज्याला त्याला सागू लागल्या

अखेर मुलगा म्हणाला, "अग आई! तुला इतकी काळजी वाटत असली तर माझ्याजवळ दे पैसे मी बॅंकेत ठेवतों तुझे"

पण आपल्या मुलावर देखील इतका विश्वास टाकायला आजी तयार नव्हत्या "कशाला उगीच बॅंकेत? असू देत" असे काहींसे पुटपुटून त्या गप्प बसल्या.

मुलगा निघून गेला पण आजीची चुळबूळ चालूच राहिली. अखेर जुन्या परपरेत वाढलेल्या त्या बाईला जुनी युक्ति सुचली. त्यानीं पेटींतले पैसे काढले, सोन्याचे सह्ले काढले आणि एका गाठोड्यात बाधले मग त्यानीं माणसाची चाहूल घेतली हाक मारून आसपास कोणी नाहीं ना, अशी खात्री करून घेतली आणि एका बाजूला पडलेल्या जुन्या गादीच्या गुडाळींत तें गाठोडे खुपसून ठेवलें घडधडत्या अत.-करणानें त्या पुन्हा जाग्यावर येऊन बसल्या.

त्यानतर त्याचें लक्ष सारखे त्या गादीवर असे. पोरें त्या गादीशीं खेळू लागली कीं त्या खेकसत, "कशाला रे येथे तडमडता?"

मोठीं माणसे तेथे वावरू लागलीं की त्या म्हणत, "जपून रे, गाद्या पडतील"

नोकर झाटझूड करू लागला कीं त्या म्हणत, "हळू रे, गाद्यावर कचरा उडेल"

आजींनीं दोनचारदा असे म्हटल्यावर नोकरानें कान टवकारले. आणि मग एक दिवस आजींनीं गादी चाचपून पाहिली तेव्हा आत गाठोडें नव्हतें. आजी घाबऱ्याघुबऱ्या झाल्या. त्यानीं सगळयाना हाका मारल्या. सगळयाच्याजवळ गाठोड्याची चौकशी केली सगळयाच्यावर आळ घेतले. शिव्याशाप दिले. पण ह्यामुळें गेलेलें गाठोडें काहीं परत आलें नाहीं.

आजी ओक्साबोक्शीं रडत होत्या स्वत च्या तोंडात मारून घेत होत्या. उबऱ्यावर डोकें थडाथडा आपटून घेत होत्या त्यानीं अन्नपाणी काहीं घेतलें नाहीं त्यानीं हाय खाल्ली

त्याच्या दोघा मुलानीं त्याची ही स्थिति पाहिली, आणि मग शें-दीडशें रुपये उभे करून आजींच्या स्वाधीन केले त्याना सोन्याची एक अगठी दिली तेव्हा कुठे आजी जराशा शात झाल्या त्यानी ती अगठी आणि ती रक्कम आपल्या पेटींत घातली तिला भक्कम कुलूप लावलें आणि किल्ली आपल्या गळ्यात अडकवली.

आजींच्या जीवनात घडलेली हीच शेवटली महत्त्वाची घटना !

त्यानतर आज अनेक वर्षें आजी जगतच आहे मूढपणानें मान हलवीत घराच्या एका अधाऱ्या कोपऱ्यात अगाची जुडी करून त्या बसलेल्या असतात दिवस जातो, रात्र येते आणि मग पुन्हा दिवस उगवतो पण आजींच्या विश्वात सदैव अधारच असतो हा अधार आजचा नाहीं, ऐशीं वर्षें—ऐशीं लाब वर्षें—घडामोडीनीं भरलेला इतिहासाचा एक कालखड आजी अशा कमी-अधिक अधारातच जगल्या ऐशी वर्षे त्यानीं हें जीवनाचें दळण दळले आणि कोण्या हावऱ्या कुत्र्याने तें पीठ खाल्ले.

का बरें ? असे का बरें ?



# १२. अखेरचें सांगणें

ऑफिसातून गोविंदराव नुकतेच परत आले होते कोट-टोपी काढून जरा हुश् करीत ते कॉटवर रेलून बसले होते त्याची धाकटी मुलगी माडीवर चढून बसली होती शर्टाचें बटन फिरवीत होती त्याची बायको मोठ्या मुलीला बाईनीं कशी शाबासकी दिली त्याची हकीकत सागत होती मुलीला इग्रजी कविता म्हणून दाखवायचा आग्रह करीत होती मुलगी आढेवेढे घेत होती

तेवढ्यात घरातून क्षीण आवाजात हाक आली: "गोविंदा, अरे गोविंदा!"

गोविंदरावाच्या बायकोच्या कपाळाला आठी पडली. ती पुटपुटली, "लागल्या हाका मारायला आता जवळ बोलावतील आणि बसतील बडबडत एवढें बरें नाहीं तर जरा स्वस्थ पडून राहावें पण तें व्हायचें नाहीं"

गोविंदरावानी हातानेंच बायकोचें बोलणें थाबवलें आणि ते म्हणाले, "काय ग आई?"

"काहीं नाहीं काहीं नाहीं बाबा"

पण गोविंदरावाना राहवलें नाहीं बायकोच्या चेहऱ्यावरची नापसंती दिसत असूनहि ते उठून घरात गेले त्याच्यामागोमाग धाकटी मुलगी धावली तिची आई तिचा हात धरून हलक्या आवाजात खेकसली, "तू कशाला जाते आहेस आणखी?"

पण मुलीनें किंचाळून आपला हात सोडवून घेतला आणि बापा-मागोमाग ती आजीकडे गेली

जानकीबाई बिछान्यात पडल्या होत्या त्यांचा चेहरा फटफटीत होता एखाद्या मुखवट्यासारखा दिसत होता त्यांचा शिल्लक राहि-लेला वरचा एकच दात खालच्या ओठावर टेकला होता, निर्जीवपणे चमकत होता बिछान्याच्या बाहेर गेलेल्या एका कृश हातावरची सुरकुतलेली कातडी लोंबत होती खोल गेलेले डोळे मात्र लुकलुकत होते—बोलत होते

गोविंदरावाना पाहिल्यावर त्यांचा तो निर्जीव वाटणारा चेहरा आनदाने जरा टवटवीत झाला गोविदराव बिछान्याशेजारीं बसले आणि त्यानीं हलकेच आईचा जमिनीवर गेलेला हात उचलून बिछान्यावर ठेवला. आपल्या बापानें तसे केलेले पाहून, धाकट्या मुलीनें आजीच्या अगा-वरचें सुरकुतलेलें पांघरूण सारखे केलें

जानकीबाईचा जीव भावनेनें कळवळला त्यांच्या जीर्ण चेहऱ्यावर ती भावना उमटली त्यांचे ओठ थरथरले आपल्या क्षीण बोटानीं गोविंदरावाचा हात धरण्याचा त्यानीं प्रयत्न केला. त्यांच्या एकाच डोळ्यातून पाणी आलें डोळ्याच्या कोपऱ्यावरून त्याचा थेंब ओली रेषा उमटवीत खालीं घसरला आणि कानशिलाजवळच्या कोरड्या केसात जाऊन तो अडकला—अनिश्चितपणे तसाच राहिला

गोविंदराव त्या थेंबाकडे पाहातच राहिले त्याना वाटलें की धोतराच्या सोग्यानें तो पुसावा पण त्यानी तसे केलें ताहीं ते विमनस्क मात्र झाले.

आपलें मन आवरीत जानकीबाईनीं गोविंदरावाचा हात दाबला आणि त्या म्हणाल्या, "गोविदा, पोर शहाणी आहे हो तुझी. आजी आजारी आहे म्हणून तिची सेवा करते चागला नवरा मिळेल पोरी तुला."

गोविदरावानीं एकवार आपल्या मुलीकडे पाहिले आणि तिचे गालावर आलेले केस मागे सारले.

जानकीबाईनीं उगीचच मान वळवून आपण हातात धरलेल्या गोविंदरावाच्या पजाकडे पाहिलें आणि एकदम लहानग्या गोविंदाने आपल्या लालसर मुठीत त्याचें बोट अनेकदा कसे धरले होतें त्याची त्याना आठवण झाली. गोविदरावाना तसे काहीं स्मरतें आहे का तें पाहण्याकरिता त्यानीं गोविदरावाच्या चेहऱ्याकडे पाहिलें त्याना एकदा वाटले कीं आपण गोविदरावाना आटवण करून द्यावी पण तो विचार तसाच त्याच्या मनात अडखळला प्रेमळपणाच्या ओलाव्याने त्या म्हणाल्या, "आताच ना रे आलास ऑफिसातून तू? दमला असशील."

गोविंदराव जरा थाबून म्हणाले, "औषध घेतलेस का आई तू? कसे वाटतेय् आता?"

"बरें आहे" जानकीबाई त्रोटकपणें म्हणाल्या

"तू मुळीं नेहमींच असे म्हणतेस खरें काय तें साग, म्हणजे ट्रीटमेट हवी तर बदलता येईल"

जानकीबाई काहींच बोलल्या नाहींत. आपल्याला देवाचें बोलावणें आलें होते हें त्याना स्पष्ट दिसत होतें आता कसचें औषध आणि कसचें काय! आणि मरणाला तशी त्याची हरकत नव्हती जन्मभर जें जें घडले तें तें त्यानीं मुकाट्यानें सहन केलें होतें. कधीं कशाबद्दल तक्रार केली नव्हती दैवगतीनें नेमून दिलेल्या मार्गानें त्याच्या जीवनाचा ओहोळ वाहला होता आणि आता जर देवाला त्याची आठवण झाली होती तर त्याना जायला हवें होतें

पण आता सगळे सरत आल्यावर मुलाबाळातून, आप्तस्वकीयातून तसेच उठून जायला मन तयार होत नव्हतें. वाटत होतें कीं आपण इतके दिवस जें मनात कोंडून ठेवलें तें बोलून दाखवावें. जे हेतु आपण मनात धरले त्याना एकदा वाचा फोडावी. आपल्याला जें काय व्हावेंसे वाटतें तें निदान मुलाला सागून तरी ठेवावें. मग तसे कोणी करो अगर न करो.

आपल्या मनातलें आता होणें नाहीं ह्याची कल्पना त्याना होती. त्या ज्यारच दिवस बिछान्यात होत्या तेवढ्यात घरात त्यानीं घालून दिलेली

घडी बदलली होती आणि हे असे व्हायचेंच हें त्यानीं मनाला पटवलें होतें. पण तरी थोडे वैषम्य वाटायचें वाटायचें की आपले आता चार दिवस राहिले आहेत ते सरल्यावर मग आपल्या नजरेआड सूनबाईने काय ते केलें असते तर बरे झालें असते आपण नाहीं का सासूबाईच्या मर्जीप्रमाणें वागलो होतो? त्यानी घालून दिलेली रीत नव्हती का तशीच पुढे चालू ठेवली? त्याचा तो आवडता चादीचा लंगडा बाळकृष्ण, ती मामजीची पचपात्री, ती खोबरेल तेलाची झारी, तो फणी करंड्याचा कोनाडा

आठवणीनी त्याना फार फार मागे नेलें पुसट झालेल्या भूतकालात त्या वावरू लागल्या आपले बाळपण, पतीच्या मृत्यूच्या आधी आपण सासरीं घालवलेलीं वर्षें हें सारे त्याना आठवलें ते त्याचे फार सुखाचे दिवस होते एखाद्या झाडासारखे त्याचे यजमान उंच होते अगा-पिंडानें भरलेले होते दारात वर हात लावून उभे राहून त्यानीं गड्याला हाक मारली कीं त्या आवाजानें जानकीबाई माजघरात घाबरत असत आणि एखादे झाड उमळून पडावें तसेच त्याना अवचित मरण आलें होतें

—गोविंदरावाना वाटलें की आईला झोप लागली. म्हणून ते हलकेच जानकीबाईच्या हातातून हात सोडवून घेऊ लागले पण जानकी-बाईनीं त्याचा हात घट्ट धरून ठेवला आणि त्याच्याकडे पाहात त्या म्हणाल्या, "हें पाहा, माझ्यामागे ह्याचें श्राद्ध तेवढे नेमानें कर हो"

गोविंदराव म्हणाले, "अग आई, असे काय बोलतेस तू? लवकर बरी होणार आहेस आता तू"

जानकीबाईना वाईट वाटलें त्याचे बोलणें त्याच्या मुलाला समजतच नव्हतें उगीच आपला तो लहान मुलाची काढावी तशी त्याची समजूत काढीत होता. जानकीबाईना नव्या पिढीचें आश्चर्य वाटलें जुनें झालें कीं तें विसरून जायचें, टाकून द्यायचें ही मुळीं ह्याची वृत्ति! नुसतें आपलें आपणच कौतुक करीत राहायचें जुन्या माणसाची कधीं आठवण देखील यायची नाहीं. नातेवाइकाबद्दल देखील आपलेपणा म्हणून

म्हणून वाटायचा नाहीं त्याच्या घराची दारे मुळीं बद. चिडून फाडफाड बोलावें असे त्याना वाटलें मनोमन त्या आपल्या यजमानाना म्हणाल्या, 'तुम्ही मला लवकर टाकून गेलात पण मीं हयात असेतोंवरी तुमची आठवण राखली रोज सकाळीं देवाला नमस्कार करताना तुम्हाला देखील केला श्राद्ध नेमाने केले आता पुढचें का बरे माझ्या हातात आहे?'

देवाघरीं जायची त्याना एकदम आतुरता वाटू लागली वाटले, तेथे आपले यजमान पुन्हा दृष्टीस पडतील आपल्या पाठीवर हात फिरवून म्हणतील, 'दमलीस तू माझ्या मागे फार कष्ट काढलेस' आणि आपला सारा थकवा निघून जाईल

आपल्या यजमानाना उद्देशून त्या म्हणाल्या, 'खरेंच हो, तुम्ही असे लवकर सोडून गेलात आणि फार कष्ट पडले मला कोणाचा आधार नाहीं गाठीला सोने नाहीं आणि पुन्हा दोन पोराचा सभाळ करायचा अर्धपोटी राहून दिवस काढावे लागले लोकाच्या घरीं राबावें लागलें नाहीं नाहीं तें ऐकून घ्यावे लागलें मी एकटी बाई माणूस तुम्हाला देवाचे बोलावणे आले तसे तुम्ही एकटेच निघून गेलात मी मात्र माग राहिलें पण उगीच खोटे कशाला बोलू? म्हातारपणीं ह्या गोविदानें मला सुख दिलेन् हो आईचे पाग फेडलेन् '

गोविदराव म्हणाले, "आई, काय पुटपुटते आहेस तू? कोणाशीं बोलते आहेस?"

कामानिमित्ताने घरात आलेल्या गोविदरावाच्या पत्नीनें त्याना खुणेनें सागितलें की, "सासूबाईना भ्रम झाला आहे "

तेवढ्यात जानकीबाई म्हणाल्या, "गोविदा, तुला येते का रे आठवण?"

गोविंदराव म्हणाले, "कसली आई?"

"अरे, कसली काय विचारतोस?—ह्याची! ह्या पोरीच्या आजोबाची "

"नाहीं ग आई! मी फार लहान होतों तेव्हा "

"होय बाबा. फार लहान होतास तू तेव्हा. असशील पाच वर्षांचा.

फार लाडका होतास हो तू त्याचा. तेव्हा किनई, आपल्या पोराचें आपणच कौतुक करायची रीत नव्हती पण तरी हे जेवायला बसले कीं तुला आपल्या शेजारीं अगदी पाटावर बसवायचे दोन घास तुझ्या तोंडात घालायचे आणि तू जर बाबा कधी रडताना दिसलास तर असा राग यायचा त्याना म्हणायचे, पोराना कशाला रडवतेस? ठेव तें हातातलें काम आधीं खालीं आणि गप्प कर त्याला लवकर. नाहीं तर देईन दोन सपाटे ठेवून ”

जानकीबाईची नात म्हणाली, “आजी, तुला आजोबा मारीत असत?” तिला खुदकन् हसू आलें

जानकीबाईच्या चेहऱ्यावर देखील हसू उमटलें हात उगारायचा प्रयत्न करीत त्या म्हणाल्या, “चावट आहेस पोरी तू ”

त्याचें मस्तक भ्रमण करीत राहिलें त्या दिवसाच्या किती तरी आठवणी त्याना येत होत्या पतीच्या मृत्यूनतर जें भकास जिणे त्या जगल्या त्याची त्याना आठवण होत होती भावनेचे कढ त्याना आवरत ना. त्या म्हणाल्या, “हे गेले आणि बघ जेवायचीसुद्धा मारामार पडायला लागली कसें तरी करून दिवस काढले हो मीं म्हणून बाबा, अन्न कोणीं लाथाडलें, कोणीं टाकलें म्हणजे माझे डोकें उठतें अरे आता तू पैसे कमावतो आहेस. देवाच्या दयेनें काहीं तुला खायला-प्यायला कमी नाहीं. चार शितें फुकट गेलीं म्हणून काहीं तुझा ससार अडायचा नाहीं. पण बाबा, अन्न हें देवासारखे आहे त्याची कधी नासधूस करू नये. उरलेंसवरलें तर कोणाला तरी द्यावें भुकेलेले थोडे का असतात? त्याना द्यावें आपल्याला चार घास मिळाले तर एक दुसऱ्याच्या हातावर ठेवावा मी आपलें एवढेंनेवढें कोणाला देत असायची कोणी गोरगरीब आजारी असलें तर त्याच्याकरिता एवढे ताक ठेवायची. सूनबाईला तें आवडत नसे तिला वाटे, आपला नवरा कमावतो आणि सासू चार लोकाना वाटून टाकते—”

“असे काय बोलतेस आई? तुला का कधीं कोणी बोललयू ह्या बाबतींत? मीं चुकून तरी शब्द काढला आहे का तोंडातून?” गोविंदराव म्हणाले

"आपण काहीं तोंडातून कधीं ब्र काढलेला नाहीं" सूनबाईनें स्वत वरचा आरोप झटकून टाकला

"अरे, अशीं रागावू नका माझ्यावर चुकलें असेल माझें म्हातारीचें ते कसलें मनावर घेता? पण कोणी दाराशीं काहीं मागायला आला तर त्याला नको म्हणू नका ऐकलेस का ग सूनबाई?"

"ती बाहेरच्या खोलींत गेली आहे" गोविंदराव म्हणाले

जानकीबाई म्लानपणे हसल्या "तिला वाटत असेल की हिला भ्रम झाला काहीं तरी बडबडते आहे पण राहवत नाहीं रे, म्हणून सांगतें आणि हें बघ—"

"आई, तू फार बोलते आहेस तुला त्रास होईल त्याचा स्वस्थ पडून राहा कशी"

"आता शरीर सगळे थकलें माझें तोंड काय तें तेवढें चालू आहे. ते देखील बंद करायला पाहतो आहेस का रे तू?"

"तसे नव्हे आई—" गोविंदराव चाचरले.

"तें काहीं नाहीं मी आता बोलणार. माझ्या मनात काय आहे ते सांगून टाकणार काय व्हायचेंय् काय? चार दिवसानीं मरायची ती आत्ता मरेन, एवढेंच ना?" जानकीबाई चिडल्या. रागानें त्यांचें शरीर कापू लागलें. डोळ्यात पुन्हा पाणी उभें राहिलें.

"असे काय करतेस वेड्यासारखे आई तू?" गोविंदराव म्हणाले, आणि त्यानीं जानकीबाईच्या कपाळावर हात ठेवला ते पाहून त्याच्या मुलीने पण आजीच्या तोंडावरून हात फिरविला त्या मुलीच्या आपुलकीने जानकीबाईना बरे वाटले तिचा आपल्या गालावरचा हात त्यानी तसाच धरून ठेवला

त्या म्हणाल्या, "किती ग शहाणी पोर आहे माझी. गोविंदा, तिला फळींवरच्या डब्यातली एक खारीक काढून दे हो. पोरीला खारका फार आवडतात. आणि तूसुद्धा घे हो एक."

नात म्हणाली, "अय्या! बाबा काय लहान आहेत खारका खायला?"

जानकीबाई हसल्या. त्या म्हणाल्या, "अग, तुझा बाप असेल तो. पण मला तो लहानच आहे"

जानकीबाईंना हलकें हलके वाटले पण तें थोडाच वेळ आता त्याचें मन विश्राति घ्यायला तयार नव्हतें सगळी आवराआवर करून त्याना आता महायात्रेला निघायचें होतें अखेरचें काय ते सागून टाकायचें होतें

त्या म्हणाल्या, "गोविंदा, अरे, माझे म्हणून तू बॅंकेत पैसे टाकले होतेस ते काढून आणलेस का?"

"होय, आणले आहेत देऊ का तुला आत्ता?" असे म्हणून गोविंदराव उठले आणि त्यानी पैसे आणले

जानकीबाईंनी नोटाचें ते पुडके हातात घेतलें आणि मग पुन्हा ते गोविंदरावाच्या हातात देत त्या म्हणाल्या, "हे बघ, ह्यातले शभर रुपये तुझ्याजवळ ठेव आणि कधीं सुदराबाईंना गरज लागली तर त्याना दे. तिचें बापडीचें कोणी नाहीं आता एक मुलगा होता तो दिवटा निघाला. हिलाच स्वयपाकिणीचें काम करून त्याला पोसावें लागतें पण आता किती दिवस काम करील ती?"

गोविंदराव म्हणाले, "बरें"

"अरे गोविंदा! ती सारखी इथे येते, पुष्कळ वेळ बसते, हक्काने चहा करून मागते, काय काय घेऊन जाते, म्हणून तुम्हाला तिचा राग येत असेल, कधीं ही पीडा जाईल असे वाटत असेल. पण हें बघ, मी गेल्यावरसुद्धा—"

"आई!—"

"ऐक रे तर मी गेल्यावरसुद्धा तिची विचारपूस करीत जा. सूनबाईला म्हणावें, एवढा चहा करून द्यावा तिला अरे, हे गेले तेव्हा ह्या माउलीनें माझी फार काळजी घेतली. आपल्या घरात ती लहानच होती. तिचा काहीं तेथे अधिकार नव्हता. सासू सागेल तसे करावें लागायचें सगळें. आणि ती होतीहि चागली खाष्ट. पण ही पदराखालून मला कधीं दशमी, कधीं एवढें पीठ, कधीं कण्या असे सगळे आणून

द्यायची बघ मला चोरट्यासारखे वाटायचे मी 'नको, नको' म्हणायची पण ही मला रागे भरायची अशी हिने माझी काळजी घेतली लहानपणापासूनची ही माझी मैत्रीण आहे—"

"अय्या! मैत्रीण?" जानकीबाईंच्या नातीला हसू आलें म्हाताऱ्या बायकाना मैत्रिणी असतात ह्याची तिला गमत वाटली

जानकीबाईनीं प्रेमाने तिच्याकडे पाहिले, गोविंदरावाच्या हातातल्या नोटाच्या पुडक्यातली एक दहाची नोट काढून पोरीच्या हातात दिली. आणि त्या पुन्हा बोलू लागल्या, "तेव्हा माझे वाईट दिवस होते आता तिचे दिवस वाईट आहेत तेव्हा नको का तिची काळजी घ्यायला? आपलें असे म्हणायला तिला आता कोणी उरलें नाही बघ म्हणून ती माझ्या आसऱ्याला येते तिचा ससार वाढला नाहीं म्हणून ती माझ्या नातवडाचें कौतुक करते आपले घर बद झालें तर कुठे जाईल ती? माझ्यासारखेच तिचेंहि वय झालें रे आता तिला—"

जानकीबाई मध्येंच थाबल्या गोविंदरावाच्या चेहऱ्यावर त्याना हवा तो भाव दिसला नाहीं सुंदराबाईविषयी त्याना जे वाटत होते ते गोविंदरावाना वाटूच शकत नव्हतें आपण जें त्याच्याविषयी प्रेम दाखवलें ते आपल्याबरोबरच सपणार असे त्याना स्पष्ट दिसलें ते प्रेम गोविंदरावाच्या स्वाधीन करून सुंदराबाईना पोहोचते करता येत नव्हतें आणि म्हणून आपल्याजवळ चार पैसे आहेत ह्याचें त्याना बरे वाटले त्या म्हणाल्या, "बाकी असू दे सगळे, पण तिला लागले तर ते शभर रुपये दे हो"

"नाहीं तर, तूच दे ना आपल्या हातानें ते पैसे, आई" गोविंदराव म्हणाले आईच्या मनात असा सशय यावा ह्याचें त्याना वाईट वाटलें.

"तसे नव्हे रे—" जानकीबाई म्हणाल्या आणि मग गप्प बसल्या. जिवाच्या आकाताने माणूस बोलतें आणि तरी त्याचें बोलणें दुसऱ्याला समजत नाही. मरताना देखील हृदय नीट उघडे करता येत नाहीं. जानकीबाईचें मन कुठे तरी भरकटू लागले त्यानी मध्येंच विचारलें, "काय रे गोविंदा, आपली सुशिला झाली का बाळत?"

"काहीं कळलें नाहीं बुवा!"

"अरे, चौकशी करावी आपल्या माणसाची!" आणि मग जानकी-बाई एकदम हसू लागल्या.

गोविंदरावानी विचित्र दृष्टीने त्याच्याकडे पाहिलें तरी त्या हसतच राहिल्या तेव्हा गोविंदराव त्याचा हात धरून म्हणाले, "आई!"

जानकीबाई हसू आवरीत म्हणाल्या, "घाबरू नको, गोविंदा माझे डोके काहीं फिरले नाहीं पण बाबा, ह्या बाळतपणाच्या गोष्टीवरून एकदम आठवण झाली, आणि हसू आले. बरे का गोविंदा, तू झालास तेव्हा मला फार त्रास झाला अगदी जगतें का मरते, असे झालें. सुइणीनें तर आशा सोडली तेव्हा ह्याचा जीव अगदीं राहीना वेड्या-सारखे झाले आणि मग काय केलेंनी—आपली कुदळ घेऊन खळें करायचें होतें तें खणत सुटले. खण खण खणत सुटले. शेवटीं माझी सुटका झाली तेव्हा खणायचे थाबले आणि पडवीत येऊन मटकन् बसले. हसता हसता बाबा सगळ्याची पुरेवाट झाली! सासूबाई म्हणाल्या, खळे खणायला दिवस लागायचा, पण तें आपले तासाभऱ्यात खणून झालें."

आणि जानकीबाई हसतच सुटल्या. हसून हसून त्याच्या डोळ्यातून पाणी आलें गोविंदराव कावरेबावरे होऊन तें पाहातच राहिले.

जानकीबाईची नात पण हसत राहिली. आपले आजोबा खूपच वेडे असावे असे तिला वाटलें.

तेवढ्यात जानकीबाईचा धाकटा मुलगा आला. त्याला पाहून जानकी-बाईचें हसें थाबलें. आतुरतेनें हात उचलीत त्या म्हणाल्या, "आलास शकर! ये बाबा. मला वाटलें, आता तरी तुला माझी आठवण होते कीं नाहीं? ये बाबा, ये. असा माझ्याजवळ बस"

शकर म्हणाला, "असे कसे म्हणतेस आई! मला तुझी सारखी आठवण येत होती. पण वेळच झाला नाहीं बघ."

गोविंदरावानीं त्याच्याकडे भेदक नजरेनें पाहिलें. कारण शकरला उद्योगधदा काहींच नव्हता पोटापुरतें देखील तो मिळवीत नसे. काहीं तरी त्याचे उपद्व्याप चालू असत एवढें मात्र खरें.

जानकीबाई देखील हसून म्हणाल्या, "कसलीं रे बाबा कामें लागलीं

आहेत तुझ्या मागे एवढीं आणि काय रे दशा तुझी ही शकर ! इतका बारीक कशाने झालास ? आपल्या तब्येतीला जपत जा बाबा. तुला ना बायको ना पोरें आणि मी आता चाललेच आजारी पडलास तर करणार रे कोण तुझे ?"

"मला काय झाले आहे आई ? माझे ठीक आहे पण तुझी अशी ही का स्थिति आणि तू अशा मरायच्या गोष्टी का बोलते आहेस ? असलें नाहीं काहीं बोलायचें तू अगदीं लवकर बरी होणार आहेस आता. आणि बरी झालीस म्हणजे काशीयात्रेला नेऊन आणीन मी तुला" शकर लाघवीपणाने म्हणाला तो गोरागोमटा होता. त्याचे डोळे घारे होते, आणि ओठ पातळ होते त्याची कोणावरहि चटकन् छाप पडत असे

जानकीबाई म्हणाल्या, "तू मेल्या पाच वर्षे मला काशीयात्रेला नेतो आहेस ! मुलखाचा थापाड्या तू. असू दे माझी काशीयात्रा आता इथेंच."

"नाहीं आई आता मात्र नक्की नेईन मी तुला काशीयात्रेला नवीन बिझिनेस सुरू केला आहे मीं आता "

"चार पैसे मिळताहेत का त्याच्यात ?"

' ताबडतोब कसे मिळतील ? पण लागतील मिळायला आता."

गोविदरावानीं तिरस्काराने त्याच्याकडे पाहिलें पग जानकीबाई म्हणाल्या, "मिळू देत बाबा, मिळू देत आणि लौकर दोनाचे चार हात होऊ देत."

गोविदराव उठून जाऊ लागले पण जानकीबाईनीं त्याना हात धरून बसवले त्या म्हणाल्या, "अरे बैस, गोविदा, बैस सख्खे भाऊ तुम्ही आणि भाडता रे कसले ? अरे, भावाभावाचे जर पटले नाहीं, तर आणखी कोणाचें कोणाशीं पटणार आहे ? कुणी चुकले-माकलें तर विसरून जावे गोविदा, तू मोठा आहेस "

गोविदराव रागानें म्हणाले, "आई, मीं तुझ्या म्हणण्याप्रमाणे ह्याचें पुष्कळ केलें आहे. त्याचा काय फायदा झाला ते तुला माहीत आहेच. आता आणखी काहीं करायला सागू नको तू मला "

जानकीबाई घाबरल्या. त्या म्हणाल्या, "नाहीं रे बाबा, मी तुला काहीं करायला सागत नाहीं. दोघे निदान बोलत तरी जा एकमेकाशीं "

शकरचें जणु ह्या बोलण्याकडे लक्षच नव्हते त्याने आपल्या खिशातून गोळ्या काढून आपल्या पुतणीला दिल्या होत्या आणि तिला मांडीवर घेऊन तो खेळवीत होता

जानकीबाई म्हणाल्या, "अरे शकर, तू लहान आहेस आपलें काहीं चुकलें तर सरळ 'चुकलो' म्हणावे आणि मोठ्या भावाचे पाय धरावे अरे, तो खरा फार मायाळू आहे माझे तो किती करतो ते पाहिलेस ना? त्याची माया दिसत नाहीं इतकेच "

शकर म्हणाला, "आई, तू उगीच मनाला त्रास करून घेऊ नकोस. आमचें भाडणबिडण काही नाहीं आता स्वस्थ पडून राहा बघू मी तुझे पाय चेपू का?" तो खरोखरीच त्याचे पाय चेपू लागला

त्या म्हणाल्या, "नको बाबा, पायबीय नको चेपू सहा महिन्यानी आला आहेस, तो पाच मिनिटे बस, म्हणजे पुष्कळ झाले आता पुन्हा भेट—"

"आई, तू पुन्हा असे बोललीस तर मी उठून जाईन ह!"

"बरे बाबा, नाहीं बोलत " जानकीबाई कौतुकाने म्हणाल्या आपल्या मुलावरच्या प्रेमाच्या उमाळ्याने त्याना गहिंवर आला त्या म्हणाल्या, "अरे, इतकें गोड बोलतोस, तसेच जरा समजूतदारपणें वागावें "

असेच मायलेकराचें बोलणें चालले गोविंदराव मुकाट्यानें तेथे बसून होते. जानकीबाईनीं त्याना बोलतें करण्याचा प्रयत्न केला, पण तो जमला नाहीं.

थोड्या वेळानें शकर म्हणाला, "अग आई, अजून तू मला खारीक दिलीस नाहीं."

जानकीबाई म्हणाल्या, "हा मेल्या, पोर का रे आता तू? घे त्या डब्यातली."

शकरनें डब्यातली खारीक घेतली. एक पुतणीच्या हातावर ठेवली आणि एक गोविंदरावाना दिली. गोविंदरावानीं शक्य तितके वाईट तोंड करून ती घेतली.

मग जानकीबाईनीं कापऱ्या हातानें गोविंदरावाच्या हातातलें नोटाचें पुडकें घेतलें आणि त्यातल्या बऱ्याचशा नोटा काढून शकरच्या हातावर

ठेवल्या.

शंकर म्हणाला, "छे, छे! आई, हें कशाला? अहं ठेवून दे हें."

पण जानकीबाई रागावून म्हणाल्या, "मुकाट्यानें पैसे घे बरें तू हे शंकर तुझी स्थिति काय आहे तें मला माहीत आहे हे पैसे काहीं तुला फार दिवस पुरायचे नाहीत पण माझ्याजवळ देण्यासारखे जें काहीं होतें तें मीं सगळे तुला दिले ह्यापरतें मी काय आणखी करणार? पण शंकर, बाबा एवढें लक्षात ठेव, कीं मी आता चाललें तुला ह्या काडीचा आधार होता तो देखील आता जाणार तेव्हा आता काळजी घे बाबा स्वत ची जगात कोणी कोणाचें नाहीं बरे तुझे वनवास झाले तर माझा आत्मा तळमळत राहील बघ"

शंकरचे डोळे देखील ओलावले तो म्हणाला, "असे बोलू नको ग आई! मी आता नीट वागेन हें बघ, तू म्हणतेस तसे दादापुढें लोटांगण घालतों."

असे म्हणून खरोखरच त्यानें गोविंदरावाच्या पुढे लोटांगण घातलें

तें पाहून जानकीबाईची नात खदखदून हसली गोविंदरावांना काय करावें तें समजेना त्यांनीं तोंड अधिकच वाईट केलें

थोड्या वेळानें शंकर निघून गेला तो गेल्यावर जानकीबाई गोविंदरावांना म्हणाल्या, "तुला वाटले असेल कीं हिनें आपल्या घरचें इतकीं वर्षे खाल्लेन् आपल्या जवळूनच घेऊन हे पैसे जमा केलेन् आणि आता ते दुसऱ्याला देऊन टाकते त्याचा फायदा! का तर तो उनाड म्हणून, गोडगोड बोलतो म्हणून"

गोविंदराव म्हणाले, "तुझ्या त्या पाचशें रुपयाचा मला कधींच लोभ नव्हता तू मला लहानाचें मोठे केलेंस, शिकविलेंस, तेवढें मला पुष्कळ झालें पण मला इतकेच वाटतें कीं तो गोड बोलतो आणि तू फसतेस."

"अरे गोविंदा, तो माझ्या पोटचा गोळा आहे तो कसा आहे तें सगळ्यापेक्षा मला अधिक माहीत आहे. तो उनाड आहे. खोटे बोलतो. दुसऱ्या कोणाचें काहीं करावें असे त्याला वाटत नाहीं हें मला सगळें माहीत आहे. पण त्याचें तरी कोणी बघायला हवें ना? तुला देवानें केलं तसाच

त्यालाहि देवानेंच नाही का केला? देव जर अशीं माणसे जन्माला घालतो तर आपण त्याचें बघितले पाहिजे. उपाशी का मारायचे आहे त्याना?"

"पैसे काही आठ दिवस त्याच्याजवळ टिकायचे नाहीत"

"आठ दिवस तर आठ दिवस. जेवढी माझी ताकद होती तेवढे त्याचे मीं केले तुला सांगितले असते, पण तुला तरी किती त्रास द्यायचा? आणि कोणी सांगावे! इतके दिवस जरी तो असा असला तरी देव देईल त्याला चांगली बुद्धि अजूनहि देईल"

गोविंदराव कांहींच बोलले नाहींत पण त्यानीं मनोमन असे ठरवले कीं आपण भावाला उपाशी तरी राहू देणार नाहीं आणि मग आपण असे ठरवले हें त्याना दुबळेपणाचे वाटलें त्याना आपल्या बायकोची भीति वाटू लागली

ते आईला म्हणाले, "आई, बोलून बोलून दमलीस तू आता दूध घेतेस का थोडेसे?"

मुलाच्या समजुतीखातर त्यानीं थोडे दूध घेतलें. आणि थकव्याने त्यानीं डोळे मिटले त्याना आणखी पुष्कळ बोलायचें होते. मामजींची पंचपात्री, तो सासूबाईंचा चांदीचा लगडा बाळकृष्ण पण किती बोललें तरी बोलणें संपलें नसतें आणि आता का कोण जाणे, त्याना रिकामें रिकामें—मोकळे वाटत होते इथला संबंध तुटला, इथे करायचें तें केलें, असे वाटत होतें. त्यांचे डोळे आता पलीकडे लागले होते. आता त्याना विश्रांति हवी होती.

झोपण्यापूर्वी त्या एकदा गोविंदरावाना म्हणाल्या, "गोविंदा, मला भीति वाटते रे."

—गोविंदरावाची बायको रात्रीं त्याना म्हणाली, "ते पैसे सगळे त्यानीं भावोजीला दिले ना? आणि दहा रुपये माझ्या पोरीच्या हाता वर ठेवले. तुम्ही हे असे भोळे सांब "

गोविंदराव कांहीं तरी किरकिरले आणि मग सगळीकडे सामसूम झाली.

♠ ♠ ♠